# विष्णु कृष्ण चिपळूणकर

## ( द्विविध दर्शन )



गजानन त्र्यंबक माडखोलकर
श्रीनिवास नारायण बनहट्टी




बॉम्बे बुक डेपो

शके १८५६ ] मुंबई नं. ४ [ इ. स. १९३४

प्रकाशक
दत्ताराम रामकृष्ण देउलकर,
बॉम्बे बुकडेपो, मुंबई. नं. ४

६००९८



मुद्रक:
शा. वि. परुळेकर,
मुंबईवैभव प्रेस, सँढर्स्ट रोड, मुंबई

गुरुवर्य

कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

यांच्या चरणीं सविनय

समर्पण

ग. त्र्यं. माडखोलकर

श्री. ना. बनहट्टी

# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तकांत जे दोन प्रबंध एकत्र ग्रथित केलेले आहेत, ते त्यांच्या लेखकांनीं निरनिराळ्या वेळीं स्वतंत्र रीतीनें लिहिलेले असून, पूर्वीं स्वतंत्र रीतीनेंच प्रकाशितही झालेले होते असें असतां त्यांचा या पुस्तकांत एकत्र समाविष्ट होण्याचा योग कसा जमून आला व या पुनर्मुद्रणाच्या प्रसंगीं त्यांच्या स्वरूपांत कितपत बदल करण्यांत आला, हें सांगण्यासाठींच हे प्रस्तावनेदाखल दोन शब्द लिहिण्यांत येत आहेत. वाचकांस झालें तरी या गोष्टीसंबंधानेंच कुतूहल वाटेल हें उघड आहे.

माडखोलकरांचा प्रबंध १९२२ सालीं 'विविधज्ञानविस्तारां'तून प्रथम प्रसिद्ध झाला; व १९२३ सालीं आर्यभूषण छापखान्यानें तो स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला. त्या छापखान्याच्या सुप्रसिद्ध आगीमध्यें त्याच्या प्रती नष्ट झाल्या, तेव्हांपासून त्याच्या पुनर्मुद्रणाची आवश्यकता भासत होतीच. पुढें उस्मानिया विद्यापीठानें आपल्या अभ्यासक्रमांत तो प्रबंध नेमिल्यामुळें व त्याच्या प्रकाशनाबद्दल माडखोलकरांना वारंवार सूचना केल्यामुळें ती आवश्यकता तीव्रतर रीतीनें भासूं लागली.

बनहट्टींचा प्रबंध इ. स. १९२६ सालीं 'रत्नाकर' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झाला. पुढें नागपूर विद्यापीठाच्या एम्. ए. च्या अभ्यासक्रमांत तो नेमिला गेला, तेव्हां त्याच्या स्वतंत्र छापलेल्या प्रती उपलब्ध होण्याची आवश्यकता किंचित्‌शी भासली. शिवाय वेळोंवेळीं केवळ मित्रांकडूनच नव्हे तर अपरिचित वाचकांकडूनही ती लेखमाला स्वतंत्र रीतीनें छापून काढण्याविषयीं लेखकास सूचना येत होत्या. त्यामुळें पुनर्मुद्रणाविषयींची इच्छा कित्येक वर्षांपासून बनहट्टींच्या मनांत वसत होती. तथापि योग्य संधीच्या व फुरसतीच्या अभावीं ती इच्छा मार्च १९३३ पर्यंत सुप्तावस्थेंतच पडून होती.

माडखोलकरांच्या प्रबंधाच्या पुनर्मुद्रणाची बाब विशेष निकडीची असल्यामुळें त्यासंबंधानें त्यांनीं गेल्या वर्षींच विचार व विचारणा सुरू केली होती. त्याविषयींच

दोघांमध्यें एकवार बोलणें चाललें असतां 'दोघांचेही प्रबंध जर एकत्र छापून काढले तर—' अशी कल्पना बनहट्टींच्या मनांत अभावितपणें येऊन गेली. ती बोलून दाखवितांच माडखोलकर यांसही ती फार पसंत पडली; व दोन्ही प्रबंध एकत्र छापावे असें ठरलें. लेखनकालाच्या दृष्टीनें बनहट्टींचा प्रबंध नंतरचा असल्यानें व तो टीकारूप असून त्यांत खुद्द माडखोलकरांच्या प्रबंधावरही टीका असल्यामुळें तो नंतर छापावा व माडखोलकरांचा प्रबंध प्रथम छापावा असा क्रमही सहजच ठरला.

दोघांही लेखकांनीं आपल्या पूर्वींच्या लेखांत बदल पुष्कळच केला आहे. बनहट्टींनीं आपल्या लेखांत कोणत्या हेतूस्तव व कोणत्या धोरणानें बदल केला आहे, हें आपल्या प्रबंधांतच प्रारंभीं ( पृ. १९०–१९४ ) सांगितलें आहे. याशिवाय लेखकांच्या आजघटकेच्या—बहुतांशीं स्थिरावलेल्या—विचारांचें प्रतिबिंब यथातथ्य रीतीनें लेखनामध्यें पडावें व आजतागायत उपलब्ध झालेल्या सर्व माहितीचा समावेश अगर उपयोग करून लेखनास शक्य तितकी पूर्णता आणावी, हे दोन उद्देश पुनर्लेखन करितांना दोघांच्या मनांत वागत होते, असें विधान सामान्यतः दोघांही लेखकांच्या संबंधानें करितां येण्याजोगें आहे. या हेतूंनीं पुनर्लेखनास प्रवृत्त झाल्यामुळें दोघांचेही लेख पूर्वींच्या मानानें जवळजवळ दुपटीनें वाढले आहेत; व बहुतेक सर्व मजकूर नव्या स्वरूपांत पुनः लिहिला गेला आहे. बनहट्टींच्या लेखांत १९२६ नंतर प्रसिद्ध झालेल्या आक्षेपकांच्या लेखांचा परामर्श प्रामुख्यानें घेण्यांत आला आहे. तेव्हां, सरासरी दहा वर्षांपूर्वीं लिहिलेले मासिकांतील लेख हे या ग्रंथाचें मूळ स्वरूप असें जरी एका दृष्टीनें म्हणतां आलें, तरी दुसऱ्या दृष्टीनें पाहतां हा ग्रंथ सर्वस्वीं नवीन असा तयार झाला आहे असेंही तितक्याच यथार्थ रीतीनें म्हणतां येईल. निदान नवीन ग्रंथाच्या लेखनास अवश्य तितके श्रम या पुनर्लेखनाच्या कामीं दोघांही लेखकांनीं घेतले आहेत, एवढा तरी निर्वाळा लेखकांस खास देतां येईल.

या ग्रंथाच्या प्रकाशनाची योजना लेखकांचे स्नेही श्री. विठ्ठल हरि कुळकर्णी यांच्या साहाय्यानें मुख्यतः जुळून आली. त्यांच्या ऋणाचा उल्लेख करणें लेखकांचें प्रथम कर्तव्य होय. प्रो. दत्तो वामन पोतदार यांनीं आपल्या संग्रहींचे अनेक

दुर्मिळ ग्रंथ पाहावयास पाठवून अमूल्य मदत केली; व श्री. खं. सा. दौंडकर यांनीही मुंबईहून दुर्मिळ ग्रंथ पाठविले; याबद्दल या दोघांचेही लेखक ऋणी आहेत. श्री. ना. के. बेहेरे, श्री. आनंदराव टेकाडे व श्री. गं. दे. खानोलकर यांचीही अशाच अनेक बाबतींत मदत झाली. यास्तव त्यांचेही लेखक आभारी आहेत. आर्यभूषण छापखान्याचे चालक श्री. वामनराव पटवर्धन यांनीं माडखोलकरांचा प्रबंध मुद्रित करण्यास संमति दिली, या त्यांच्या सौजन्याचाही आभारपूर्वक उल्लेख करावयास पाहिजे. प्रस्तुत ग्रंथाचे दिलदार प्रकाशक श्री. देउलकर व लेखकांकडून होणारा विलंब साधुवृत्तीनें सहन करणारे मुंबई वैभवप्रेसचे व्यवस्थापक, यांच्याही ऋणाचा उल्लेख येथें करणें रीतीस धरूनच आहे.

नागपूर
ता. १५-७-३४

ग. त्र्यं. माडखोलकर
श्री. ना. बनहट्टी



विष्णु कृष्ण चिपळूणकर यांचा जन्म ता. २० मे १८५० रोजीं पुणें येथें झाला. चिपळूणकरांच्या जन्मकालीं त्यांचे वडील कृष्णशास्त्री चिपळूणकर हे आपल्या वक्तृत्वानें आणि विद्वत्तेनें तत्कालीन सुशिक्षितांत सर्वमान्य झाले होते. समाजाकडून अग्रपूजेचा मान मिळावयाला जे गुण अवश्य असावे लागतात, ते सर्व शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं एकवटलेले होते. अलौकिक बुद्धि, अभिजात रसिकता, व्यापक विचारसरणी, लोकमताला न दुखविण्याचें धोरण, संस्कृत व इंग्रजी भाषांवरील प्रभुत्व आणि बहुमानाची सरकारी नोकरी या कारणांमुळें शास्त्रीबुवांचा लौकिक जसा विद्वन्मंडळांत तसा बहुजनसमाजांतही अगदीं पहिल्या प्रतीचा होता. वरिष्ठांचा आदर आणि कनिष्ठांचें प्रेम त्यांनीं आपल्या निःस्पृह पण उदार वृत्तीनें संपादन केलें होतें. अशा श्रेष्ठ पंडिताच्या उदरीं चिपळूणकरांचा जन्म झाला. लहानपणीं आजाआजींच्या प्रेमळ वाणीचा व पावन रहाणीचा संस्कार त्यांच्या मनावर झाला. त्यांचे आजे हरिपंतमामा यांनींच त्यांना धुळाक्षरांची व वेदाक्षरांची ओळख करून दिली. त्यांचें मराठी शिक्षण नवव्या वर्षीं संपून स. १८६० सालीं ते इंग्रजी शाळेंत गेले. अस्फुट अवस्थेंत असलेल्या त्यांच्या प्रतिभेभोंवतीं या वेळीं एक प्रकारचें वाङ्मय वातावरण होतें. स. १८५९ सालीं कृष्णशास्त्री चिपळूणकर दक्षिणाप्राइझ कमिटीचे चिटणीस झाले. चिपळूणकरांच्या प्रतिभाविलासाला शास्त्रीबुवांनीं निर्मिलेली परिस्थिति जशी पुढें साहाय्यक झाली, तशी मनोविकासाला या वेळीं गृहस्थिति झाली. नवीन ग्रंथ व ग्रंथकार यांचा राबता या वेळेपासून त्यांच्या घरीं अधिक होऊं लागला. घरीं नित्य होणाऱ्या या वाङ्मयचर्चेचा परिणाम चिपळूणकरांवर झाला नसेल, हें संभवत नाहीं. इंग्रजी शाळेंत असतांना कृष्णशास्त्री वैजापूरकर यांच्याजवळ त्यांनीं संस्कृताचा अभ्यास केला.

पुढें, दक्षिण विद्यालयांत गेल्यावर, तेथील दुय्यम संस्कृताध्यापक अनंतशास्त्री पेंढरकर यांच्या, क्वचित् कानांवर पडणाऱ्या, स्वैर कथालापांकडे ते आस्थेनें लक्ष देत असत. संस्कृत कवींचीं सरस सुभाषितें आणि चमत्कृतिप्रचुर आख्यायिका याच पेंढरकरांच्या तोंडून त्यांनीं ऐकिल्या. त्यांना मराठी कवितेची गोडी त्या वेळचे प्रसिद्ध हरिदास पन्हाळकरबुवा यांचीं रसाळ कीर्तनें ऐकून लागली. तत्कालीन नवीन शिक्षितांना कीर्तनाला जाणें कमीपणाचें वाटत असे. त्यामुळें व स्वतःच्या भिडस्तपणामुळेंही ते कुठें तरी मागें उभें राहूनच कीर्तनानंद अनुभवीत. दक्षिण विद्यालयांत असतांना डॉ. कीलहॉर्न, प्रो. केरोपंत छत्रे आणि विशेषतः प्रि. वर्डस्वर्थ यांच्या शिक्षणपद्धतीपासून त्यांना पुष्कळच लाभ झाला; व बी. ए. होण्यापूर्वीं, तेथील वसतिगृहांत रहावयाला गेल्यावर, त्यांनीं, प्रसंगीं अभ्यासाकडे दुर्लक्ष करूनही, निरनिराळ्या विषयांवरील अवांतर ग्रंथ बरेच वाचले. ॲडिसन, जॉनसन, मेकॉले प्रभृति इंग्रजी ग्रंथकारांप्रमाणें स्वभाषेच्या सेवेंत आयुष्य घालविण्याची स्फूर्ति त्यांना याच वेळीं झाली. आणि त्या स्फूर्तीचा प्रभाव त्यांच्या जीवनक्रमावर झाल्यामुळेंच त्यांना महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासांत अढळ स्थान प्राप्त झालें.

चिपळूणकरांचा जन्मकाल हा महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासाचा आरंभकाल होय. अठराव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची परंपरा एकाएकीं तुटून, आपसांतील दुहीमुळें हतबल झालेल्या मराठ्यांची दौलत इंग्रजांच्या घरांत गेली. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत, म्हणजे स. १८१८ पासून १८५० पर्यंत, इंग्रजी राज्याची घडी महाराष्ट्रांत हळूहळू बसत होती. महाराष्ट्राचा स्वराज्यसूर्य जरी या वेळीं मावळला होता, तरी त्याच्या अस्तंगत ऐश्वर्याची मंद प्रभा अद्यापि पूर्णपणें नष्ट झाली नव्हती. मराठी साम्राज्याची राजधानी म्हणून सर्व हिंदुस्थानभर गाजलेलें पुणें शहर हेंच अजूनही महाराष्ट्रीयांच्या विद्वत्तेचें आणि वैभवाचें अधिष्ठान होतें. हरघडा

रंग पालटणाऱ्या रावबाजींच्या रुधिरप्रदिग्ध राजनीतीपासून इंग्रजांच्या कृपेनें मुक्त झालेल्या महाराष्ट्र–जनतेला त्यांनीं घडवून आणलेली राज्यक्रांति त्या वेळीं अनिष्ट वाटली नाहीं. स्वराज्यांत जेव्हां जुलमाचा अगदीं कळस होतो, तेव्हां त्याला तात्पुरता आळा घालणारें परराज्य ही सामान्य लोकांना केवळ इष्टापत्तिच वाटत असते ! सत्तावन सालच्या बंडाविषयीं आपल्या एका खाजगी पत्रांत रावसाहेब मंडलिक यांनीं असे उद्गार काढलेले आढळतात कीं, " हा जो मतिभ्रममूलक स्फोट झाला आहे, तें एक आमच्या राष्ट्रावर मोठें अरिष्टच आलें आहे. ...कंपनीच्या राज्यांत सुधारणा करण्याची, चुका दुरुस्त करण्याची व ज्याला पाहिजे असेल त्याला न्याय मिळेल असें करण्याची इच्छा आहे. हल्लीं इंग्लंडशीं दळणवळण वाढल्यानें व रेल्वेच्या प्रसारानें पुष्कळ प्रगति होण्याची आशा उत्पन्न झालेली होती. पण आतां या शिपायांच्या बंडामुळें आमची किती पिच्छेहाट होईल, तें मला कळत नाहीं. " अव्वल इंग्रजी अमदानींतील अत्यंत तेजस्वी म्हणून गाजलेल्या लोकाग्रणींच्या विचारांची जिथें ही स्थिति, तिथें सामान्य लोकांना जर इंग्रजी राज्य हें ईश्वरी वरदानासारखें वाटलें असलें, तर त्यांत काय आश्चर्य ? काठीला सोनें बांधून काशीयात्रेला जाण्याची संधि प्रथमच लाभल्यामुळें हुरळून गेलेल्या महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाला पुढें काठीला बांधावयाला सोनेंच मुळीं आपल्याजवळ शिल्लक उरणार नाहीं, याची कल्पनासुद्धां त्या वेळीं आली नाहीं ! त्यांतही इंग्रजी राजनीतीचें सुरवातीचें स्वरूप कांहींसें सौम्य किंबहुना सदयच होतें. ही स्थिति बदलावयाला एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रारंभ झाला. स. १८४८ त डलहौसीची कारकीर्द सुरू झाली. तोंपर्यंत हिंदी राजेरजवाड्यांच्या बाबतींत कंपनी सरकारचें धोरण, कविकुलगुरूनें

**न खरो न च भूयसा मृदुः पवमानः पृथिवीरुहानिव ।**
**स पुरस्कृतमध्यमक्रमो नमयामास नृपाननुद्धरन् ॥**

या श्लोकांत अजराजाविषयीं म्हटल्याप्रमाणें, एकंदरींत सलोख्याचें होतें. डलहौसीच्या अमदानींत हें धोरण सुटलें आणि हिंदुस्थानाच्या राजकीय क्षितिजावर नक्षत्रांप्रमाणें चमकणारीं संस्थानें एकामागून एक झपाट्यानें लुप्त होऊं लागलीं. या व इतर कारणांमुळें १८५७ सालीं बंडाची भयंकर वावटळ उठली. या बंडाचा प्रत्यक्ष संसर्ग किंवा उपसर्ग महाराष्ट्राला फारसा झाला नाहीं. पण, ही वावटळ शमल्यानंतर ज्या राजकीय तत्त्वांचा आणि राष्ट्रीय चळवळींचा उदय हिंदुस्थानांत झाला, त्यांचा प्रभाव मात्र महाराष्ट्रावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. चिपळूणकरांच्या जन्मानंतर फारच थोड्या अवधींत हें स्थित्यंतर घडून आलें. महाराष्ट्रांत या स्थित्यंतराला चिपळूणकरांचें कर्तृत्व विशेष कारणीभूत झालेलें असल्यामुळें त्यांच्या जन्माबरोबर अर्वाचीन महाराष्ट्राचाही जन्म झाला, असें म्हणणें अतिशयोक्त होणार नाहीं.

कृष्णशास्त्री चिपळूणकर हे जुन्या नव्या पद्धतीनें पढलेल्या तत्कालीन पंडितांचे अग्रणी होते. त्या वेळीं सरकारदरबारीं या दोन्ही विद्यांची बहुतेक सारखीच संभावना होत असे. तरीसुद्धां, स. १८४८ च्या सुमारास बुधवारवाड्यांत जेव्हां नवीन सरकारी इंग्रजी शाळा सुरू झाली, तेव्हां शास्त्रीबुवांचे गुरु मोरशास्त्री साठे यांनीं त्यांना स्पष्ट सांगितलें कीं, " या उपर खांद्यावर शालजोडी टाकून हिंडण्यांत प्रतिष्ठा राहणार नाहीं; तूं शाहणा असलास तर इंग्रजी शीक. " शास्त्रीबुवांचें संस्कृत अध्ययन त्या वेळीं नुकतेंच पूर्ण झालें असून, त्यांचें शिकण्याचें वयही राहिलेलें नव्हतें. तथापि, त्यांनीं गुरूच्या उपदेशाप्रमाणें, हा अगदीं अभिनव अभ्यासक्रम पत्करून, लवकरच इंग्रजी भाषेंत प्रावीण्य मिळविलें. शास्त्रीबुवांची धारणाशक्ति असामान्य होती; व तिला अविरत उद्योगाची जोड मिळालेली असल्यामुळें त्यांच्या बुद्धीला अविषय किंवा अगम्य असें कांहींच नव्हतें. न्यायशास्त्राच्या मरुभूमीपासून तों काव्यशास्त्राच्या नंदनवनापर्यंत ती लीलेनें संचार करीत असे.

' आरबी भाषेंतील सुरस गोष्टी ' ' अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह, ' ' अर्थ-शास्त्रपरिभाषा ', ' सॉक्रेटिसचें चरित्र, ' ' रासेलस ' इत्यादि त्यांचे ग्रंथ हे त्यांच्या अष्टपैलू बुद्धीच्या निरनिराळया विशेषांचे निदर्शक आहेत. तारुण्याच्या ऐन उमेदींत असतांना त्यांनीं आरबी भाषेंतील रसाळ गोष्टींचें रूपांतर केलें; व आयुष्याच्या उतरणीला लागल्यावर ' रासेलस ' सारख्या तत्त्वचिंतनात्मक कादंबरीचा अनुवाद केला. जणुं कांहीं, बगदादच्या खलिफांच्या राजधानींतील भोगविलासांचीं भडक शब्दचित्रें रंगवून विटलेल्या आपल्या मनाला विरंगुळा वाटावा, म्हणून त्या महापंडितानें मानवी सुखाची अपूर्णता मनावर बिंबविणाऱ्या रासेलसच्या सहवासांत तत्त्वशोधन केलें ! नवीन विद्येचे सर्व संस्कार मनावर झालेले असतांनाही चिपळूणकरांची आस्तिक्यबुद्धि आणि धर्मश्रद्धा सामान्यतः अविचलितच राहिली. पण, शास्त्रीबुवांचें बुद्धिचापल्य इतकें विलक्षण कीं, पाश्चात्य वाङ्मयाचें परिशीलन केल्यावर, त्यांच्या मनावरील वेदशास्त्रांच्या अध्ययनाचे सारे संस्कार लुप्त होऊन, त्यांचा जुन्या विद्येविषयींचा आदर निमाला व त्याबरोबरच ईश्वरावरील श्रद्धाही नष्ट झाली. आणि, शेवटच्या दुखण्यांत त्यांच्या पत्नीनें त्यांना नामस्मरण करावयाला सांगितलें असतां, त्याकडे दुर्लक्ष करून या आधुनिक कणादानें, ' मी ईश्वराला ओळखीत नाहीं, ' असे उद्गार नंतर काढले ! शास्त्रीबुवांच्या बुद्धीप्रमाणें त्यांचें वक्तृत्वही असाधारण होतें. त्यांच्या एका सहाध्यायी पद्यकारानें ' काकवत् कर्करायते ' असें त्यांच्या वाणीचें वर्णन केलें आहे. परंतु, शास्त्रीबुवांची वाणी जितकी कर्कश तितकीच अस्खलित आणि वादकुशल होती; व म्हणून त्यांचे गुरु त्यांना ' बृहस्पति ' म्हणत असत. त्यामुळें पुण्यांतील सभांचें नेतृत्व नेहमीं त्यांच्याकडे असे.

शास्त्रीबुवांच्या वेळचें पुणें जसें रसिकतेबद्दल तसेंच रंगेलपणाबद्दलही विख्यात होतें. सहृदय मनुष्याच्या मनाला हटकून मोहनी घालणाऱ्या

वस्तु म्हणून कवीनें सुभाषित, गीत आणि युवतींच्या लीला यांचा एकदम निर्देश केला आहे. असें करण्यांत त्याची स्वतःची जशी रसिकता तसेंच जगाचें मार्मिक निरीक्षणही दिसून येतें, यांत शंका नाहीं. कारण, सुभाषित व गीत यांना वश होऊन, फक्त युवतींच्या लीलांनाच तेवढा लुब्ध न होणारा मनुष्य या जगांत विरळा. रसिकतेबद्दल पुण्याचा लौकिक कांहीं आजकालचा नव्हे. सवाई माधवरावांच्या किंबहुना नानासाहेबांच्या वैभवशाली कारकीर्दीपासून पुणें शहर हें गुणिजनांचें आश्रयस्थान होऊन राहिलें होतें. कारण, ललित कलांचें लालन करणाऱ्या मोगल बादशहांचा मुलूख एकसारखा बेचिराख होऊं लागल्यामुळें, सतराव्या शतकानंतर गुणिजनांना निवांत असा थारा उत्तर हिंदुस्थानांत बहुतेक मुळींच उरला नाहीं. मुलुखगिरीच्या सततच्या धांदलींतही पेशव्यांनीं ललित कलांचा करवेल तितका सांभाळ केला. पेशवाईच्या अगदीं अखेर अखेर राज्यकर्त्यांची व रयतेची अभिरुचि अजिबात बिघडली, हा भाग वेगळा. रावबाजींच्या राजवटींतील हें शिमग्याचें चांदणें पेशवाईनंतरही नाहींसें झालें नाहीं. रावबाजींचें राज्य जरी पुण्यांतून गेलें, तरी त्यांचा रंगेलपणा मात्र मागें राहिला. पुण्यांतील सामान्य लोक आणि सुशिक्षित यांच्यांत हा रंगेलपणा जवळ जवळ सारख्याच प्रमाणांत वसत होता. केरोपंत छत्रे यांच्यासारखे कांहीं स्पृहणीय अपवाद या विधानाला शोधूं गेल्यास सांपडतील, हें खरें. पण त्यामुळें वस्तुस्थितीला बाध येत नाहीं. रात्रींच्या वेळीं हातांत फुलांचे गजरे घेऊन, मशालींच्या झगझगीत प्रकाशांत, प्रियाराधनार्थ बाहेर पडणें, हें त्या वेळीं कमीपणाचें समजलें जात नसे! उलट व्यसनीपणा हा पुण्यास तेव्हां शिष्टसंमत होऊन बसला होता. शास्त्रीबुवांचे एक स्नेही व चिपळूणकरांचे शिक्षणव्यवसायांतील पहिले वरिष्ठ बाबा गोखले यांची अशी गोष्ट सांगतात कीं, त्यांच्या शाळेंतील विद्यार्थ्यांना, केव्हां केव्हां सकाळच्या प्रहरीं, आपल्या या गुरूला, त्याच्या

प्रेमपात्राच्या महालांतून, मुद्दाम जाऊन बोलावून आणावें लागत असे ! इंग्रजांच्या एकछत्री अमलाखालीं स्वस्थतेचें व सुबत्तेचें सुख फार दिवसांनीं अनुभवावयाला मिळाल्यामुळें बहुजनसमाजाला देशस्थितीचें भान न राहून सुखोपभोग सुचले, यांत नवल नाहीं. पण, ज्यांच्या ठिकाणीं विचारशक्तीचा अभाव नव्हता, अशा सुशिक्षितांनाही इष्काचे खेळ खेळण्याची बुद्धि व्हावी, याचें मात्र आश्चर्य वाटतें. तत्कालीन सुशिक्षितांप्रमाणें कृष्णशास्त्री चिपळूणकर हेही जसे रसिक तसेच रंगेल होते. शास्त्रीबुवांच्या या वर्तनाला त्यांच्या मनाचा काय आळा असेल तेवढाच; जनाचा असण्याचें अर्थातच कांहीं कारण नव्हतें.

परंतु, पौर्णिमेच्या सकलंक चंद्राचें चांदणें जसें आनंददायक असतें, तशी रंगेल शास्त्रीबुवांची रसिकताही आल्हाददायक होती. मेघदूताचें अनुपम मराठी भाषांतर हें त्यांच्या या अनन्यसाधारण रसिकतेचें अतीव मधुर फल होय. या मराठी मेघदूताची रचना व भाषा इतकी सहजसुंदर आहे कीं, कालिदासाच्या मूळ काव्यापेक्षांही हें त्याचें भाषांतर अधिक सरस उतरलें आहे, असें म्हणण्याचा मोह पुष्कळदां पडतो. शास्त्रीबुवांचे बहुतेक सर्व गद्य पद्य प्रबंध भाषांतरित किंवा आधाररचित आहेत. नाहीं म्हणावयाला, शालापत्रकांत प्रसिद्ध झालेले मराठी व्याकरणावरील चर्चात्मक लेख व ‘ विद्याप्रशंसा ’ हें लघुकाव्य याच काय त्या त्यांच्या स्वतंत्र कृति आढळतात. मराठी भाषेवर प्रभुत्व असलेल्या त्यांच्यासारख्या प्रतिभासंपन्न लेखकानें केवळ भाषांतराच्या हीणकस व्यवसायांत आपलें बुद्धिसर्वस्व वेंचावें, हें जरा चमत्कारिकच वाटतें. मराठी वाङ्मयाचें संवर्धन होण्याच्या दृष्टीनें इतर भाषांतील उत्कृष्ट ग्रंथांचीं भाषांतरें मराठींत होणें फार जरूर आहे, यांत संशय नाहीं. परंतु, व्यवहारांत काय किंवा वाङ्मयांत काय, परावलंबन हें परिणामीं केव्हांही घातुकच ठरतें. राष्ट्राचा उत्कर्ष जसा स्वावलंबनानें होतो, तसा भाषेचा उत्कर्ष स्वतंत्र लेखनानें होतो. पराव-

लंबन हें प्रतिभाविकासाला बिलकूल पोषक नाहीं. कोणत्याही लेखकाला भाषांतराची संवय एकदां जडली कीं, स्वतःच्या प्रतिभेला चलन देऊन स्वतंत्र ग्रंथ निर्माण करण्याची उमेद त्याला सहसा रहात नाहीं. आत्मप्रत्यय हा जसा राष्ट्राला तसाच वाङ्मयालाही केवळ प्राणभूत असतो. राष्ट्राची आध्यात्मिक आणि आधिभौतिक उन्नति वाङ्मयाच्या अभिवृद्धीवर अवलंबून असते. राष्ट्रीय स्फूर्तीचें आणि राष्ट्रीय विचारांचें वाङ्मय हें उगमस्थान आहे. राष्ट्राला कर्तव्यप्रवण करणारी ही प्रेरकशक्तिच जर परवश असली, तर राष्ट्राची धडगत राहणार नाहीं. परतंत्र राष्ट्र आणि परभृत वाङ्मय हीं परप्रकाशित चंद्राप्रमाणें मंदतेज व मलूल दिसतात. शास्त्रीबुवांच्या कृति जरी रमणीय असल्या, तरी त्यांच्या ठिकाणा स्वावलंबनाला सहज असलेली तेजस्विता आढळत नाहीं. त्यांच्या वाणीप्रमाणें वर्तनांतही फारशी तडफ नव्हती. स. १८५० च्या सुमारास पुणेंप्रांतीं ख्रिस्ती मिशनरींचें स्तोम आतिशय माजलें होतें. रे. मरे मिचेल यांच्या नेतृत्वाखालीं मिशनरी लोकांनीं हिंदुधर्माविरुद्ध जे खोडसाळपणाचे प्रयत्न त्या वेळीं चालविले होते, त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं पुण्यांतील कांहीं प्रमुख नागरिकांनीं 'विचारलहरी' या नांवाचें नियतकालिक काढलें होतें. त्यांत मुख्यतः शास्त्रीबुवाच लिहीत असत. त्यामुळें शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांची त्यांच्यावर इतराजी होऊन ते नोकरींतून कमी झाले. शास्त्रीबुवांनींही, या प्रसंगाची विशेष परवा न करितां, आपल्या अभिरुचीला साजेल असा कांहीं तरी स्वतंत्र मार्ग काढण्याचें योजिलें होतें. पण, शाळाखात्यांतील वरच्या दर्जाच्या जागा भरावयाला लायख अशा सुशिक्षितांची पैदास त्या काळीं अत्यंत अल्प प्रमाणांत होत असल्यामुळें, अधिकाऱ्यांनाच अखेर त्यांच्यापुढें नमतें घ्यावें लागून, ते पुन्हा नोकरीवर रुजू झाले. पूर्ववयांत उचंबळलेली ही स्वाभिमानाची प्रबळ ऊर्मि, एकदां ओसरल्यानंतर, फिरून कधींही प्रकट झाल्याचें दिसत नाहीं. कारण, पुढें

निबंधमालेंत प्रसंगोपात्त आलेली टीका शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांच्या नाजूक कृपादृष्टींत खुपून तिची कागाळी जेव्हां शास्त्रीबुवांच्या कानांवर गेली, तेव्हां त्यांना चिरंजीवांचें तें साहस अनुचित वाटलें.

अशा भाग्यशाली व बहुश्रुत पित्याच्या कृपाछत्राखालीं चिपळूणकरांचें बहुतेक आयुष्य गेलें. पितापुत्रांच्या ठिकाणीं समानगुणांचा वास किंवा विकास झाल्याचें प्रपंचांत क्वचितच आढळून येतें. विचक्षण विनोदी लेखकाप्रमाणें विरोधी वस्तूंची किंवा व्यक्तींची सांगड घालून स्वतःची कृति हास्यास्पद किंबहुना उद्वेगजनक करून घेणाऱ्या विधात्याच्या या विचित्र सृष्टींत चिखलांत उमलणारीं कमलेंच फार दृष्टीस पडतात. परंतु चिपळूणकर पितापुत्रांच्या बाबतींत समान गुणांचा आधिवासच काय पण उन्मेषही झाला होता. शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं जी प्रतिभा अंकुरित व पल्लवित झाली होती, तिचेंच पुढें परिणतावस्थेंतील पुष्पित सौंदर्य चिपळूणकरांच्या ठिकाणीं प्रकट झालें. किंबहुना, ज्या देशाभिमानाच्या ईर्ष्येनें प्रेरित होऊन, शास्त्रीबुवांनीं तारुण्यांत, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या अवकृपेची परवा न करितां, ‘ विचारलहरी ’ सारखें पत्र कांहीं काळ चालविलें, तो त्यांचा देशाभिमान पुढें चिपळूणकरांच्या ठिकाणीं उत्कटतेनें आविर्भूत होऊन, त्यांच्या उज्ज्वल कर्तृत्वापुढें शास्त्रीबुवांची सौम्य कविकीर्ति लोपून गेली. पिता आणि गुरु हीं दोन्हीं नातीं चिपळूणकरांच्या संबंधानें शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं एकरूप झालीं होतीं. चिपळूणकर विद्यार्थिदशेंत असतांना शास्त्रीबुवा त्यांना कधीं कधीं शिकवीत असत. पण या प्रासंगिक शालोपयोगी शिक्षणापेक्षां किती तरी अधिक व्यापक शिक्षण चिपळूणकरांना त्यांच्यापासून कळत न कळत मिळालें. स. १८६५ सालीं चिपळूणकर प्रवेशपरीक्षा उतरले. उत्तम लेखक व ग्रंथकार म्हणून शास्त्रीबुवांची कीर्ति त्या वेळीं सर्वत्र पसरलेली होती. ‘ पद्यरत्नावलि ’ हा त्यांचा रमणीय काव्यग्रंथ स.१८६५ सालींच बाहेर पडला. आणि, त्यानंतर लवकरच, रा. ब. दादोबा पांडुरंग यांच्या

मराठी व्याकरणावरील, त्यांचे मार्मिक व उद्बोधक टीकालेख शाला-पत्रकांतून प्रसिद्ध झाले. शास्त्रीबुवांनीं केलेल्या या उत्कृष्ट वाङ्मयसेवेचें ध्येय दक्षिण विद्यालयांत अध्ययन करीत असतांना चिपळूणकरांच्या दृष्टीपुढें होतें. शास्त्रीबुवांनीं वाङ्मयसेवेचा मार्गही चिपळूणकरांना याच सुमारास दाखविला. स. १८६५ सालापासून कृष्णशास्त्री शालापत्रकाचें काम पाहात असत. हें काम हातीं घेतल्यानंतर 'रासेलस'चें भाषांतर शाला-पत्रकांत द्यावयाला त्यांनीं सुरवात केली. अशा रीतीनें अठरा वीस भाग प्रकाशित झाल्यावर स. १८६८ सालीं बाकी भाषांतराचें काम त्यांनीं चिपळूणकरांकडे दिलें; व शास्त्रीबुवांच्या अपेक्षेप्रमाणें तें चांगल्या रीतीनें पूर्णही झालें. वाङ्मयसेवेचा आनंद ही काय चीज आहे, याचा प्रत्यक्ष अनुभव चिपळूणकरांना या वेळीं खचित आला असेल. उत्कृष्ट वाङ्मय हें जसें तें उत्पन्न करणाऱ्या लेखकाचें स्वतःच्या आनंदाचें व वैभवाचें चिरंतन असें निधान असतें, तसेंच तें त्याच्या समाजाचें किंवा सर्व जगाचेंही असतें. किंबहुना, स्वतः उपभोगून त्याच वेळीं दुसऱ्यालाही जवळ जवळ तितक्याच प्रमाणांत देतां येण्यासारखा जर कोणता आनंद किंवा वैभवविशेष असेल, तर तो निस्संशय वाङ्मयनिर्माणाचाच होय. फुलांचा परिमळ वाऱ्याबरोबर वाहून गेला, तरी त्यामुळें वेलीच्या वैभवाला बिलकूल उणेपणा येत नाहीं. त्या सुवासानें वातावरण मात्र दरवळून जातें. वाङ्मयसेवेपासून लाभणारा आनंद किंवा यश यांचाही प्रकार असाच आहे. अशा तऱ्हेचें हें वाङ्मयसेवेचें दिव्य व्रत चिपळूण-करांना पितृपरंपरेनें प्राप्त झालें.

वाङ्मयव्यवसायाकडे चिपळूणकरांचा स्वभावतः कल होता व परिस्थितिही त्याला पुष्कळ पोषक झाली. तथापि, त्या व्यवसायांत त्यांचें मन कायमचें स्थिर व्हावयाला, परिस्थितीपेक्षांही, त्यांचा स्वतःचा दृढ निश्चयच अधिक कारणीभूत झाला. मनुष्याच्या आयुष्याला वळण देण्याच्या बाबतींत, आनुवंशिक संस्कार अगर त्याची स्वतःची

मनःप्रवृत्ति यांच्यापेक्षां, परिस्थितिच अधिक प्रभावी ठरते, असा एकंदर जगाचा अनुभव आहे. आकाशगंगेच्या ओघांत ज्याप्रमाणें असंख्य तारकांचें तेज विलीन झालें आहे, त्याप्रमाणें परिस्थितीच्या प्रवाहांत आजपर्यंत अनेक कल्पक व्यक्तींचें कर्तृत्व जिरून गेलें आहे. शिलोच्चयाचा भेद करून बाहेर पडणारे आणि पुढें आपल्या सलिलसंपत्तीनें सर्व देशाला समृद्ध करणारे जिवंत झरे फार थोडे. चिपळूणकरांच्या लेखनाला जरी शास्त्रीबुवांच्या आज्ञेनें आरंभ झाला होता, तरी चिरंजीवांनीं केवळ साहित्यसेवेंतच आपलें सर्व आयुष्य घालवावें, अशी कांहीं त्यांची इच्छा नव्हती. कायद्याची परीक्षा देऊन त्यांनीं वकील व्हावें किंवा मुनसफीची परीक्षा देऊन बड्या पगाराची सरकारी नोकरी करावी, अशीच शास्त्रीबुवांची मनीषा होती. आणि, स. १८७२ सालीं चिपळूणकर बी. ए. होतांच, त्याप्रमाणें त्यांनीं त्यांना सुचविलेंही. पण चिपळूणकरांनीं आपल्या आयुष्याची दिशा यापूर्वीच ठरविली होती. वकिलीच्या धंद्याचा तर त्यांना उपजत तिटकारा होता; व कायद्याच्या अभ्यासाचीही मुळींच आवड नव्हती. शास्त्रीबुवांनीं या बाबतींत त्यांना कोणत्याही रीतीचा आग्रह मात्र केला नाहीं. पुढें निबंधमालेच्या आठव्या अंकांत, हिंदुस्थानाच्या इतिहासाविषयीं लिहितांना, चिपळूणकरांनीं इंग्रज लेखकांवर केलेल्या कडक टीकेबद्दल ज्या वेळीं कँडीसाहेबांकडून शास्त्रीबुवांकडे गाऱ्हाणें आलें, त्या वेळीं पुन्हा एकदां त्यांनीं चिरंजीवांजवळ वकिलीच्या स्वतंत्र धंद्याची शिफारस केली. पण चिपळूणकरांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. शास्त्रीबुवांची वाङ्मयसेवेची कल्पना काव्यशास्त्रविनोदापलीकडे गेली नसावी, असें वाटतें. देशसेवेच्या आणि देशाभिमानाच्या अभिनव आणि प्रखर भावना त्या काळच्या लोकांना विशेष परिचित नव्हत्या. शास्त्रीबुवांची प्रतिभाही तत्कालीन रूढ विचारांतच रुळलेली होती. नवीन विचारांचें किंवा नवीन भावनांचें उच्छृंखळ भासणारें वारें सहन करा-

वयाला मनाचा जो कणखरपणा लागतो, तो त्यांच्या ठिकाणीं नव्हता. ते स्वतः गरिबींतून वर येऊन स्वतःच्या गुणांनीं आणि त्या गुणांची बूज करणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या स्नेहभावामुळें इतक्या श्रेष्ठ पदवीला चढलेले होते. त्यामुळें त्यांना साहजिकच असें वाटे कीं, आपल्या मुलानेंही, अधिकाऱ्यांचें मन न मोडतां, आहे या स्थितींतच शक्य तर हातपाय हलवावे. अर्थातच निबंधमालेंतील विचारस्वातंत्र्याचें सडेतोड धोरण त्यांना संमत होणें शक्य नव्हतें. ते स्वतः होऊन निबंधमाला क्वचितच वाचीत असत. पण तिच्यांतील टीकात्मक विवेचनाविषयीं होणारा गवगवा त्यांच्या कानांवर गेल्याशिवाय रहात नसे; व त्यामुळें, हा मुलगा असल्या या निर्भीड लेखनानें स्वतःवर केव्हां तरी भलताच प्रसंग ओढवून घेईल, असेंही भय त्यांना वाटे. वडिलांचे हे किंवा अशा तऱ्हेचे विचार चिपळूणकरांनीं कधींच मनावर घेतले नाहींत. त्याला कारण पित्याविषयींची अनादरबुद्धि किंवा अप्रेम मात्र बिलकुल नव्हे; तर केवळ स्वीकृत कार्यावरील आत्यंतिक निष्ठा हें होय. चिपळूणकर हे जितके देशभक्त तितकेच पितृभक्त होते. मात्र प्रसंग पडला असतां या दोन्ही भक्तींत ते योग्य तोच तरतमभाव ठेवीत.

उभयतां पितापुत्रांत जरी अशा तऱ्हेचा मतभेद होता, तरी त्यामुळें शास्त्रीबुवांच्या योग्यतेला व त्यांच्यापासून चिपळूणकरांना मिळालेल्या स्फूर्तीला बिलकूल कमीपणा येत नाहीं. चिपळूणकरांनींही, वडिलांपासून फक्त स्फूर्तिस्फुलिंग तेवढा घेऊन, नंतर त्यांच्या उत्तेजनाची किंवा साहाय्याची अपेक्षा न करितां, सर्व महाराष्ट्रभर स्वदेशाभिमानाची प्रचंड ज्योत प्रज्वलित केली, यांत त्यांचें लोकोत्तर प्रतिभास्वातंत्र्य दिसून येतें. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें महत्त्व आज जरी विशेष वाटलें नाहीं, तरी त्यांच्या काळचे ते असामान्य पुरुष होते, हें निर्विवाद होय. त्यांचा उदय होईपर्यंत मुंबई हेंच मराठी भाषेच्या व्यासंगाचें आणि लेखनाचेंही केंद्र होतें. मुंबई शहर हें प्रथमपासूनच

इंग्रजी अंमलाखालीं असल्याकारणानें, अंशतः मिशनरींच्या व अंशतः सरकारच्या प्रयत्नांमुळें, मराठी भाषेच्या पद्धतशीर शिक्षणाला तिथें पूर्वीच प्रारंभ झालेला होता. उलट, पेशवाई नष्ट झाल्यानंतरही, विश्रामबाग वाड्यांतील पाठशाळेच्या रूपानें, संस्कृत विद्येच्या अध्ययनाचें केंद्र पुण्यास कायमच राहिलें; व पुढें या शाळेला इंग्रजी वर्ग जोडण्यांत येऊन, कँडीसाहेबांच्या नेतृत्वाखालीं जरी कालांतरानें तिचें रूपांतर पूना कॉलेजांत झालें, तरी त्यामुळें संस्कृत विद्येच्या वर्चस्वाला ढळ पोंचला नाहीं. किंबहुना, संस्कृत आणि इंग्रजी या दोन उत्कृष्ट अभिजात भाषांचा संयोग या पाठशाळेच्या शिक्षणक्रमांत झाल्यामुळें, तिच्यांतून बाहेर पडलेल्या कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या विद्यार्थ्यांनीं, आपल्या या दुहेरी व्यासंगानुसार, मराठी भाषेला पुढें नवीन वळण लाविलें. मुंबईच्या मराठी शिक्षणपद्धतीचा संबंध संस्कृत भाषेपेक्षां इंग्रजी भाषेशींच जास्त होता. शिवाय, स्वतःला मराठी भाषेचे केवळ अभिमानीच नव्हे, तर अभिज्ञही म्हणविणाऱ्या मिशनरींचें प्राबल्यही तिथें फार होतें. त्यामुळें छत्रे, हरि केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, माडगांवकर प्रभृति तेथील लेखकांची भाषा संस्कृतापासून सर्वथैव अलिप्त व अगदीं घरगुती वळणाची होती. शास्त्रीबुवांच्या ग्रंथकर्तृत्वामुळें, या बाल्यावस्थेंत असलेल्या भाषेला प्रौढ स्वरूप प्राप्त होऊन, मराठी वाङ्मयाचें केंद्र मुंबईतून उठून पुण्यास आलें. परशुरामपंत तात्या गोडबोले व लोकहितवादी हे त्यांच्या पूर्वीचे पुण्यांतील प्रमुख ग्रंथकार म्हणून सांगतां येतील. पण, तात्यांच्या भाषेंत गोडवा असला, तरी अभिजात रचनेचें सौष्ठव अगदीं नाहीं; व लोकहितवादींचें लिखाण तर वाङ्मयगुणांच्या दृष्टीनें निकृष्टच म्हणावें लागेल. अर्थात् ग्रंथरचनेच्या बाबतींत पुण्याचें महत्त्व महाराष्ट्रांत प्रस्थापित व्हावयाला शास्त्रीबुवांची प्रसन्न लेखणीच मुख्यतः कारण झाली. त्या दृष्टीनें, मराठी भाषेच्या लेखनशैलींत जें प्रभावी परिवर्तन चिपळूणकरांनीं नंतर घडवून आणलें,

त्याच्या प्रवर्तनाचा मान शास्त्रीबुवांना दिला, तर तें यथार्थच होईल त्यांची सौम्य व प्रसन्न भाषाशैली पुढें निबंधमालेंत ओजस्वी व अलंकृत होऊन अवतरली.

वाङ्मयव्यवसायाच्या बाबतींत जसा या पितापुत्रांचा मतभेद होता, तसाच तो इतरही बाबतींत होता. शास्त्रीबुवा अज्ञेयवादी होते, हें त्यांच्या शेवटच्या दुखण्यांतील उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. प्रचलित धर्मसमजुतींना ते मान देत असत; पण तो केवळ लोकविरुद्ध आचरण करण्याची इच्छा किंवा धमक नव्हती म्हणून. शास्त्रीबुवांप्रमाणें चिपळूणकरांचाही रूढ आचारांवर विश्वास नव्हता; पण ते कांहींसे सश्रद्ध होते. तरुणपणीं शास्त्रीबुवा फार मानी व स्वतंत्र वृत्तीचे होते. परंतु ही त्यांची वृत्ति कालांतरानें शिथिल होत गेली. कदाचित् त्यांना स्वीकारलेल्या सेवाधर्माचाही हा परिणाम असेल. सेवाधर्म हा स्वाभिमानाला अत्यंत मारक असतो. राष्ट्राचा तेजोवध जसा पारतंत्र्यानें होतो, तसा व्यक्तीचा सेवाधर्मानें होतो. एकाद्या अति वेगवान् भोंवऱ्यांत सांपडल्यावर, त्याला फोडणें अशक्य होऊन, पोहण्याच्या कामांत तरबेज असलेलाही मनुष्य जसा अखेर त्याच्या आधीन होतो, तशीच स्थिति सरकारी नोकरींत पडलेल्या स्वतंत्र विचारांच्या मनुष्याची होते. सेवावृत्तींत शिरल्यावर त्याचें विचारस्वातंत्र्य हळू हळू नष्ट होत जातें. याही नियमाला अपवाद निघत नाहींत, असें नव्हे. खुद्द चिपळूणकर हेही सरकारी नोकरच होते. पण नोकरींत त्यांना कधींच सुख वाटलें नाहीं. आणि, वडिलांच्या मुर्वतीखातर जरी त्यांनीं सेवावृत्ति बरेच दिवस सहन केली, तरी त्यांच्या मृत्यूनंतर संधि सांपडतांच तो पाश तडफेनें तोडून टाकिला. याला कारण तरी कसाबसा दडपून ठेवलेला त्यांचा जाज्वल्य स्वाभिमानच होय. तारुण्यांत मनुष्य भावनावश व बेपर्वा असतो. त्याच्या ताज्या रक्ताला व उमद्या मनाला कोणत्याच प्रसंगाची फिकीर सहसा वाटत नाहीं. पूर्ववयांत शास्त्रीबुवांनीं प्रकट केलेला स्वाभि-

मान कदाचित् अशाच तऱ्हेचा असेल. पण चिपळूणकरांचा स्वाभिमान किंबहुना त्यांची प्रत्येक भावना आग्रहपूर्वक बनलेली होती. त्यांत ठिसूळ किंवा लवचिक असें कांहींही नव्हतें. अनेक ग्रंथांच्या मननानें किंवा परिस्थितीच्या सूक्ष्म अवलोकनानें त्यांचे विचार बनलेले नव्हते. प्रत्येक तत्त्वाच्या व अनुभवाच्या मुळाशीं जाऊन त्याची मीमांसा करणाऱ्या तत्त्वज्ञाप्रमाणें त्यांचा स्वभाव चिकित्सक नव्हता. ते मितभाषी असले, तरी भावनोत्कट स्वभावाचे होते. आणि म्हणूनच, निव्वळ भाषेच्या लखलखाटानें व अलंकारांच्या गजबजाटानें बुद्धिमान् वाचकालाही दिपवून त्याच्यावर आपली छाप बसविणारा, प्रतिभासंपन्न परंतु उथळ ग्रंथकार मेकॉले हा त्यांचा आवडता लेखक होता. बाळपणीं व पुढें विद्यार्थिदशेंत असतांना त्यांच्या भावनोत्कट मनावर जे बरेवाईट संस्कार एकदां झाले, त्यांनींच त्यांच्या विचारांना व मतांना एक विवक्षित स्वरूप दिलें. तें स्वरूप नंतर कधींही फारसें बदललें नाहीं.

बाळपणीं चिपळूणकरांना आजाआजींचा सहवास घडला. या दोन्ही माणसांनीं स्वराज्य पाहिलेलें होतें. त्यांचें आचरण अत्यंत शुद्ध, सत्त्वशील व भाविकपणाचें होतें. शास्त्रीबुवांचा रंगेलपणा त्यांना खपत नसे. पण त्या बाबतींत त्यांना मूग गिळणें भाग पडे ! या आजाआजींचें वळण चिपळूणकरांना लागलें. तत्कालीन सुशिक्षितांच्या गुणावगुणांचे शास्त्रीबुवा हे एक उत्तम नमुना होते. त्यांच्या वर्तनाविषयीं घरांत जें एकंदर प्रतिकूल मत होतें, त्याचा कांहींच परिणाम चिपळूणकरांवर झाला नसेल, असें वाटत नाहीं. किंबहुना, आपल्या बुद्धिमान् व बहुश्रुत पित्याचा, नवीन विद्येमुळें व परिस्थितीमुळें झालेला, नैतिक अधःपात पाहूनही कदाचित् चिपळूणकरांचें मन त्या विद्येला व परिस्थितीला आणि त्यांनीं उत्पन्न केलेल्या सुशिक्षितवर्गाला विटलें असेल. त्यांनीं घरांतून बाहेर दृष्टि फेंकली, आणि विद्यालयाच्या नवीन जगांत प्रवेश केला, तेव्हां तिथेंही

त्यांना असलेच अश्लाघ्य प्रकार दिसले. शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं जो एक प्रकारचा विद्वत्तेचा आब असे, तोही तिथें नव्हता. उलट पल्लवग्राही पांडित्य व त्याला अनुरूप असा थिल्लरपणा मात्र भरपूर होता. त्या वेळीं एकंदर समाजाप्रमाणें विद्यार्थ्यांचीही नीतिमत्ता बिघडलेली होती. पाश्चात्य सुधारणेच्या संसर्गामुळें स्वधर्म, स्वभाषा आणि स्वदेश यांच्याविषयींच्या तुच्छतेची जी सर्वंकष लाट उठली होती, तिच्या तडाक्यांत सांपडून शिक्षणाचा संस्कार झालेले समाजांतले सारे वर्ग वहावत चालले होते. त्यांच्या वर्तनाला व विचारांना धरबंध म्हणून उरला नव्हता. आणि हें सारें बेसुमार वर्तन सुधारणेच्या नांवाखालीं चाले! कांहींनीं सामुदायिक रीतीनें पावरोटी खाऊन जातिभेद मोडावयाला प्रारंभ केला; कांहींनीं ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेऊन सत्य ज्ञानाची दिवटी पाजळली; तर कांहींनीं उत्तान नावलें लिहून लोकांच्या भोगलालसेला उत्तेजन दिलें. वेश्येच्या नाचाशिवाय विवाहाचा समारंभ, मदिरेच्या सेवनाशिवाय क्लबाची मजलस आणि स्वधर्माच्या नालस्तीशिवाय सुधारणेचा उपक्रम पार पडेनासा झाला! आज आर्यसमाजांत जाऊन मुक्तकंठानें वेदघोष करावा, उद्यां प्रार्थनासमाजाच्या वेदीवरून अर्धोन्मीलित नेत्रांनीं इंग्रजींत उपासना चालवावी आणि परवां पायांत चाळ बांधून अष्ट सद्भावांच्या धुंदीमध्यें भजन करित नाचावें, असले बुद्धिभ्रंशाचे विचित्र प्रकार मोठमोठ्या ज्ञात्यांच्याही ठिकाणीं दृष्टीस पडूं लागले. घर, घराबाहेर विद्यालय आणि विद्यालयाबाहेर सुविध समाज यांची नवीन विद्येनें व परिस्थितीनें केलेली ही दुर्दशा पाहून चिपळूणकरांच्या भावनोत्कट मनाला खचित पीळ पडला असेल. इंग्रजी वाङ्मयाचा व्यासंग घडल्यामुळें कर्तव्यबुद्धि जागृत होऊन ज्यांनीं स्वभाषेच्या किंवा स्वदेशाच्या सेवेंत जीवित घालवावयाचें, त्यांची अशी बौद्धिक अवनति झालेली पाहून सुशिक्षितवर्गाविषयीं चिपळूणकरांना तिटकारा आला असला, तर नवल काय?

जुन्या विचारांत वाढलेल्या आजाआजींची बालबोध रहाणी व पवित्र विचारसरणी आणि नवीन धर्तीनें शिकलेल्या आपल्या वडिलांचें व बहुतेक सुशिक्षितांचें चैनीचें बेपर्वा वर्तन यांतील तीव्र विरोध सतत अनुभवानें मनावर बिंबून, सुधारणेच्या सर्वच प्रकारांविषयीं त्यांचें मन पुढें संशयखोर झालें असावें, असें वाटतें. जुन्या व रूढ समजुतींचें समर्थन करण्याकडे, किंवा निदान त्यांचें दोषाविष्करण तरी न करण्याकडे, त्यांची जी नंतर प्रवृत्ति असे, तिला कदाचित् हें एक सबळ कारण असेल.

चिपळूणकरांना स्वभाषेची सेवा करण्याची इच्छा जरी इंग्रजी वाङ्मयाच्या व्यासंगानें झाली असली, तरी त्यांना देशाभिमानाची स्फूर्ति मात्र त्या वाङ्मयापासून मिळालेली नव्हती. त्या वेळच्या इतर कित्येक पुढाऱ्यांप्रमाणें स्वतःला ब्रिटिश संस्कृतीचे प्रसव म्हणवून घेण्यांत त्यांनीं कधींही धन्यता मानली नाहीं. त्यांचा देशाभिमान सर्वथैव स्वयंस्फूर्त असून, त्याचा उगम भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठतेवर असलेल्या विश्वासांत झालेला होता. हा अभिमान इतक्या प्रखरतेनें उद्दीपित व्हावयाला इंग्रजी अंमलामुळें उत्पन्न झालेली उपमर्दकारक परिस्थितीच मुख्यतः कारण झाली. देशांत जसजसा नवीन विद्येचा प्रसार होऊं लागला, तसतशी जुनी विद्या मागें पडत चालली. नवीन सुशिक्षितांपुढें शास्त्रीवैदिकांचें तेज न पडून त्यांचा हळुहळू उपहासही होऊं लागला. वस्तुतः, रूपांतरित ग्रंथ आणि कोश निर्माण करून, अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा पाया याच शास्त्रीमंडळीनें घातलेला होता. पण त्या भाषेलाच हीन समजणाऱ्या सुशिक्षितांना त्यांच्या परिश्रमांचें महत्त्व काय होय! संस्कृत विद्येचा सरकारदरबारींही फारसा मान राहिला नाहीं. त्यामुळें जुन्या पद्धतीनें पढलेल्या ब्राह्मणवर्गांत इंग्रजी विद्या आणि इंग्रजी राज्य यांच्याविषयीं अप्रेम उद्भवलें; व त्याबरोबर नुकत्याच नष्ट झालेल्या स्वराज्याची स्मृतिही तीव्र-

तेनें जागृत होऊं लागली. स्वधर्मप्रसाराच्या अनिवार लालसेनें विवेकभ्रष्ट होऊन ख्रिस्ती मिशनरींनीं रस्तोरस्तीं चालविलेल्या हिंदुधर्माच्या वाष्कळ निंदेमुळें हें अप्रेम अधिकच बळावलें. त्यांतही, सुशिक्षितवर्गाला धर्मा-विषयीं जर कांहीं आस्था असती, तर या स्थितीचें लोकांना इतकें वैषम्य कदाचित् वाटलें नसतें. परंतु, स्वधर्माविषयीं त्यांना आस्था तर नव्हतीच, उलट तिटकारा मात्र होता. विद्यार्थिदशेंत असतांना चिपळूणकरांच्या भोंवतीं हें आंतून धुमसणाऱ्या अप्रेमाचें वातावरण होतें. या वातावरणांत त्यांच्या विचारांची वाढ झाली, त्यांच्या मनाला वळण मिळालें. त्यांना समजूत येण्याच्या सुमारास सत्तावन सालचें बंड झालें. त्या बंडाची ऐतिहासिक उपपत्ति कांहींही असो. पण, नष्ट झालेल्या स्वराज्याच्या व निस्तेज झालेल्या स्वधर्माच्या पुनरुज्जीवनाचा तो अखेरचा अयशस्वी प्रयत्न होता,—परतंत्र झालेल्या क्षात्रवृत्तीची स्वतंत्र होण्याची ती शेवटची धडपड होती, असाच त्या बंडाविषयीं तत्कालीन लोकांचा समज होता. खुद्द महाराष्ट्रापर्यंत त्या बंडाच्या ज्वाळा जरी पोंचल्या नसल्या, तरी महाराष्ट्रीय वीरांनींच तो अग्नि चेतविलेला होता. महाराष्ट्राच्या वीरवृत्तीचें जें अत्युग्र तेज त्या बंडांत प्रकट झालें, त्यानें सर्व जगाला क्षणभर स्तिमित केलें. सत्तावन सालच्या बंडाची ही ओजस्वी करुणकहाणी महाराष्ट्रभर अगदीं आबालवृद्धांच्या तोंडीं झाली होती. पानिपताच्या युद्धानंतर सर्व महाराष्ट्राला हलवून सोडविणारें जर कोणतें अद्भुतरम्य वीरचरित झालें असेल, तर तें हें सत्तावन सालचें बंडच होय. त्या बंडाच्या रमणीय परंतु हृदयद्रावक कथा ऐकून चिपळूणकरांच्या बालमनांत कोणत्या भावनांचे उद्रेक उचंबळले असतील ? स्वदेशाच्या उद्धारासाठीं ज्यांनीं धारातीर्थीं कंठ-स्नान केलें आणि त्याच्या उत्कर्षाकरितां ज्यांनीं समरांगणावर शौर्याची शर्थ केली, त्या नरवीरांचे पोवाडे आणि आख्यायिका ऐकण्याचा त्यांना अतिशय नाद होता. ऐतिहासिक विभूतींच्या रसभरित

आख्यायिका त्यांनीं हरिशास्त्री पंडित या वृद्ध पण वक्तृत्वसंपन्न गृहस्थाच्या तोंडून ऐकिल्या. त्या सरस कथा ऐकत असतांना चिपळूणकरांचें अगदीं देहभान हरपत असे. मराठशाहीचा नाश होऊन अद्याप पुरतीं पन्नास वर्षेंही लोटलेलीं नसल्यामुळें, तिच्रीं निरनिराळ्या प्रकारच्रीं मूर्तामूर्त स्मारकें सभोंवतीं सारखीं वावरत होतीं; व सत्तावन सालच्या बंडांतून जीव बचावून परत आलेले शिपाई गडी, कुठें शागीर्दाचा तर कुठें गोंधळ्याचा पेशा पत्करून, लपत छपत गुजराण करित होते. त्यामुळें तत्कालीन पुण्यांत केवळ स्वराज्याची स्मृतीच नव्हे, तर स्वातंत्र्याची स्फूर्तीही जिवंत आणि जागृत होती.

अशा प्रकारच्या ऐतिहासिक वातावरणांत चिपळूणकरांच्या देशाभिमानाची वाढ झाली. या परिस्थितींत त्यांचे जे विचार एकदां बनले, त्यांना पोषक होईल असें वाङ्मय त्यांनीं पुढें वाचलें. त्या विचारांना प्रतिकूल असें जें कांहीं त्यांना आढळलें, त्याचा त्यांनीं उपहास केला. त्यांचें मन संवेदनक्षम असलें,तरी अनुकूल तेवढ्याच संस्कारांचें तें ग्रहण करीत असे. किंबहुना, असेंही म्हटलें असतां चालेल कीं, एका विशिष्ट काळानंतर नवीन विचार आकलन करण्याची त्याची शक्ति लोपली. इंग्रजी सारस्वताचें परिशीलनही त्यांनीं केवळ वाङ्मयानंदाच्या गोडीनें केलें होतें. त्यांतील नवीन विचार ग्रहण करण्याची इच्छा त्या परिशीलनाच्या मुळाशीं असेल, असें वाटत नाहीं. राजकारणाचा अभ्यास करावा म्हणून किंवा जगांतील विचारौघांची ओळख करून घ्यावी या उद्देशानें त्यांनीं कोणत्याच वाङ्मयाचा व्यासंग केला नाहीं. सुंदर भाषा, उज्ज्वल कल्पना, हृद्यंगम भावना, सरस सुभाषितें, मनोहर अर्थचमत्कृति यांचेंच वेड त्यांना नवीन विचारांपेक्षां किंवा गहन तत्त्वज्ञानापेक्षां अधिक होतें. युरोपांत ज्या अभिनव सामाजिक तत्त्वज्ञानाचा व स्वातंत्र्याच्या चळवळींचा उदय त्या वेळीं

झाला होता, त्याकडे त्यांचें लक्ष वेधलेलें दिसत नाहीं. नवीन विचारांचा ओघ इंग्रजी भाषेंत वाहता करणाऱ्या एकोणिसाव्या शतकांतील क्रांतिकारक लेखकांच्या ग्रंथांपेक्षां, ज्यांनीं आपल्या लेखनानें इंग्रजी भाषा सजविली आणि जनमनें रिझविलीं, अशाच लेखकांच्या सुरस ग्रन्थांचें वाचन त्यांनीं फार केलें होतें. तौलनिक दृष्टीनें आणि सूक्ष्म बुद्धीनें ग्रंथपरिशीलन करणाऱ्या मननशील व्यक्तींच्या विचारांना व मतांना जें विशाल व उदात्त स्वरूप येतें, तें चिपळूणकरांच्या विचारांना व मतांना अर्थातच कधींही आलें नाहीं. त्यांनीं निर्माण केलेलें वाङ्मयही त्यांच्या मनोवृत्तीप्रमाणें आहे. त्यांची मूळची भूमिका पाहिली, तर ती वाङ्मयप्रेमी रसिकाची दिसते. पण, देशाच्या दुर्धर स्थितीचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें सदैव असल्यामुळें, आपल्या रंगेल वडिलांप्रमाणें, केवळ वाङ्मयानंदाच्या उपभोगांतच आयुष्य न घालवितां, त्यांनीं देशोन्नतीला पोषक अशीं निरनिराळीं कार्यें अंगावर घेतलीं. त्यांच्या निबंधमालेंत रसिकतेप्रमाणेंच देशाभिमानाचाही जो दुर्दम ओघ अविच्छिन्न वहातांना दृष्टीस पडतो, त्याचेंही मर्म झालें तरी हेंच होय. किंबहुना, स्वभाषेची वास्तविक योग्यता लोकांचा प्रत्ययाला आणून देण्यासाठीं त्यांनीं हातांत लेखणी धरल्यामुळें, तिच्या अवनतीला पर्यायानें कारण झालेल्या पारतंत्र्याविषयींची चीड आपोआपच प्रकट होऊन, त्यांच्या लेखांना इतकी उज्ज्वलत्ता आली. निबंधमालेंतील वाङ्मय सुंदर आहे पण सखोल नाहीं, उद्दीपक आहे पण उदात्त नाहीं. चिपळूणकरांच्या अत्युत्कट देशाभिमानाची भावना सर्वत्र भरलेली असल्यामुळें तिचें स्वरूप उदात्त वाटतें; व त्या दृष्टीनें तें खचित उदात्त आहेही. पण, विचारांच्या विशालतेमुळें जी उदात्तता तत्त्वजिज्ञासु ग्रंथकारांच्या लेखनाला येत असते, तिचा आढळ मात्र निबंधमालेंत होत नाहीं. उलट सभोंवतालच्या खळबळीचें प्रतिबिंब तींत पडलेलें असल्यामुळें, तिच्या केवळ विचारगांभीर्यालाच नव्हे, तर वाङ्मयगौरवालाही ढळ पोंचला

आहे. चिपळूणकर परमतसहिष्णु नव्हते. इतरांच्या दृष्टीनें स्वदेशाला श्रेयस्कर असणाऱ्या कांहीं चळवळी त्यांना व्यर्थ किंबहुना विघातक वाटत; व म्हणून ते त्यांवर कठोर टीका करीत. ही टीका पुष्कळदां भ्रामक असे. परिस्थितीचें सर्वस्पर्शी आकलन व्हावयाला जी प्रचलित चळवळींची सूक्ष्म माहिती असावी लागते, ती त्यांना बिलकूल नसे. कारण, वर्तमानपत्रें वाचण्याचा त्यांना मनस्वी कंटाळा असल्यामुळें, केवळ 'ज्ञानप्रकाशा'च्या मदतीनें ते स्वदेशांतील व सर्व जगांतील उलाढालींचें ज्ञान करून घेत! असल्या ज्ञानावर भरंवसून केलेली टीका भ्रामक असली तर नवल नाहीं. ते स्वभावतःच संकोची आणि मुखदुर्बळ असल्यामुळें समाजांत मिळूनमिसळून वागणें त्यांना फारसें रुचत नसे. शिवाय, वर्तमानाच्या दंगलींत उत्साहानें मन घालून त्याच्या निरनिराळ्या आविर्भावांचें मर्म समजावून घेण्यापेक्षां, भूतकाळाच्या प्रशांत वातावरणांत विहार करणेंच त्यांच्या प्रतिभेला अधिक प्रिय असल्यामुळें, समाजांतील उलाढालींपासून अलिप्त अशा स्थितींतच त्यांचें बहुतेक आयुष्य गेलें. ललित कलांविषयीं मात्र त्यांना, आपल्या वडिलांप्रमाणेंच, अगदीं अलोट प्रेम होतें. दक्षिण विद्यालयांत झालेल्या संस्कृत नाट्यप्रयोगांत त्यांनीं हौसेनें भाग घेतला होता. पण शास्त्रीबुवांप्रमाणें त्यांचें हें प्रेम भलत्याच थराला मात्र कधींही वाहवलें नाहीं. वस्तुतः, त्यांच्या कुटुंबाची प्रकृति रोगट असल्यामुळें, त्यांना संसारसुख कधींच फारसें लाभलें नाहीं; व त्यांनीं दुसरें लग्न करावें, असाही आग्रह त्यांच्या आप्तमंडळीनीं त्यांना केला होता. पण, त्या निग्रही पुरुषानें, सुखाच्या किंवा संततीच्या न्यूनतेबद्दल यत्किंचितही विषाद न मानतां, केवळ विद्याव्यासंगांत निष्कलंक जीवन घालविलें.

विद्यार्थिदशेंतून बाहेर पडून वाङ्मयसंसारांत प्रवेश करितांना चिपळूणकरांच्या मनाची घडण अशा तऱ्हेची होती. त्यांच्या भाषांतरित लेखनाला जसा शालापत्रकांतून आरंभ झाला, तसाच स्वतंत्र लेखनालाही

झाला. चिपळूणकरांनीं लेखनसंसारांत मन घातल्यावर शास्त्रीबुवांनीं आपला हात त्यांतून अजिबात काढून घेतला; व स. १८७१ सालानंतर चिपळूणकरच शालापत्रकाचें बहुतेक सर्व काम पाहूं लागले. स. १८७२ पासून १८७५ पर्यंत शालापत्रक त्यांच्या हातून निघालें व पुढें तें बंद पडलें. चिपळूणकरांचें नांवाजण्यासारखें असें स्वतंत्र लेखन शालापत्रकांत फक्त तीनच वर्षें प्रसिद्ध झालें. पुढेंही आणखी एक वर्ष त्यांनीं शालापत्रक चालविलें. पण स. १८७४ सालापासून निघालेल्या निबंधमालेवरच त्यानंतर त्यांचा विशेष भर असे. या चार वर्षांच्या अवधींत चिपळूणकरांचे शालापत्रकांत जे निबंध प्रसिद्ध झाले, त्यांचे भाषांतरित व स्वतंत्र असे दोन भाग पडतात. भाषांतरांत शालोपयोगी लेखांचे तर्जुमे अधिक आहेत. हे तर्जुमे वगळल्यास वाङ्मयदृष्टीनें महत्त्वाचे असे लेख दोन तीनच राहतात. त्यांत ‘चंद्र आणि तारे’ व ‘मनुष्याचें आटोकाट ज्ञान’ हे दोन लेख उत्तम आहेत. यांपैकीं दुसऱ्या लेखाच्या आरंभीं जो खुलासा जोडलेला आहे, त्यावरून स्त्रीशिक्षणाविषयीं चिपळूणकरांना किती कळकळ वाटत होती, हें स्पष्ट दिसून येतें. शालापत्रकाच्या वाचकांना स्त्रीशिक्षणाची आवश्यकता पटावी, म्हणूनच त्यांनीं तो भाषांतरित लेख त्यांत मुद्दाम दिला होता. ‘समुद्र’ हा लेखही रूपांतरित असून त्यांतील कल्पना मनोहर आहेत. स्वतंत्र लेखांत कांहीं अभिप्राय आहेत. चिपळूणकरांची पुस्तकांवरील टीका कडक असे, असें म्हणणाऱ्यांना हे अभिप्राय खचित निरुत्तर करितील. स्वतंत्र लेखांपैकीं ‘प्रवास’ व ‘शिक्षकाचें काम’ हे लेख चांगले आहेत. ‘शिक्षकाचें काम’ या लेखांत आणि ‘नौकानयनाचा इतिहास’ या पुस्तकावरील अभिप्रायांत चिपळूणकरांनीं नवीन सुशिक्षित मंडळीच्या दुर्गुणांचा पुष्कळच उपहास केला आहे. निबंधमालेंत पुढें ज्या मतांचा व विचारांचा त्यांनीं आपल्या जोरदार वाणीनें पुरस्कार केला, त्यांच्या छटा शालापत्रकांतील लेखांतूनही पहावयाला सांपडतात. ‘प्रवास’ या लेखाच्या शेवटीं, “किं सुखमप्रवासगम-

नम्'हें भर्तृहरिवचन उद्धृत करून, प्रवासाच्या बाबतींत प्राचीन काला-पासून जें अननुकूल मत हिंदु समाजांत चालत आलें आहे, त्याचा त्यांनीं निषेध केलेला आढळतो.

शालापत्रकांतील चिपळूणकरांचे उत्कृष्ट निबंध सर्वच काव्यविषयक आहेत. चिपळूणकर कवितेचे किंबहुना एकंदर ललित वाङ्मयाचे अत्यंत भोक्ते होते. वनसृष्टीला जशी लता, जीवसृष्टीला जशी वनिता तशी शब्दसृष्टीला कविता होय. वाङ्मयाची खरी लज्जत ज्याला कळते, तो कवितेचा नादी क्वचितच नसतो.

**म्लानस्य जीवकुसुमस्य विकासनानि ।**
**संतर्पणानि सकलेंद्रियमोहनानि ॥**

हें रामचंद्रानें केलेलें आपल्या दयितेच्या सुवचनांचें वर्णन कवितेलाही लागू पडतें. परब्रह्माचा साक्षात्कार जसा भक्तीनें होतो, तसा शब्द-ब्रह्माचा साक्षात्कार कवितेनें होतो. कविता ही वाङ्मयांत अनेक रूपांनीं अवतरते. तिचें स्वरूप नेहमींच छंदोमय असतें, असें नाहीं. परंतु, वसंतसेना ही जशी आपल्या अंगावरील फुलांच्या सुवासानें व भूषणांच्या सिंजितानें अंधारांतही विटाला ओळखतां आली, तशी कविता आपल्या भावनांच्या कोमलतेनें व कल्पनांच्या सुंदरतेनें रसि-काला गद्यांतही तेव्हांच ओळखूं येते. विविध रूपांनीं शब्दविश्वांत संचरणाऱ्या या कामरूपिणी अप्सरेला रसिकांनीं आनंददायक वाङ्मयाची अधिदेवता मानिली असून, वाङ्मयाच्या ज्या ज्या प्रदेशांत म्हणून तिचा संचार होतो, त्या त्या सर्व प्रदेशाला त्यांनीं ‘ ललित वाङ्मय ’ ही सामान्य संज्ञा दिली आहे. स्वतःच्या विकार-विचारांचें व सुखदुःखांचें हुबेहूब प्रतिबिंब ललित वाङ्मयांत पडलेलें पाहून सामान्य जनांना साहजिकच आनंद वाटतो; व तें ओळखीचें वाङ्मय त्यांना फार आवडतेंही. शास्त्रीय ग्रंथांऐवजीं मराठींत होणारी ललित वाङ्म-

याची वाढ पाहून कित्येकांना विषाद वाटतो. पण हा त्यांचा विषाद मनुष्यस्वभावाच्या ज्ञानाला धरून नाहीं. फुलांपेक्षां फळांची अधिक निपज होणें हें उपयुक्ततेच्या दृष्टीनें जरी कितीही इष्ट असलें, तरी असा सहृदय मनुष्य क्वचितच आढळेल कीं, जो फुलांना पाहिल्यावर क्षणभर तरी असला नीरस उपयुक्ततावाद विसरणार नाहीं ! ललित वाङ्मयाचा फुलबाग पाहून ज्याचे डोळे निवणार नाहींत व मन हरखणार नाहीं, तो मनुष्यच नव्हे. आतां त्यांत सृष्टिनियमाप्रमाणें बऱ्यावाईटाची भेसळ ही असणारच. अशी भेसळ अगर अधम वाङ्मयाची निष्पत्ति होऊं न देण्याचा एकच उपाय आहे; व तो म्हणजे, एकंदर ललित वाङ्मयाची रहस्यदृष्टीनें छाननी करणें, हा होय. ही जाणीव असल्यामुळें ललित वाङ्मयाचे भक्त हेच बहुधा त्याचे चिकित्सक असतात. चिपळूणकर हे जसे रसिक तसेच मार्मिक टीकाकारही होते. मराठींत टीकात्मक प्रबंध लिहिण्याचा प्रघात प्रथम त्यांनींच पाडला, असें म्हणावयाला हरकत नाहीं. परशुरामपंततात्या गोडबोले किंवा दादोबा पांडुरंग यांनींही प्रसंगवशात् टीकात्मक विवेचन केलेलें आहे. पण त्यांची टीकापद्धति सर्वांगस्पर्शी नाहीं. वाक्यांतील शब्दांची संगति दर्शवून अन्वयमुखानें अर्थबोध करणें, हा जरी 'टीका' या शब्दाचा प्राचीन अर्थ असला, तरी त्या शब्दाची व्याप्ति पाश्चात्य देशांतून अलीकडे अतिशय वाढली आहे. 'उक्त, अनुक्त व दुरुक्त' यांच्या विस्तृत विवरणाबरोबर 'अमूल व अनपेक्षित' अशा परिस्थितीचा आणि इतरही अनेक आनुषंगिक गोष्टींचा विचार अलीकडील टीकांतून होत असतो. अर्थबोध व दोषदर्शन हीं टीकेचीं पूर्वीं प्रमुख अंगें असत. परंतु, रहस्य विशद व्हावें या हेतूनें केलेलें परिस्थितीचें सर्वांगीण, सुसंगत व सूक्ष्म पर्यालोचन हेंच टीकेचें अलीकडे प्रधान अंग होऊन बसलें आहे. पूर्वीं अर्थबोध हा टीकेचा हेतु असे; हल्लीं रहस्याचें आकलन हा तिचा हेतु झाला

आहे. संसारी मनुष्याच्या मनाप्रमाणें पूर्वींची टीका बहिर्मुख असे. हल्लींची टीका तत्त्वजिज्ञासु मनुष्याच्या मनाप्रमाणें अंतर्मुख झाली आहे. 'गीतारहस्य' ग्रंथ हा अशा नवीन पद्धतीच्या टीकेचा मराठी भाषेंतील उत्कृष्ट नमुना म्हणून दाखवितां येईल. पूर्वींच्या टीकांतून जसा अर्थविपर्यासाचा संभव असे, तसा हल्लींच्या टीकांतून रहस्यविपर्यासाचा असतो, यांत संशय नाहीं. तरीसुद्धां ही नवीन टीकापद्धति प्राचीन पद्धतीहून निर्विवाद श्रेष्ठ आहे. मराठींत ही टीकापद्धति रूढ झाली आहे, असें म्हणवत नाहीं. कारण बहुतेक टीका दोषदर्शनाच्या किंबहुना निंदेच्या हेतूनें लिहिलेल्या दृष्टीस पडतात.

चिपळूणकरांचे टीकालेख या नवीन धर्तीचे असून ते उच्च दर्जाचे आहेत. या लेखांतील फक्त संस्कृत कवींवरील पांच निबंध तेवढेच वेगळे काढून पुढें एकत्र छापण्यांत आले. या संस्कृत कविपंचकाला प्रास्ताविक निबंध म्हणून चिपळूणकरांनीं, शालापत्रकाच्या स. १८७२ च्या फेब्रुवारीपासून मेपर्यंतच्या अंकांत, 'कविता' या विषयावर सर्वसामान्य विवेचनात्मक असे एकंदर चार लेख लिहिले आहेत. या लेखांतील विवेचन जरी थोडें उथळ वाटलें, तरी तें फार चटकदार आहे. कवितेची व्याख्या पहिल्या लेखाच्या सुरवातीला दिली असून, नंतर कवितेच्या उत्तम, मध्यम व अधम अशा तीन अवस्थांचें थोडक्यांत निरूपण केलें आहे. या लेखांत जुन्या मराठी कवितेविषयीं चिपळूणकरांनीं आपलें मत स्पष्ट शब्दांत नमूद केलें आहे. ते म्हणतात—

"पेशव्यांच्या कारकीर्दींत होऊन गेलेल्या विख्यात पुरुषांवर केलेल्या ज्या लावण्या किंवा पोवाडे आपण ऐकतों तेच वास्तविक पाहतां मराठी भाषेची आद्य कविता होत. कारण वामनपंडित, मोरोपंत वगैरे कवींनीं जरी मराठी भाषेंत कविता लिहिली असली, तरी ती

संस्कृत भाषेच्याच केवळ धाटणीवर असल्यामुळें तीस मराठी कविता म्हणण्यापेक्षां संस्कृत कवितेचें रूपांतर म्हणणें हें वाजवी आहे." मराठी कवितेविषयींचा चिपळूणकरांचा हा अभिप्राय अत्यंत मननीय व मार्मिक आहे, यांत शंका नाहीं. मराठी कवितेला भाषांतरित म्हणणें जसें शक्य नाहीं, तसेंच स्वतंत्र म्हणणेंही कठीण आहे. ती बव्हंशीं परभृत आहे, हें निर्विवाद होय. चिपळूणकरांची जुन्या मराठी कवितेवर फार भक्ति होती. तेव्हां, त्यांनीं दिलेला हा अभिप्राय पूर्वग्रहदूषित आहे, असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं. पुढें मराठी कवितेविषयीं प्रास्ताविक विवेचन करितांना व पंतांच्या कवितेवर लिहितांना 'मराठी कविता भाषांतरित आहे' हा कित्येकांचा आक्षेप त्यांनीं खोडून काढिला आहे. जुन्या मराठी कवितेविषयीं असा अभिप्राय प्रकट करून, नंतर त्यांनीं, काव्याच्या तीन अवस्थांचें दिग्दर्शन करण्याकरितां, इंग्रजी कवितेच्या इतिहासाचा गोषवारा पुढील तीन लेखांत दिला आहे. हा गोषवारा मनोरंजक असला, तरी खोल नाहीं. यानंतर कालिदास, भवभूति, बाणभट्ट, सुबंधु आणि दंडी या संस्कृत कवींवर त्यांनीं विस्तृत निबंध लिहिले आहेत.

संस्कृत कविपंचकाचा परामर्श घेण्यापूर्वी चिपळूणकरांच्या काव्यविषयक मतांचा उगम पाहणें अवश्य आहे. चिपळूणकरांनीं काव्याच्या उत्पत्तिस्थितीवर स्वतंत्र असा विचार मुळींच केलेला दिसत नाहीं. संस्कृत साहित्यचिकित्सक व इंग्रज टीकाकार मेकॉले यांच्या विचारांवरून त्यांनीं आपलीं काव्यविषयक मतें बनविलीं आहेत. मेकॉले व चिपळूणकर यांचा गुरुशिष्यसंबंध होता, असें म्हटल्यास तें अयथार्थ होणार नाहीं. चिपळूणकरांना लेखनस्फूर्ति जशी शास्त्रीबुवांपासून झाली, तशी विचारस्फूर्ति मेकॉलेपासून झाली. त्याचप्रमाणें, शास्त्रीबुवांच्या प्रसन्न व साध्या भाषेचें अनुकरण न करितां, त्यांनीं मेकॉलेच्या डौलदार व जोरकस लेखनशैलीचें अनुकरण केलें आहे.

मेकॉलेची वाणी सावेश व अलंकारिक आहे. त्याच्या वक्तृत्वपूर्ण वाणीच्या अनिरुद्ध ओघांत वाहून न जाणारा मनुष्य विरळा. एकाद्या वस्तूचें किंवा प्रसंगाचें हुबेहूब चित्र दृष्टीपुढें उभें करण्यांत त्याचा अगदीं हातखंडा आहे. विरोधाभास हा अलंकार त्याचा फार आवडता होता; व तो साधण्याच्या धांदलींत त्याच्याकडून प्रसंगीं सत्याचीही पायमल्ली झाली आहे. मेकॉलेच्या भाषेंत नाद, मोहनी व ओजस्विता यांचा मिलाफ झालेला असल्यामुळें भावनावश वाचकांच्या मनावर त्याच्या मतांची छाप तेव्हांच बसते. कमलवनानें शोभणाऱ्या पुष्करिणीला पाहून आल्हाद झाला, तरी मनांत जसे उदात्त विचार उद्भूत होत नाहींत, तशीच स्थिति त्याचे सुंदर निबंध वाचून होते. त्याची बुद्धि अतिशय विशाल असली, तरी कुशाग्र नव्हती. तत्त्वज्ञानाची सूक्ष्म चर्चा किंवा अभिनव व गहन तात्त्विक विचार त्याच्या लेखनांत बिलकूल आढळत नाहींत. जगाच्या विचारांत त्यानें कोणत्याही प्रकारची नवीन भर घातली नाहीं. तो पराकाष्ठेचा बहुश्रुत होता; व त्यामुळें त्याचे ग्रंथ अत्यंत विद्वत्तापूर्ण झाले आहेत. इंग्लंडांत जे पहिल्या प्रतीचे गद्यलेखक होऊन गेले, त्यांत मेकॉलेची गणना होते. ऐतिहासिक निबंध लिहिण्याची पद्धति त्यानें परिणतावस्थेला नेली; व त्याबद्दलच त्याचा विशेष लौकिक आहे. परंतु वाङ्मयाचा टीकाकार या नात्यानें त्याचा दर्जा पुष्कळच खालीं लागतो. खुद्द मेकॉलेनेंच आपल्या टीकालेखांसंबंधानें असे उद्गार काढले आहेत—

"I am not successful in analysing the works of genius. I have written several things on historical and moral questions, of which on the fullest reconsidertion I am not ashamed, and by which I am willing to be estimated, but I never have written a page of criticism on poetry or the fine arts which I would not burn if I had the power."

हे त्याचे उद्गार अगदीं योग्य आहेत. टीका करितांना दुसऱ्याची राळ उडविणारा मेकॉले स्वतःच्या कृतीलाही तितकीच कठीण कसोटी लावीत असे, हें यावरून स्पष्ट दिसून येतें. थोडक्यांत सांगावयाचें झालें तर त्याचें असें वर्णन करितां येईल कीं, मेकॉले हा विद्वान् परंतु उथळ, रसिक परंतु दुराग्रही, विचारी परंतु विकारवश आणि शिष्ट परंतु निंद्खोर असा प्रतिभाशाली लेखक होता. मेकॉलेचे हे बहुतेक सर्व गुणावगुण चिपळूणकरांच्या लेखनांत उतरले आहेत. मेकॉले आणि चिपळूणकर यांच्यांत कांहीं महत्त्वाचे भेद आहेत. त्याच्या इतकें चिपळूणकरांचें वाचन विविध व व्यापक नव्हतें. तो विलक्षण व्यासंगी व उद्योगी होता. या बाबतींतही चिपळूणकर त्याच्यापेक्षां कमी पडतील. मेकॉलेचें खाजगी भाषण मार्मिक व मनोरंजक असे. वक्तृत्वाचीही लकब त्याला होती. तो समाजाशीं मिळन मिसळून वागत असे; इतकेंच नव्हे, तर समाजांतील बहुतेक चळवळींशीं त्याचा कांहीं ना कांहीं तरी संबंध होता. तत्कालीन विद्वत्समाजांत त्याचें वजन फार होतें. इंग्लंडच्या विशाल राजकारणाचा त्याला उत्तम अनुभव होता. चिपळूणकरांच्या ठिकाणीं यांपैकीं एकही गुण नव्हता. स्विफ्ट, ॲडिसन, जॉनसन, गोल्डस्मिथ, वॉल्टर स्कॉट प्रभृति उत्कृष्ट गद्यलेखक मेकॉलेपूर्वीं होऊन गेले होते. त्यानें इंग्रजी भाषेच्या ऐन भरभराटीच्या काळांत नांव कमावलें. चिपळूणकरांच्या जन्मकालीं गद्यलेखनाची पद्धति मराठींत थोडथोडी रूढ होत होती. स्वतंत्र प्रतिभेचा गद्यलेखक तर एकही उदयास आलेला नव्हता. सूर्यापासून तेज उसनें घेणाऱ्या चंद्राची जशी त्याच्याशीं तुलना होऊं शकत नाहीं, तशीच मेकॉले व चिपळूणकर यांची तुलना शक्य नाहीं. त्यांची लेखनसरणी व त्यांचे गुणदोष यांत सारखेपणा आहे; आणि त्याला कारण, चिपळूणकरांनीं मेकॉलेचें अनुकरण केलें, हें होय. मेकॉलेच्या कीर्तीला केवळ त्याचे गुण कारणीभूत झाले. चिपळूणकरांच्या कीर्तीला गुणांपेक्षां परिस्थितिच फार सहाय्यक झाली, असें म्हणावयाला हरकत नाहीं. खुद्द त्यांनाही या गोष्टीची जाणीव

असावी, असें त्यांच्या ‘ भाषांतर ’ या निबंधांतील उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. ते म्हणतात—

“ भाषा भिकार असतां तींत चांगली ग्रंथरचना करण्यांत जितकें भूषण आहे तितकें ती अगोदरच्च चांगली असतां करण्यांत मुळींच नाहीं. यास्तव आमच्या भाषेच्या सध्यांच्या वाईट मानलेल्या स्थितींतही जे ग्रंथकार परिश्रम करून मनोरम ग्रंथ रचतील त्यांची वाहवा अलीकडील मोठे नामांकित म्हणून मोडले जाणारे जे इंग्रज ग्रंथकार त्यांच्याहूनही अधिक होईल हें उघडच आहे !”

चिपळूणकरांनीं आपलीं काव्यविषयक मतें मुख्यत: जगत्प्रसिद्ध इंग्रजी महाकवि मिल्टन याच्या चरित्रावरील मेकॉलेच्या निबंधावरून बनविलीं आहेत. आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षीं मेकॉलनें हा निबंध लिहिला. हा त्याचा पहिला निबंध; व यानेंच त्याचें नांव तत्कालीन वाचकवर्गांत सर्वतोमुखीं केलें. या निबंधांत त्यानें दोन काव्यविषयक सिद्धांत ग्रथित केले आहेत. यांपैकीं पहिला सिद्धांत, ‘ सुधारणेच्या प्रगतीबरोबर कवितेचा अपकर्ष होतो,’ हा होय. या सिद्धांताचें अनेकांनीं सप्रमाण खंडन केलें आहे. चिपळूणकरांनीं हा सिद्धांत अगदीं अविचारानें मान्य केला. त्या वेळचा प्रसिद्ध राजकवि टेनिसन याचीं काव्यें जर ते चाळते, तर त्यांना या सिद्धांताचा फोलपणा तेव्हांच दिसून येता. परंतु इतकेंही कशाला ? खुद्द चिपळूणकरांच्या वडिलांचें ‘ विद्याप्रशंसा ’ हें मनोहर लघुकाव्यही अलीकडील शोधांवरूनच सुचलेल्या नवीन कल्पनांनीं नटलेलें आहे. ‘ अर्धवट सुधारलेल्या लोकांचें वाङ्मय कवित्वरूपानें प्रकट होतें,’ हा मेकॉलेचा दुसरा सिद्धांत आहे. नुसता भारतीय वाङ्मयाचा इतिहास पाहिला, तरी सुद्धां या सिद्धांताचें वैय्यर्थ्य दिसून येईल. मेकॉलेचे हे दोन्ही सिद्धांत परस्परावलंबी असल्यामुळें एक खोडून काढल्यानें दुसऱ्याचा निरास आपोआपच होतो. चिपळूणकरांनीं ते निरपवाद ग्रहण केले, याचें फार

नवल वाटतें. त्यांच्या संस्कृत कविपंचकांत व इतरही सर्व काव्यविषयक लेखांत या सिद्धांतांना धरून विवेचन केलेलें आहे.

संस्कृत कविपंचकावरील चिपळूणकरांचे लेख अनेक दृष्टींनीं नमुनेदार आहेत. या ग्रंथानें टीकेची व्यापक पद्धति मराठींत आणिली हें तर खरेंच; पण शिवाय शोधक व चिकित्सक बुद्धिही आणिली. महाराष्ट्रांत संशोधनपर लेख लिहावयाला बाळशास्त्री जांभेकर, भाऊ दाजी, भांडारकर, मंडलिक, पंडित प्रभृति श्रेष्ठ विद्वानांनीं चिपळूणकरांपूर्वींच प्रारंभ केला होता. परंतु या संशोधकांचें लिखाण इंग्रजींतून होत असे. खुद्द मराठींत, जरी निव्वळ संशोधनात्मक नव्हे तरी, सर्वसाधारण चिकित्सक बुद्धीनें टीकात्मक विवेचन करण्याचा परिपाठ प्रथम चिपळूणकरांनीं पाडला. चिपळूणकर दक्षिण विद्यालयांत असतांना डॉ. कीलहॉर्न हे मुख्य संस्कृताध्यापक होते. त्यांच्या चिकित्सक शिक्षणपद्धतीमुळें, आणि भाऊ दाजी, भांडारकर, पंडित व पाश्चात्य संशोधक यांचें चर्चात्मक वाङ्मय वाचूनही, चिपळूणकरांच्या ठिकाणीं संशोधकबुद्धि जागृत झाली असावी. विद्यार्थिदशेंतून बाहेर पडतांच त्यांनीं हे लेख लिहिले; व त्यामुळें ते थोडे उथळ असले तर नवल नाहीं. पाश्चात्य संशोधकांचीं विधानें निर्विवाद स्वीकारून त्यांनीं विवेचन केलेलें नाहीं. सुबंधूच्या 'वासवदत्ता' या गद्यकाव्याला जोडलेल्या प्रस्तावनेंत हॉलनें जे कोते व कुत्सित विचार प्रदर्शित केलेले आहेत, त्यांचा चिपळूणकरांनीं तीव्र निषेध केला आहे. मेकॉलेचे विचित्र सिद्धांत मराठी वाचकांपुढें सजवून मांडणारे चिपळूणकर हॉलच्या विचारांना आक्षेप घेतात, याला कारण एकच आहे; व तें म्हणजे त्यांचा प्रखर देशाभिमान होय. मेकॉलेनें चिपळूणकरांच्या देशाभिमानाला खिजवील असें जें कांहीं लिहिलें आहे, त्याचीही त्यांनीं अवधीरणा करून मेकॉलेची चांगलीच शोभा केली आहे. हीं शोभा करितांना देशाभिमानाला चिकित्सक बुद्धीची जोड मिळाली होती, हेंही कबूल केलें पाहिजे. या लेखांतील काव्यविवेचन रहस्य-

दृष्टीनें केलेलें असून तें उत्तम साधलें आहे; व त्यांच्या वाचनानें संस्कृत कवितेच्या सौंदर्याची बरीच कल्पना येते. या लेखांत क्वचित् भ्रामक विधानें आढळतात. पण त्यामुळें ग्रंथाची योग्यता फारशी कमी होत नाहीं. या निबंधांच्या स्वतंत्र आवृत्तीला जोडलेल्या प्रस्तावनेंत आपल्या-कडील काव्यरसिकांच्या अभिरुचीविषयीं चिपळूणकरांनीं काढलेले उद्गार अगदीं योग्य आहेत. अद्यापिही त्या अभिरुचींत फारसा बदल झाला आहे, असें वाटत नाहीं. तुकाराम किंवा मुक्तेश्वर यांच्या साध्या परंतु रसाळ कवितेपेक्षां मोरोपंतांचीच कविता रसिकांना अधिक आव-डते. श्लेष, शब्दचमत्कार, पदलालित्य, व्यावहारिक नीतीनें भरलेलीं सुभाषितें यांवरच अजूनही कवित्वाची किंमत अवलंबून आहे. ‘ लक्ष ग्रंथा’ ची खडतर कसोटीही फारशी मागें पडली आहे, असें नाहीं. आजही ‘ महाकाव्य ’ निर्माणावरच ‘ महाकवि ’ ही पदवी अवलंबून आहे. एकाच उत्कृष्ट श्राव्य किंवा दृश्य काव्यावर कविपरंपरेंत अग्रपद लाभण्याचा जो काळ एकदां गेला, तो अजून परत आलेला नाहीं. भाषेंत, रचनेंत, कविसंप्रदायांत जरा कांहीं कुठें फेर पडत आहेसें दिसलें कीं, त्याचा उच्छेद करण्याकरितां आपलें ‘ शाणानीशित ’ टीकायुध घेऊन रसिक पुढें सरसावतात ! त्यांतही, दोषदर्शन हाच टीकेचा अलीकडे हेतु समजला जात असल्यामुळें,—

All books he reads and all he reads assails

अशीच बहुतक रसिक टीकाकारांची स्थिति झाली आहे ! ही स्थिति बद-लेल तेव्हां खरी. तूर्त तरी चिपळूणकरांनीं कविपंचकाच्या प्रस्तावनेंत वर्णिल्याप्रमाणेंच मराठी रसिकांची अभिरुचि आहे.

शालापत्रकांतून प्रसिद्ध झालेले हे संस्कृत कवींवरील निबंध त्या मासिकाच्या वाचकांना फार आवडल्यामुळें चिपळूणकरांनीं पुढें मराठी कवितेवर लिहिण्याचें ठरविलें; व त्याप्रमाणें स. १८७५ च्या फेब्रुवारी-

पासून त्यांनीं प्रास्ताविक विवेचनाला सुरवात केली. हें विवेचन पूर्वीच्या विवेचनाहून पुष्कळच नीरस उतरलें आहे. त्यांत मराठी कवितेवरील टळक आक्षेपांचें त्रोटक खंडन केलें आहे, तेंही समाधानकारक वाटत नाहीं. कदाचित् निबंधमाला निघूं लागल्यामुळें असा प्रकार झाला असेल. या आक्षेपनिरसनांत, जुन्या मराठी कवितेच्या प्रकाशनाला वाहिलेल्या ' सर्वसंग्रह ' मासिकाचा आश्रय, मिशनरी व इतर बडे सल्लागार यांच्या सांगण्यावरून, काढून घेतल्याबद्दल चिपळूणकरांनीं शाळाखात्यावर कडक पण रास्त टीका केली होती. ती त्या खात्यांतील अधिकाऱ्यांना अतिशयच झोंबून, अंशतः त्या टीकेमुळें आणि अंशतः पत्रक निघण्याच्या बाबतींत होत असलेल्या अनियमितपणामुळें, शाळाखात्याचे त्या वेळचे डायरेक्टर चाटफील्डसाहेब यांनीं तें मासिक बंद केलें. वस्तुतः, चिपळूणकरांच्या टीकेची झळ शाळाखात्याला लागण्याचा हा कांहीं पहिलाच प्रसंग होता, असें नव्हे. निबंधमालेच्या आठव्या अंकांत, मेकॉले, मिल प्रभृति इंग्रज लेखकांच्या हिंदुस्थानावरील इतिहासग्रंथांचा परामर्श घेतांना, त्यांच्या मतांची उसनवारी करणाऱ्या तत्कालीन विद्वानांच्या स्वाभिमानशून्यतेवर चिपळूणकरांनीं जळजळीत टीका केली होती. तेव्हां, मराठी भाषेचे शाळाखात्यांतील आधारस्तंभ मे. कँडी यांनीं शास्त्रीबुवांना मुद्दाम पत्र पाठवून अशी कागाळी केली कीं, " तुमच्या मुलानें अशा तऱ्हेचा मजकूर लिहावा हें शोचनीय आहे. म्हणून पुन्हा असें न लिहिण्याबद्दल तुम्ही चिरंजीवांना ताकीद द्या ! " परंतु, चाटफील्डसाहेब हे इतके दिलदार होते कीं, त्या वर्षाच्या अखेरीस शाळेची पहाणी करण्यासाठीं ते आले असतां, त्यांनीं, चिपळूणकरांना मुद्दाम भेटीला बोलावून, मराठींत नवीन मासिक काढल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें. आणि, बोलतां बोलतां सहज त्यांना असा मार्मिक इषारा दिला कीं, " तुम्ही अद्याप तरुण असून, तुमचे विचार परिपक्व झालेले नसल्यामुळें, कोणत्याही बाबतींत कडक टीका करणें

तुम्हांला इष्ट नाहीं. शिवाय, मिल, मेकॉले यांनीं प्रदर्शित केलेलीं मतें म्हणजे सर्वांनांच मान्य आहेत, असेंही नाहीं." पण, शाळाखात्या-मार्फत निघणाऱ्या मासिकांत खुद्द त्या खात्यावरच टीका यावी, ही गोष्ट सर्वच दृष्टींनीं गैर असल्यामुळें, चाटफील्डसाहेबांना शालापत्रक बंद करणें योग्य वाटलें, हें उघड आहे.

२

स. १८७३ सालीं चाटफील्डसाहेबांच्या मेहरबानीनें चिपळूणकरांचा शाळाखात्यांत प्रवेश झाला; व सालअखेर त्यांना बढतीही मिळाली. चाटफील्डसाहेबांचा कृष्णशास्त्री चिपळूणकरांवर फार लोभ असल्यामुळें त्यांनीं त्यांच्या चिरंजीवांना मुद्दाम आपल्या खात्यांत घेतलें. त्याच सालच्या नाताळांत, चिपळूणकर आपल्या मित्रमंडळींशीं गप्पा मारीत असतां, निबंधमाला काढण्याची कल्पना निघाली; व त्याप्रमाणें स. १८७४ सालच्या आरंभापासून तें मासिक सुरूही झालें. स. १८७४ पासून १८८१ पर्यंत या मासिकाचे एकंदर ८४ अंक निघाले. या आठ वर्षांच्या काळांत चिपळूणकरांनीं महाराष्ट्राच्या विचारांना आणि भाव-नांना निराळें वळण लाविलें. संस्कृत कविपंचक किंवा शालापत्रकांतील फुटकळ निबंध यांवर त्यांची कीर्ति अवलंबून नाहीं. नदीला उगमा-जवळ महत्त्व नसतें; व तें साहजिकही आहे. गिरिगव्हरांतून खळखळत उघड्या माळावर उतरून तिथें ज्या वेळीं ती नवीन सृष्टि निर्माण करिते, त्या वेळीं तिच्या त्या विस्तीर्ण पात्रावर उठणाऱ्या लहरींबरोबरच लोकांच्याही हृदयांत तिच्याविषयीं प्रेमाच्या व पावित्र्याच्या ऊर्मि उचं-बळूं लागतात. निबंधमाला हें चिपळूणकरांच्या कर्तृत्वाचें आणि कीर्तीचें एकमेव अधिष्ठान आहे. मालेंतील वाङ्मयाचा परामर्श घेण्यापूर्वी, तिची घडण ज्या साहित्यानें बनली त्या साहित्याचा, आणि ज्या परिस्थितींत तिचा अवतार झाला त्या परिस्थितीचा, विचार करणें अवश्य आहे.

चिपळूणकरांनीं केलेल्या इंग्रजी वाङ्मयाच्या व्यासंगाचें निबंधमालेंत पूर्ण प्रतिबिंब पडलें आहे. इंग्रजी वाङ्मयांत त्यांना जे जे कांहीं मनोरम व चमत्कारिक प्रकार आढळले, ते ते सर्व मराठींत आणण्याचा त्यांनीं शक्य तितका प्रयत्न केला. त्यांना सर्वच इंग्रजी वाङ्मय प्रिय होतें. परंतु त्यांतही ॲडिसन, जॉनसन व मेकॉले या लेखकांच्या ग्रंथांवर त्यांचा विशेष लोभ असे. इंग्रजी भाषेंतील निबंधलेखनाच्या तीन अवस्था या लेखकांच्या निबंधांतून दृष्टीस पडतात. या तीन लेखकांनीं इंग्लंडांतील बहुजनसमाजांत वाङ्मयाविषयीं उत्तम प्रकारची अभिरुचि उत्पन्न केली. ॲडिसननें इंग्रज लोकांना वाचावयाला शिकविलें; जॉनसननें त्यांची विचारशक्ति जागृत केली; व मेकॉलेनें या जागृत झालेल्या विचार-शक्तीला सामान्यतः नीरस वाटणारे इतिहासकथनासारखे विषय अत्यंत सरस करून दिले. चिपळूणकरांनीं या तीन लेखकांपैकीं मेकॉलेचें अनु-करण अतिशय केलें आहे. त्याच्या खालोखाल ॲडिसनचा प्रभाव निबंधमालेवर झालेला दिसतो.

ॲडिसन हा इंग्रजी गद्यलेखकांचा अग्रेसर होय. त्यानें इंग्रजी निबंध वाङ्मयाचा पाया घातला. ॲडिसनपूर्वीं बेकन, कौले, मिल्टन, टेंपल, ड्रायडन प्रभृति बरेच गद्यलेखक इंग्लंडांत होऊन गेले होते. परंतु त्या सर्वांना त्यानें आपल्या अप्रतिम लेखनशैलीनें मागें टाकिलें. बहुजनसमा-जाला समजेल अशा सोप्या भाषेंत चटकदार रीतीनें गद्य लिहिण्याचा प्रघात प्रथम ॲडिसननेंच पाडला. त्याच्यापूर्वीं झालेल्या लेखकांचा कल लॅटिन, ग्रीक किंवा फ्रेंच धर्तीवर गद्य लिहिण्याकडे असे. खुद्द ॲडि-सननेंही विख्यात फ्रेंच निबंधलेखक मॉंटेन याचें अनुकरण केलें आहे. तात्त्विक विचारांच्या दाट धुक्यांत, टीकात्मक विवेचनाच्या गहन कान-नांत किंवा राजकीय पक्षभेदांच्या शुष्क वाग्जालांत सांपडलेल्या या लेखकांना, समाजाकरितां आपल्याला कांहीं लिहावयाचें आहे, ही कल्प-नाही शिवली नाहीं. त्यांचा सगळा लेखनप्रपंच विद्वानांकरितां होता.

परकीय वळणावर गेलेलें हें त्यांचें विद्वत्ताप्रचुर लेखन सामान्य जनांना दुर्बोध व अपरिचित वाटलें असल्यास नवल नाहीं. त्यांची भाषा नाद-मधुर, ओजस्वी व अलंकारिक असे. परंतु, जिथें समाजांत साक्षरता व शिक्षितांत रसिकता वाढली नव्हती, तिथें या गुणांचें चीज होणें शक्य नव्हतें. ऑडिसनपूर्वीं होऊन गेलेल्या लेखकांपैकीं कौले व टेंपल यांनीं मात्र सुगम व सुरस निबंध लिहिले आहेत. किंबहुना, मॉंटेनच्या धर्तीवर चित्ताकर्षक निबंध लिहिण्याची कौलेची शैली उचलून तीच ऑडिसननें पूर्णतेला नेली, असेंही म्हटलें असतां चालेल. परंतु या लेखकांचें निबंध-वाङ्मय फारच थोडें होतें.

ही स्थिति ऑडिसननें पालटली. त्याच्या जन्मकाळीं इंग्रजी समाजाची आणि साहित्याची अवनत स्थिति होती. क्रॉमवेलनें उभारलेलें प्रजासत्ताक राज्य ढांसळून इंग्लंडांत राजसत्ता पुन्हा प्रस्थापित झाल्यावर, दुसऱ्या चार्लं-सच्या कारकीर्दींत राजाची व रयतेची नीति सुटून, सामाजिक अत्याचा-रांना ऊत आला. समाजाच्या दुराचारांचे परिणाम वाङ्मयावर घडून अश्लील नाटकांची, प्रहसनांची व काव्यांची बेसुमार निपज होऊं लागली. क्रॉमवेलनें आपल्या अमदानींत नीतिनिर्बंधांनीं समाजाला इतकें जखडून टाकलें होतें कीं, नीतीनें वागून संसारांतील सुखांचा उपभोग घेणें लोकांना पुढें शक्यच वाटेना. सदाचार आणि संसारसुख यांतील विरो-धाची ही भावना ऑडिसननें नष्ट केली व समाजाला शांतिसुखाचा मार्ग दाखविला. सॉक्रेटिसनें तत्त्वज्ञान स्वर्गांतून भूतलावर आणिलें आणि ऑडिसननें निदान इंग्लंडपुरतें तरी तें घरोघर केलें, यांत शंका नाहीं. तत्त्वज्ञान या शब्दाचा अर्थ येथें फार खोल अगर कांटेतोल घ्यावयाचा नाहीं. समाजाच्या धारणेला मूलभूत व अवश्य असणारी जी परस्परा-नुबंधी सामाजिक नीति, तिचाच बोध येथें तत्त्वज्ञान या शब्दानें होतो. ऑडिसनचें तत्त्वज्ञान थोडक्यांत त्याच्याच शब्दांनीं सांगावयाचें झालें तर तें—

To be easy here and happy afterwards

असें सांगतां येईल. हें तत्त्वज्ञान अगदीं सामान्य आहे. परंतु, लोक ज्या वेळीं सामाजिक नीतींचें उल्लंघन करून उन्मार्गगामी बनतात, त्या वेळीं असलें सामान्य तत्त्वज्ञानही गोडीगुलाबीनें त्यांच्या गळीं उतरविणें अवश्य असतें. हें कार्य ॲडिसननें 'स्पेक्टेटर' ( Spectator ) पत्रांतून मनोरंजक लेख लिहून केलें. या पत्राच्या ५८ व्या अंकांत म्हटल्याप्रमाणें, समाजांतील अज्ञानाचा आणि अनीतीचा उच्छेद करून, अभिजात वाङ्मयाविषयीं अभिरुचि उत्पन्न करण्याचा त्याचा उद्देश होता.

ॲडिसन आणि त्याचा सहकारी मित्र स्टील यांनीं ज्या वेळीं हें दैनिक पत्र काढलें, त्या वेळीं राजकीय दृष्टीनें इंग्लंडची अतिशय भरभराट होती. या समृद्धीच्या काळांत, वेळ कसा घालवावा याच चिंतेनें व्याकुळ होणाऱ्या रिकामटेकड्या सुखासीन स्त्रीपुरुषांना, काव्यशास्त्र-विनोदाचें व्यसन लावून, ॲडिसननें त्यांची अनुद्योगाची आपत्ति दूर केली. असल्या खुशालचंदांना जो बोध करावयाचा, तो त्यांच्या लहरी मनाला न खुपेल अशा बेतानें आळवून–आर्जवूनच करावा लागतो. आणि तसाच तो ॲडिसननें केलाही. बोध मनोरंजक करण्याचा व मनोरंजन बोधप्रद करण्याचा त्याचा प्रयत्न होता. आपल्या पत्राच्या दहाव्या अंकांत तो म्हणतो—

I shall endeavour to enliven morality with wit and to temper wit with morality.

अर्थातच चहाचे घुटके घेत घेत अगर चिरूटाचे झुरके मारीत मारीत ज्यांवर सहज गमतीनें नजर टाकावी, असे मजेदार लेख या पत्रांत येत असत. सकाळचें कोंवळें ऊन फारसा ताप न देतां जशी थोडीशी ऊब देतें, तसे या पत्रांतील लेख बुद्धीला फारसा ताण न देतां वाचकाला सामान्य ज्ञान देत. ॲडिसनची ही नीतिबोधाची नाजूक कल्पना वाचली, म्हणजे मम्मटानें वर्णिलेल्या—

**कांतासंमिततयोपदेशयुजे**

या काव्यफलाची आठवण होते ! थोडक्यांत सांगावयाचें झालें, तर असें म्हणतां येईल कीं, ॲडिसन हा इंग्लंडांतील साक्षर समाजाचा नर्मसचिव होता. त्याचा स्वभावही या कार्याला अनुकूल असाच होता. पोपनें आपला स्नेही डॉ. अर्बुथनॉट याला सादर केलेल्या कैफियतींत ॲडिसनचें फार मार्मिक वर्णन केलें आहे. तो म्हणतो—

> Blest with each talent and each art to please,
> And born to live, converse, and write with ease;
> Alike reserved to blame or to commend
> A timorous foe and a suspicious friend

हें वर्णन पोपनें जरी कुत्सित बुद्धीनें केलेलें असलें, तरी तें सत्याला सोडून नाहीं. जॉनसन, मेकॉले, थॅकरे, कोर्टहोप, गॉस यांनीं केलेलें ॲडिसनचें वर्णनही सामान्यतः याच धर्तीचें आहे. त्याच्या स्वभावांतील व लेखनांतील हा नेभळट गोडवेपणा तत्कालीन संपन्न इंग्रज समाजाला मान्य व प्रिय झाला, हें योग्यच झालें. परंतु, सुबुद्ध व सुविद्य व्यक्तींना मात्र त्याच्या लेखनांतील हा गोडवेपणाचा अतिरेक संमत नव्हता, असें दिसतें. त्याचें आणि त्याचा जिवलग स्नेही स्टील याचें वांकडें यावयाला पुढें हा त्याचा स्वभावच कारणीभूत झाला. स्विफ्टला तर या नेभळेपणाची शिसारीच बसली होती. ॲडिसननें आपल्या पत्रांत लिहिलेले बहुतेक लेख सामान्य विषयांवर आहेत. इंग्रज युवतींचीं शिरोभूषणें, त्यांच्या पोषाखाच्या तऱ्हा, त्यांचें गलचूर्ण, त्यांचीं जाकिटें, त्यांचे पंखे, त्यांचें वेणीफणीचें सामान असल्या क्षुद्र विषयांवर त्यानें आपली लेखणी वारंवार चालविली आहे. वाङ्मयदृष्ट्या त्याचे महत्त्वाचे चर्चात्मक लेख मिल्टन, सुभाषित, विनोद, संगीत नाटकें, इंग्रजी पोवाडे, सॅफोचीं प्रेमगीतें वगैरे विषयांवर आहेत. यांतील कांहीं निबंधांना आतां फारसें महत्त्व उरलेलें नाहीं. परंतु त्याबद्दल ॲडिसनला दोष देणें अनु-

चित होईल. समाजाच्या कल्पनांची आणि विचारांची प्रगति सतत होत असते. या प्रगतीमुळें वाङ्मय उत्तरोत्तर परिणत होत जातें आणि त्याबरोबरच पूर्वपूर्व लेखकांच्या कृति त्या मानानें अपरिपक्क व अपूर्ण वाटतात. ॲडिसनच्या टीकालेखांचीही स्थिति आज अशीच झाली आहे. पण, याच लेखांनीं समाजांत सद्‌भिरुचि उत्पन्न केली, हें विसरून चालणार नाहीं. कवि, नाटककार आणि निबंधलेखक अशा तिहेरी नात्यानें ॲडिसननें इंग्रजी वाङ्मयांत चांगली भर घातली. तथापि, आज जें त्याला त्या वाङ्मयाच्या इतिहासांत श्रेष्ठ पद लाधलें आहे, तें कवि किंवा नाटककार म्हणून नाहीं. पहिल्या प्रतीचा विनोदी लेखक या नात्यानेंच आजचें जग त्याला ओळखतें. हें लक्षांत घेऊनच बहुधा थॅकरेनें त्याचें वर्णन

A wit that makes us laugh and leaves us good and happy.

या एकाच वाङ्मयगुणदर्शक यथार्थ विशेषणानें केलें आहे. ॲडिसनच्या विनोदी लेखांत जिव्हारीं झोंबेल किंवा पोटभर हंसवील असें कांहींही नाहीं. विनोदाच्या सूक्ष्म, निर्दोष व सहजमनोहर छटा त्याच्या लेखांत सर्वत्र विपुल आढळतात. दोष दाखवून समाजाला खिजवितांना ॲडिसननें ज्याप्रमाणें रेशमी चिमटे घेतले, त्याचप्रमाणें चित्रालाप करून त्याला रिझवितांना हलक्या हातानें गुदगुल्या केल्या. ॲडिसनच्या विनोदी लेखांइतकेच त्याचे तात्त्विक विषयांवरील लेखही सुंदर आहेत.

चिपळूणकरांनीं ॲडिसनचें अनुकरण बरेंच केलें आहे. निबंधमालेंतल्या पहिल्या दोन वर्षांच्या निबंधांत हें अनुकरण विशेष आढळतें. 'विद्वत्त्व आणि कवित्व,' 'संपत्तीचा उपभोग,' 'इतिहास,' 'वाचन', 'लोकभ्रम,' 'गर्व,' 'ग्रंथांवर टीका,' 'रसातळची मराठी भाषा' व इतर भाषाविषयक निबंध या सर्व लेखांचें वळण ॲडिसनच्या धर्तीचें आहे. तात्त्विक विचार किंवा वाङ्मयचर्चा विनोदसुंदर वाणीनें वाचकांना रसभरित करून

सांगण्याची ॲडिसनची हातोटी या लेखांतून स्पष्ट दिसून येते. केसरींतील निबंध तर सर्वच ॲडिसनच्या पद्धतीचे आहेत. परंतु, ॲडिसनच्या मानानें चिपळूणकरांचा विनोद पुष्कळच खालच्या दर्जाचा आहे, यांत संशय नाहीं. त्यांच्या शुद्ध व निर्दोष विनोदाचे मासले 'लोकभ्रम,' 'भाषादूषण' व 'रसातळची मराठी भाषा' या लेखांतून पाहावयाला सांपडतात. बाकी लेखांतील विनोद कांहीं ठिकाणीं चटोर व चावरा आहे. विशेषतः, ज्या ज्या स्थळीं मिशनरी आणि नवीन शिकलेली मंडळी व त्यांच्या चळवळी यांवर लिहिण्याचा प्रसंग येतो, त्या वेळीं चिपळूणकरांच्या विनोदाचें पर्यवसान उपहासांत होतें. ॲडिसननें समाजाचे दुर्गुण त्याला न दुखवितां गमतीनें दाखविले आहेत. उलट चिपळूणकरांनीं आपल्या हातांत सदैव विषदिग्ध प्रतोद धरला होता. प्रतिपक्षाची गय करणें तर त्यांना माहितच नव्हतें. परंतु याबद्दल त्यांना फारसा दोष देतां येत नाहीं. चिपळूणकर आणि ॲडिसन यांच्या लोकविनयनपद्धतींत असा फरक पडावयाला केवळ त्यांच्या स्वभावांतील भेदच नव्हे, तर, चिपळूणकरांनीं निबंधमालेच्या चवथ्या वर्षाच्या समालोचनांत म्हटल्याप्रमाणें, त्यांच्या भोंवतालची दुर्धर देशस्थितीच मुख्यतः कारण झालेली आहे. ॲडिसनपुढें जो समाज होता, तो देशभक्ति, भाषाभिमान, शौर्य, साहस, उद्योगशीलता या गुणांनीं मंडित असा होता. स्वतंत्र राष्ट्रांतील संपन्न व साहसी जनतेला नीतिबोध करण्याचें कार्य ॲडिसननें केलें. परंतु चिपळूणकरांपुढें स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यांच्याविषयीं बेपर्वा असलेले शब्दशूर, निरुद्योगी, पंडितंमन्य आणि बेहिमती लोक होते. परतंत्र राष्ट्रांतील पतित आणि परप्रत्ययनेय समाजाला ताळ्यावर आणण्याचें कार्य चिपळूणकरांनीं केलें. स्वाभिमानशून्य समाजाला मिळमिळीत शब्दांनीं बोध करून भागत नाहीं. अविवेकाचा कैफ चढून धुंद झालेल्या समाजाची गुळमुळीत शब्दांनीं निर्भर्त्सना करून काय होणार ? जो समाज माणुसकी विसरला, त्याला वाटेवर आणावयाला जरबेचे शब्द आणि

चाबकाचे प्रहारच पाहिजेत. ज्याला समजूत असेल, त्याला हिकमतीनें वळणावर आणतां येतें. परंतु, ज्याची समजूत मेली, त्याला वठणीवर आणावयाला हुकमतीच्या जोराशिवाय दुसरें साधनच नाहीं. चिपळूणकरांनीं विटंबना केली व कोरडे उडविले, याला कारण परिस्थिति होय. असें करितांना त्यांच्याकडून क्वचित् अन्यायही झाला आहे. पण तो भाग वेगळा. ॲडिसनच्या मानानें चिपळूणकरांचें लेखन बरेंच एकतर्फी आहे. यालाही भिन्न परिस्थितिच कारणीभूत झाली आहे. ॲडिसनला इंग्लंडच्या फक्त सामाजिक नीतीचीच विसकटलेली घडी सरळ बसवावयाची होती. परंतु चिपळूणकरांना अराष्ट्रक स्थितींत असलेल्या महाराष्ट्रांतून 'राष्ट्र' उभें करावयाचें होतें. त्यांना विवाक्षित मतांचा आणि कल्पनांचा प्रसार करावयाचा होता. मतप्रसाराच्या कार्यांत सारासारविचाराला व सद्सद्विवेकबुद्धीला फारसें स्थान असत नाहीं. सत्याचा तोल ढळूं न देतां प्रकट केलेले विचार सामान्य लोकांवर क्वचितच परिणाम करूं शकतात. विवाक्षित मतांचा आणि तत्त्वांचा पुरस्कार आणि प्रसार करितांना सत्याच्या आणि शिष्टाचाराच्या सूक्ष्म मर्यादा पाळणें बहुधा शक्य नसतें. आकाशाच्या मध्यापासून ढळून क्षितिजावर आलेला क्षीणतेज सूर्य जसा जगाला प्रेक्षणीय होतो, तसाच सत्याचें उग्र अधिष्ठान सोडून व्यवहाराच्या रंगणावर उतरलेला पक्षपाती लेखक समाजाला प्रिय होतो. फूल आपल्या परिमळानें भूमीला सुगंधित करूं शकतें. पण केव्हां ?—झाडाची डहाळी सोडून मातीला मिळाल्यावर ! जनतेचें विनयन करण्याकरितां तिला विश्वासांत घेणाऱ्या लेखकाचा थोडा तरी अधःपात होणें अगदीं अपरिहार्य असतें. चिपळूणकरांची स्थितीही अशीच झाली. मतप्रचाराला वाहून घेतल्यामुळें त्यांचें लेखन एकतर्फी झालें आहे. या दृष्टीनें पाहतां ॲडिसनपेक्षां चिपळूणकर आणि आयरिश जनतेला जागृत करणारा विनोदी लेखक स्विफ्ट यांच्या लेखनांत अधिक साम्य आढळतें. 'जूनियस'च्या

वाणींतील विषारही चिपळूणकरांच्या लेखणींत प्रसंगोपात्त उतरला आहे. परिस्थितीमुळें पडलेलें हें अन्तर वगळलें, तर स्वभाव, अभिरुचि व लेखनसरणी या बाबतींत ॲडिसन व चिपळूणकर यांच्यांत विशेष साहश्य आहे, यांत शंका नाहीं.

जॉनसनच्या लेखनापेक्षां त्याच्या चारित्र्याचाच परिणाम चिपळूण-करांवर अधिक झालेला आहे. त्याचा उत्कट देशाभिमान, निःस्पृह स्वभाव, निष्कलंक शील या त्याच्या गुणांनीं व त्यानें केलेल्या निस्सीम भाषासेवेनें चिपळूणकरांना अतिशय भारलेलें दिसतें. शास्त्रीय संशोध-नाच्या व सुधारणेच्या युगांतही अढळ राहिलेली जॉनसनची धर्मनिष्ठा त्यांना आदर्शभूत वाटत असे. त्याच्या चरित्रापासून आपल्या देश-बंधूंनीं कोणता बोध घ्यावा, याचें विवरण त्यांनीं, त्याच्या चरित्राचा समारोप करितांना, वक्तृत्वपूर्ण वाणीनें केलें आहे. त्या विवरणावरून जॉनसनचें चरित्र चिपळूणकरांना किती अनुकरणीय वाटत होतें, याची स्पष्ट कल्पना येते. त्याच्या देशाभिमानाप्रमाणें त्यांचा स्वतःचाही देशाभिमान अंध होता, असें म्हणावयाला हरकत नाहीं. चिपळूणकरांचे पूर्वग्रह त्याच्या पूर्वग्रहांप्रमाणेंच दृढमूल होते; व कोणत्याही युक्तिवादानें ते डळमळत नसत. समाजांतील प्रतिष्ठित शिष्टांचा जॉनसनप्रमाणेंच त्यांनाही अगदीं तिटकारा असे. जॉनसन आणि चिपळूणकर यांच्यांत अशा प्रकारचें साम्य बरेंच आढळतें. जॉनसनचें उज्ज्वल आणि उदात्त चरित्र त्यांच्या दृष्टीपुढें ध्येयासारखें होतें; व म्हणूनच त्यांनीं इतक्या प्रेमानें आणि कौतुकानें त्याचा गुणगौरव केला आहे.

इंग्रजांच्या वाङ्मयाप्रमाणेंच त्यांनीं हिंदुस्थानांत निर्मिलेल्या परि-स्थितीचाही निबंधमालेवर फार परिणाम झाला आहे. मालेचा पहिला अंक स. १८७४ च्या जानेवारी महिन्यांत निघाला. त्या अंकांत मालेच्या उद्देशाविषयीं एक 'सूचना' आहे. ती अशी—

"या निबंधमालेचा उद्देश मुख्यतः भाषाशोधनाचा तर आहेच; पण त्याबरोबर मनोरंजन व बोधही कांहीं होईल असा भरंवसा आहे." या सूचनेचें सविस्तर स्पष्टीकरण पुढें मालेच्या दुसऱ्या अंकामध्यें 'प्रस्तुत मालेचा उद्देश' या लेखांत केलेलें आहे. 'स्पेक्टेटर' काढण्यांत ॲडिसन व स्टील यांचा जो उद्देश होता, त्याहून निबंधमाला काढण्यांत, निदान आरंभीं तरी, चिपळूणकरांचा फारसा निराळा उद्देश होता, असें म्हणवत नाहीं. निबंधमालेनें हा मुख्य उद्देश तर साधलाच, पण याहूनही अत्यंत व्यापक देशकार्य केलें. आणि त्यांतच तिची खरी महती आहे. चिपळूणकरांचा मूळ उद्देश व निबंधमालेनें घडवून आणिलेली राष्ट्रीय क्रांति यांमधील अंतर पाहिलें, म्हणजे ॲडिसननें आपल्या पत्रांतील पहिल्या लेखाच्या शिरोभागीं घातलेल्या होरेसच्या सुंदर सुभाषिताचें स्मरण होतें. त्या सुभाषिताचें इंग्रजी भाषांतर असें आहे—

One with a flash begins and ends in smoke;
Another out of smoke brings glorious light,
And (without raising expectations high)
Surprises us with dazzling miracles.

आणि खरोखरीच, या सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें, निबंधमालेनें समाजाच्या कल्पनाशक्तीला आगाऊ निष्कारण न झुलवितां, अखिल राष्ट्राच्या विचारक्रांतीचा अद्भुत चमत्कार करून दाखविला. निबंधमाला ज्या वेळीं निघाली, त्या वेळीं प्रचंड उद्देशांचे महाराष्ट्रावर इतके उल्कापात होत होते कीं, त्या धामधुमींत मराठी साहित्याच्या अंधुक व उदास क्षितिजावर अवतरलेल्या या प्रतिपदेच्या चंद्रकलेकडे लोकांचें लक्ष क्वचितच गेलें असेल!

मुख्यतः साहित्यसेवेच्या उद्देशानें काढलेल्या निबंधमालेनें राष्ट्रीय जागृति, आणि तीही विशेषतः राजकीय स्वरूपाची, घडवून आणिली, याबद्दल चमत्कार वाटण्याचें कारण नाहीं. निबंधमालेवर झालेल्या परि-

स्थितीच्या प्रभावाचा हा परिणाम आहे. सांवटांत लावलेल्या वृक्षांचा झोंक जसा सूर्यप्रकाशाकडे असतो, तसा परतंत्र राष्ट्रांतील तेजस्वी व्यक्तींचा कल राजकारणाकडे असतो. नष्ट स्वातंत्र्याच्या प्राप्तीकरितां होणारे प्रयत्न हेंच परतंत्र राष्ट्राचें राजकारण होय. ज्याची बुद्धि जागृत आहे, अशा मानधन मनुष्याला आपल्या देशाला दास्यांत खितपततांना पाहणें अगदीं असह्य होतें; व त्यामुळें राजकारणाची उपजत आवड जरी त्याला मुळींच नसली, तरी तो राजकारणांत पडल्याशिवाय सहसा रहात नाहीं. किंवा, यदाकदाचित् जरी तो कृतीनें राजकारणांत पडला नाहीं, तरी त्याचें स्वातंत्र्याभिलाषी मन राजकीय विचारांत गुंतून राहातें; व संधि सांपडतांच ते विचार त्याच्या वाणींतून आणि लेखणींतून आपोआप बाहेर पडतात. चिपळूणकरांची स्थिति अशीच झाली. स्वभावतः केवळ वाङ्मयप्रेमी असलेलें त्यांचें मन पारतंत्र्यामुळें झालेली देशाची दुर्दशा पाहून अतोनात तडफडलें; व ती तडफड निबंधमालेंत उत्कटतेनें आविर्भूत झाली. निबंधमाला निघाली, त्या वेळीं महाराष्ट्र अत्यंत विपन्न स्थितींत होता. स. १८१८ सालीं शनवार वाड्यावर तांबडें निशाण लागल्यानंतर सर्व देश स्तिमित आणि स्तब्ध होऊन, एक शतकभर हिंदुस्थानांत पुराच्या पाण्याप्रमाणें पसरलेला महाराष्ट्राच्या राजकीय विचारांचा आणि कर्तृत्वाचा ओघ एकदम ओसरून गेला. स. १८१८ सालीं एकाएकीं उपस्थित झालेली ही भयाण शांतता १८५७ सालापर्यंत बहुतेक अबाधित टिकली. या शांततेच्या काळांत अनेक कारणांनीं व अनेक धोरणांनीं महाराष्ट्राचा पूर्ण बुद्धिभ्रंश झाला. महाराष्ट्रांत इंग्रजी अंमल सुरू झालेला पाहून, ज्यांचीं वतनें, इनामें अगर सरंजाम त्या घडामोडींत बुडाले, असे मानकरी व आश्रित किंवा ज्यांची विचारशक्ति मंद व मृत झाली नव्हती असे कांहीं सावध लोक फार तर मनांतल्या मनांत तडफडले असतील. परंतु बाकी समाजाला इंग्रजांचें राज्य हें फार दिवसांच्या अवर्षणानंतर आभाळांतून अवचित कोसळलेल्या पावसाच्या सरीप्रमाणें वाटलें ! हिंदु लोकांचा स्वभावच असा आहे

पुराणमताभिमानी लोकांच्या मागें सर्व जनता होती; तर दुसऱ्या पक्षाला राजसत्तेपासून होणाऱ्या अप्रत्यक्ष सहाय्याचा आधार होता. हे दोन तट पडल्यामुळें, इतके दिवस बधिर झालेल्या बहुजनसमाजाच्या गारठलेल्या बुद्धीला व भावनांना, मताभिनिवेशाची आंच लागून, जिवंतपणा आला. या मतभेदामुळें धर्माभिमान जागृत होऊन समाजाच्या विचारचक्राला गति मिळाली. इंग्रज सरकारनें आपल्या सर्वस्वाच्या संरक्षणाचा जिम्मा घेतला आहे, आतां आपल्याला उदरंभरणाशिवाय दुसरा व्याप किंवा ताप राहिला नाहीं, ही जी एकंदर समाजाची दृढ भावना झाली होती, तिला जोराचा धक्का बसला; व धर्माच्या बाबतींत सरकार केवळ उदासीन आहे, धर्मरक्षणाकरितां आपलें आपल्यालाच मेलें पाहिजे, हें लोकांना स्पष्ट दिसलें. १८२९ सालीं सती जाण्याला मनाई करणारा, १८५० सालीं धर्मांतरितांना वारसा हक्क देणारा, १८५६ सालीं विधवांच्या पुनर्विवाहाचा मार्ग मोकळा करणारा इत्यादि सुधारणांचे कायदे एका मागून एक मंजूर झाल्यामुळें, धार्मिक बाबतींत तटस्थ रहाण्याच्या सरकारच्या अभिवचनावरील लोकांची श्रद्धा नाहींशी होऊन, इंग्रजी राज्यांत धर्माचा हळुहळू लोप होत जाणार, अशी त्यांची पक्की खात्री झाली. धर्मध्वंसनाचें हें भय जर उपस्थित झालें नसतें, सश्रद्ध हिंदु समाजाच्या धर्मभावना जर दुखावल्या गेल्या नसत्या, तर तो समाज कदाचित् होता तसाच अचेतन राहिला असता. हिंदु लोकांना इहलोकापेक्षां परलोकाची पर्वा अधिक वाटते. त्या परलोकाचा केवळ सोपानच अशा त्यांच्या धर्मावर ज्या वेळीं सुधारकांनीं व ख्रिस्ती मिशनरींनीं कुऱ्हाड उचलली, त्या वेळीं सर्व समाज खडबडून जागा झाला. या मतभेदामुळें जशी धार्मिक तशीच वाङ्मयिक जागृतिही झाली. वाङ्मय हें मतप्रसाराचें सर्वश्रेष्ठ साधन आहे. विवक्षित मतांचा प्रसार ज्या समाजांत करावयाचा असेल, त्या समाजाच्या भाषेंत बोलल्याशिवाय व लिहिल्याशिवाय तें कार्य घडूं शकत नाहीं. अनुभ-

वानें ही गोष्ट माहीत असल्यामुळें ख्रिस्ती मिशनरींनीं, महाराष्ट्रांत धर्मप्रसाराकरितां पाऊल ठेवतांच, मराठी भाषेच्या अभ्यासाला आरंभ केला. त्यांच्या उद्योगानें व उत्तेजनानें मराठी भाषेच्या शोधनाला व लेखनाला चलन मिळालें आणि अर्वाचीन मराठी गद्य वाङ्मयाला सुरवात झाला. लोकहितवादीप्रभृति सुधारकांनींही साध्या परंतु जोरदार भाषेंत आपलीं मतें प्रतिपादन करावयाला प्रारंभ केला. ख्रिस्ती मिशनरींच्या मराठी भाषेच्या अध्ययनाला व लेखनाला शास्त्रीमंडळीचें साहाय्य फार असे. सरकारनेंही, श्रावण मासांत वांटल्या जाणाऱ्या, पेशव्यांच्या दक्षिणेच्या द्रव्याचा उपयोग मराठी भाषेच्या अभिवृद्ध्यर्थ करावयाचें ठरविल्यामुळें मराठी लेखकांना ती एक आश्रयाला जागा झाली. या कारणांमुळें व कांहीं अंशीं स्वयंस्फूर्तीनें शास्त्रीमंडळीनें त्या काळांत आपल्या रूपांतरित ग्रंथांनीं मराठी गद्य वाङ्मयाचा पाया घातला. मिशनरींच्या व सुधारकांच्या धर्मविघातक वाङ्मयाला उत्तर देण्याकरितां म्हणून पुराणमताभिमानी लोकांनींही आपलें वाङ्मय निर्माण केलें. अशा रीतीनें, जुन्या नव्या मतांच्या या अरणि एकमेकांवर घासल्या जात असतां, त्यांच्या संघर्षणामुळें ज्या ठिणग्या उडाल्या, त्यांतूनच पुढें महाराष्ट्राच्या सामाजिक व राजकीय वाङ्मयाचा अग्नि सिद्ध झाला.

राष्ट्रीय जागृतीच्या या प्रभातकाळांत परशुरामपंत तात्या गोडबोले, बाळशास्त्री जांभेकर लोकहितवादी, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुबुवा ब्रह्मचारी व जोतिराव फुले या सहा पुरुषांनीं संस्मरणीय कामगिरी केली. किंबहुना, त्यांच्या कर्तृत्वानेंच समाजाला आलेलें शैथिल्य नाहींसें होऊन तो सर्वांगीण प्रगतीच्या मार्गाला लागला, असें म्हटलें तरी शोभेल. रानडे आणि चिपळूणकर यांनीं पुढें महाराष्ट्रांत जे अनेकविध उद्योग उभे केले, त्यांची पूर्व तयारी या यत्नशील पुरुषांनीं केली. जुन्या मराठी कवितेविषयीं जी अभिरुचि आज महाराष्ट्रांत दिसत आहे, तिचें सर्व श्रेय नवनीतकारांना दिलें पाहिजे. परशुरामपंत तात्यांच्या प्रोत्साहनामुळेंच

माधव चंद्रोबा डुकले यांना प्राचीन मराठी कवितेचा जीर्णोद्धार करण्याची स्फूर्ति झाली; व त्यांच्या 'सर्वसंग्रह' मासिकाचें संपादन इतक्या व्यवस्थित रीतीनें व्हावयाला तात्यांचें कुशल सहाय्यच मुख्यतः कारण झालें. तात्यांनीं केलेल्या संस्कृत नाटकांच्या सुरस भाषांतरांनीं मराठींतील गद्य ललित वाङ्मयाची भूमिका तयार केली. बाळशास्त्री जांभेकर हे जरी परशुरामपंत तात्यांपेक्षां दहा वर्षांनीं लहान होते, तरी तात्यांचा पहिला ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वींच शास्त्रीबुवांच्या कर्तृत्वाचा आणि आयुष्याचाही सर्व ग्रंथ आटोपून गेला! इंग्रजी अमदानींत महाराष्ट्रामध्यें जे अतुल बुद्धिशाली पुरुष अवतीर्ण झाले, त्यांत त्यांना अग्रपूजेचा मान द्यावा लागेल. महाराष्ट्रांतील पहिले अध्यापक, संपादक आणि संशोधक म्हणून भावी इतिहासांत त्यांचा उल्लेख गौरवानें केला जाईल. 'दर्पण' हें साप्ताहिक आणि 'दिग्दर्शन' हें मासिक काढून त्यांनीं मराठी नियतकालिक वाङ्मयाचा पाया घातला. निबंधमालेच्या पहिल्या अंकांत या त्यांच्या कामगिरीचा निर्देश चिपळूणकरांनीं निरतिशय आदरानें केलेला आढळतो. लोकहितवादींच्या कर्तृत्वाचा वाङ्मयापेक्षां समाजाशीं अधिक संबंध आहे. मराठी गद्यांत ओज प्रथम त्यांनींच ओतलें. परंतु, दुसरा कोणताही विशेष वाङ्मय गुण नसल्यामुळें, त्यांचें प्रासंगिक लिखाण आज मागें पडलें आहे. ते जसे उत्साही तसेच उद्योगीही होते. त्यांनीं परिश्रमपूर्वक संकलित केलेला ऐतिहासिक आख्यायिकांचा संग्रह अतिशय मनोरंजक व नमुनेदार आहे. त्यांची महत्त्वाची अशी खरी देशसेवा वाङ्मयिक नसून सामाजिक आहे. त्यांनीं हातांत लेखणी घेण्यापूर्वीं महाराष्ट्राची स्थिति सांचलेल्या पाण्याच्या तळयासारखी झाली होती. लोकहितवादींनीं या सांचलेल्या पाण्यांत प्रथम खळबळ उत्पन्न केली. त्यांच्या तडफदार लेखांनीं समाजांत जसे तट पाडले, तसेंच तेजही उत्पन्न केलें. महाराष्ट्रांतील समाजसुधारकांचे ते अग्रेसर होत.

कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें कार्य बहुतेक वाङ्मयिक आहे. त्यांनीं मराठी गद्याचें सौंदर्य वाढविलें; व नवीन बव्हर्थ शब्दांचीं बहुमोल नाणीं पाडून मराठी भाषेला शास्त्रीय विषयांचें विवेचन करण्याचें सामर्थ्य दिलें. शास्त्रीय व टीकात्मक विवेचनाची सुबोध पद्धति त्यांनींच सुरू केली. ख्रिस्ती मिशनरींच्या चळवळीला आळा घालण्याचे जे जे प्रयत्न झाले, त्या सर्वांत त्यांचा हात होता.

विष्णुबुवा ब्रम्हचारी व जोतिराव फुले यांनीं जरी ग्रंथरचना बरीच केलेली असली, तरी त्यांच्या कर्तृत्वाचा प्रभाव वाङ्मयापेक्षां सामाजिक चळवळींवरच जास्त झाला. विष्णुबुवांचें सर्व आयुष्य ख्रिस्ती मिशनरींशीं झगडण्यांत आणि त्यांचे प्रयत्न हाणून पाडण्यांत खर्च झालें. मिशनरींनीं केलेल्या निंदेमुळें शिथिल झालेला लोकांचा धर्माभिमान त्यांनीं आपल्या उपदेशानें उद्दीपित केला. उत्तर हिंदुस्थानांत जें कार्य दयानंद सरस्वतीनीं आपल्या तपस्येचा आणि वक्तृत्वाच्या जोरावर केलें, तशाच प्रकारची कामगिरी या तपस्वी आणि वाद्पटु पुरुषानें महाराष्ट्रांत केली. दयानंदांच्या ‘ सत्यार्थप्रकाश ’ प्रमाणें विष्णुबुवांनींही ‘वेदोक्तधर्मप्रकाश’ या नांवाचा एक विस्तृत ग्रंथ लिहिलेला असून, त्यांत जुन्या धर्मविचारांची मांडणी सर्व पक्षांना संमत होईल, अशा रीतीनें केलेली आहे. धार्मिक ज्ञानाचा प्रसार करण्याच्या हेतूनें त्यांनीं ‘ भावार्थसिंधु, ’ ‘ बोधसागररहस्य ’ वगैरे आणखीही कांहीं प्रबंध प्रकाशित केले. परंतु त्या सर्वांपेक्षां निराळा असा त्यांचा अभिनव ग्रंथ ‘ सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध ’ हा होय. मनुष्यमात्राच्या दुर्दशेला बव्हंशीं कारण झालेल्या जगांतील प्रचलित राज्यपद्धतींतले दोष लक्षांत घेऊन, सर्वांना सुखदायक होईल अशा राज्यनीतीचें ध्येय लोकांच्या डोळ्यांपुढें ठेवावें, या उदात्त हेतूनें महाराष्ट्रीय व्यक्तीनें मराठींत लिहिलेला हा बहुधा पहिलाच राजकीय प्रबंध असावा. ही सूत्ररूप राज्यनीति विष्णुबुवांनीं मुद्दाम वयाच्या उतार अवस्थेंत लिहिली; व त्या दृष्टीनें

तिला बुवांचें राजकीय मृत्युपत्र म्हणावयाला हरकत नाहीं. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, पांसष्ट वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलेल्या या निबंधांत, आदर्श राज्यपद्धतीच्या स्वरूपाची चर्चा करितांना, विष्णुबुवांनीं साम्यवादाला सदृश अशा विचारांचा पुरस्कार केलेला दृष्टीस पडतो. राष्ट्रीय सभेचा जन्म होण्यापूर्वी प्रातिनिधिक राज्यपद्धतीची मागणी सरकारजवळ केल्याबद्दल न्या. रानडे यांच्या कल्पकतेचें जर इतकें कौतुक केलें जातें, तर त्याच्याही पूर्वी, ब्रिटिश सत्तेचे गोडवे गाण्यांत सारेच पुढारी गर्क झालेले असतांना, समाजसत्ताक राज्यपद्धतीचा पुरस्कार धडाडीनें करणाऱ्या विष्णुबुवांना किती धन्यवाद द्यावे! मुंबईच्या हायकोर्टांतील भाषांतरकार बाळ भास्कर शिंत्रे व एडनच्या कमिसरी खात्यांतील कॅ. फेल्प्स यांच्याकडून या निबंधाचें इंग्रजींत भाषांतर करवून, विष्णुबुवांनीं त्याच्या अनेक प्रती हिंदुस्थानांतील अधिकारी व पुढारी लोकांना आणि ब्रिटिश प्रधानांना व पार्लमेंटांतील सभासदांना वांटल्या. त्याचप्रमाणें, यूरोप व अमेरिका या खंडांतील वर्तमानपत्रांकडे त्यांनीं हा निबंध पाठविला; व त्यावर इंग्रजी पत्रांनीं चर्चाही केली, असें म्हणतात. खुद्द महाराणी व्हिक्टोरिया आणि युवराज एडवर्ड यांच्याकडेही बुवांनीं हा निबंध धाडिला होता; व युवराजांनीं त्याची आभारपूर्वक पोंचही दिली! जोतिराव फुले हे या आघाडीच्या लोकाग्रणींत केवळ वयानें किंवा जातीनेंच नव्हे, तर विद्वत्तेनेंही एकंदरींत कनिष्ठ. परंतु, त्यांचें स्थान क्रियाशून्य विद्वानांत नाहीं, तर कर्तबगार सुधारकांत आहे. समाजरचनेंतील निरनिराळ्या प्रकारची विषमता मनाला तीव्रतेनें जाणवावयाला जो भूतदयेचा जिव्हाळा अंतःकरणांत असावा लागतो, तो त्यांच्या ठिकाणीं पुष्कळच होता; व ती विषमता नष्ट करण्यासाठीं झटण्याची आणि जरूर तीं झीज सोसण्याचीही त्यांची तयारी होती. त्यामुळें दलित वर्गांच्या उन्नतीसाठीं नाना प्रकारच्या चळवळी करण्यांत त्यांचें सर्व आयुष्य गेलें.

' गुलामगिरा ', ' ब्राह्मणांचें कसब ' वगैरे त्यांचीं पुस्तकें जरी भाषेच्या दृष्टीनें हीणकस आणि विचारांच्या दृष्टीनें कांहीं बाबतींत हास्यास्पद असलीं, तरी स्त्रिया आणि अस्पृश्य यांच्या शाळांचे व त्याहीपेक्षां धार्मिक समतेचा पुरस्कार करणाऱ्या सत्यशोधक समाजाचे संस्थापक म्हणून त्यांनीं केलेलें बहुजनसमाजाच्या जागृतीचें कार्य आदरणीय आहे.

लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी व जोतिराव फुले यांच्या चळवळींचें स्वरूप सर्वस्वीं सामाजिक व धार्मिक होतें. सत्तावन सालच्या बंडानें महाराष्ट्राच्या सुप्तावस्थेंत असलेल्या राजकीय भावना जागृत झाल्या. स. १८५७ सालानंतर महाराष्ट्रांतील व हिंदुस्थानांतील विचारी लोकांचें लक्ष आपल्या देशाच्या राजकीय स्थितीकडे प्रथमच गेलें. बंडाचा वणवा विझल्यावर, कंपनीसरकारच्या जागीं राणीसरकारचें राज्य प्रस्थापित होऊन, अठ्ठावन सालचा जाहिरनामा बाहेर पडला. उदार आश्वासनांनीं भरलेल्या या जाहिरनाम्याच्या रूपानें हिंदुस्थानांत धुमसणाऱ्या असंतो-षावर जरी शांततेचें अस्तर घातलें गेलें, तरी त्यामुळें कांहीं सुबुद्ध व्यक्तींच्या मनांत उदित झालेले राजकीय विचार मावळले नाहींत. उलट, चंद्रावर अभ्रें आलीं, तरी त्याचीं काळवंडलेलीं किरणें ज्याप्रमाणें पृथ्वीवर पसरलेलींच असतात, त्याप्रमाणें ते विचार किंचित् मावळून त्यांच्या मनांत तसेच घोळत राहिले. याच सुमारास विद्यापीठांची स्थापना होऊन त्यांतून शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या सुशिक्षितांना वरिष्ठ दर्जाच्या नोकऱ्या मिळूं लागल्या. त्यामुळें सुशिक्षितवर्गांत राजकीय विचारांचा परिपोष होण्याचा संभव बराच कमी झाला. उलट बहुजनसमाजांत मात्र दिवसेंदिवस असंतोष अधिकाधिक वाढूं लागला. ख्रिस्ती मिशनरी व सुधारक यांच्या चळवळींमुळें सामान्य जनतेचें मन आधींच अस्वस्थ झालें होतें. त्यांतच, राणीसरकारचा अंमल सुरू झाल्यावर, ज्या भौतिक व राजकीय सुधारणा देशांत होऊं लागल्या, त्यांनीं या अस्वास्थ्यांत अधिक भर घातली. डलहौसीच्या कारकीर्दी-

तच आगगाड्या सुरू झाल्या होत्या. आगगाड्यांच्या फैलावामुळें धान्यसंपत्तीची विभागणी होऊन शेतकरी दरिद्री होत चालले. नियमित वेळीं रोखीनें सारा भरण्याची पद्धत अमलांत आल्यावर या दारिद्र्याला कर्जाची जोड मिळाली. सरकारचे अंमलबजावणीचे कायदेही या वेळीं मोठे कडक होते. या व अशाच इतर कारणांमुळें शेतीभातीवर गुजराण करणारी खेड्यापाड्यांतील गरीब रयत आकिंचन व असंतुष्ट झाली. धर्मोपदेशाकरितां देशांतून फिरत असतांना रयतेची ही हलाखी पाहूनच कदाचित् विष्णुबुवा ब्रह्मचारी यांना 'राज्यप्रकरणीं निबंध' लिहिण्याची स्फूर्ति झाली असेल. कारण, जमिनीच्या व इतरही सर्व प्रकारच्या उत्पन्नाच्या सामुदायिक मालकीची कल्पना त्यांत आग्रहानें प्रतिपादिलेली आहे. राजकीय जागृतीच्या या प्राथमिक काळांत गणेश वासुदेव जोशी ऊर्फ 'सार्वजनिक काका' यांनीं महनीय राष्ट्रकार्य केलें. देशांत वाढत असलेलें दुर्भिक्ष व दैन्य पाहून ज्यांच्या अंतःकरणाला पीळ पडला आणि ज्यांनीं जनसेवेकरितां स्वार्थत्यागाचें पुण्यव्रत आमरण आचरिलें, अशा महाराष्ट्रीय विभूतींत सार्वजनिक काका हे कालानुक्रमानें बहुधा पहिले येतील. शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरितां त्यांनीं फार परिश्रम केले. बंगाली लोकांच्या भावनातरल मनांत ज्या वेळीं स्वदेशी चळवळीची कल्पनाही उद्भवलेली नव्हती, त्या वेळीं सार्वजनिक काकांनीं महाराष्ट्राला स्वदेशी व्रताचा संकल्प अनुष्ठानपूर्वक सांगितला; व खादीचें कर्मकांड साबरमतीच्या आश्रमांत रचलें जाण्याच्या अर्धशतक आधीं, स्वतःच्या हातानें सूत कांतून, घरच्या मागावर विणलेलीं भरड वस्त्रें वापरण्याचीही प्रथा त्यांनीं पाडली. त्यांची देशभक्तीची कल्पना इतकी व्यापक होती व धैर्य इतकें लोकोत्तर होतें कीं, सरकारनें धडधडीत बंडखोरीचा आरोप ठेवून न्यायासनापुढें खेंचलेल्या वासुदेव बळवंत फडके यांच्यासारख्या क्रांतिकारकाचा बचाव करण्यासाठीं ते बेदरकारपणानें पुढें आले ! सरकारच्या कोणत्याही अन्याय्य कृत्याचा

प्रतिकार करावयाला ते नेहमीं सिद्ध असत. मग तो अन्याय मल्हारराव गायकवाडांच्या पदच्युतीचा असो किंवा वर्तमानपत्रांच्या मुस्कुटदाबीचा असो. स. १८६४ सालीं त्यांनीं पुण्यांत 'सार्वजनिक सभा' स्थापन करून महाराष्ट्रांतील राजकीय चळवळीला संघटित स्वरूप दिलें. सार्वजनिक काकांच्या या निस्स्वार्थ देशसेवेंतूनच पुढें महाराष्ट्राच्या प्रभावी राजकारणाचा उदय झाला.

महाराष्ट्रांतील राष्ट्रीय चळवळींच्या या प्रवर्तकांची स्मृति जरी आज बुजाली असली, तरी त्यामुळें त्यांनीं केलेल्या निरपेक्ष देशसेवेचें महत्त्व बिलकूल कमी होत नाहीं. भरतीच्या वेळीं लाटांवर लाटा उसळून, ज्याप्रमाणें नंतर आलेली लाट आधीं आलेल्या लाटेला मागें टाकते व तिचा मागमूसही नाहींसा करिते, त्याप्रमाणें राष्ट्रीय जागृतीच्या काळांत एकाहून एक कर्तृत्ववान् व्यक्तींचा उदय होऊन, पूर्वपूव व्यक्तींनीं, केवळ साधनांच्या अभावीं, अल्प प्रमाणावर पण निस्स्वाथ बुद्धीनें, केलेले उद्योग पुढें राष्ट्रीय चळवळींच्या वाढत्या व्यापांत जिरून जातात, आणि भावी पिढ्यांना त्यांचें स्मरण बहुधा राहत नाहीं. स. १८१८ सालापासून १८७५ सालापर्यंत ज्यांनीं त्या अनास्थेच्या काळांत, स्तुतिनिंदेची पर्वा न करितां, केवळ कर्तव्यबुद्धीनें देशसेवा केली त्यांची स्थिति आज अशीच झाली आहे. कलेची सुसंगत प्रगति दाखविण्याकरितां भूमीच्या थरांत दडलेले शिल्पांचे अवशेष जसे पुराणवस्तुसंशोधकाला उजेडांत आणाव लागतात, तसाच राष्ट्रीय घडामोडींची संगति बसविण्याकरितां इतिहासाच्या युगपरंपरेंत लोपलेल्या व्यक्तींच्या कर्तृत्वाचा ठाव इतिहासकाराला घ्यावा लागतो. रानडे यांच्या कल्पकतेनें लोकहितवादी आणि सार्वजनिक काका यांच्या चळवळींना पुढें व्यापक आणि भव्य स्वरूप आलें; व परशुरामपंत तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर आणि विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या विविध प्रयत्नांची परिणति चिपळूणकरांच्या निबंधमालेंत झाली.

आपल्या सभोंवतीं चालू असलेल्या या निरनिराळ्या चळवळींत चिपळूण-करांनीं सहसा मन घातलें नाहीं. पण निबंधमालेंत तत्कालीन बहुतेक घडामोडींचे उल्लेख आलेले दृष्टीस पडतात. ख्रिस्ती मिशनरी, नवीन शिक-लेली मंडळी, लोकहितवादी व जोतिराव फुले यांच्या मतांचें जागोजाग उघड खंडन केलेलें असून, सार्वजनिक काका व रानडे यांच्या चळवळींचा मधून मधून अप्रत्यक्ष उपहास केलेला आढळतो. स. १८७४ सालीं सार्वजनिक सभेनें पार्लमेंटला असा अर्ज केला कीं, हिंदुस्थानाचे प्रतिनिधि ब्रिटिश लोकसभेंत घेण्यांत यावे व त्यांच्या सल्ल्यानें हिंदी राज्यकारभार चालविला जावा. चिपळूणकरांनीं आपल्या वक्तृत्वावरील निबंधामध्यें एका वाक्यांत या मागणीची टर उडविली आहे ! देशी उद्योगधंद्यांच्या पुनरुज्जीवनार्थ सार्वजनिक काकांनीं केलेल्या निरनिराळ्या उपक्रमांची संभावनाही त्यांनीं याच पद्धतीनें ठिकठिकाणीं केल्याचें दिसून येतें. देशाभिमानी मनुष्य हा दूरदेशी किंवा राजकारणाचा दर्दी असतोच, असें नाहीं. चिपळूणकर हे देशाभिमानी होते. पण, त्या अभिमानाच्या प्रखरतेमुळें त्यांच्या वाङ्मयाला कितीही तेजस्विता आलेली असली, तरी तेवढ्यावरून त्यांचीं सर्वच राजकीय मतें समंजस किंवा समर्पक आहेत, असें मानणें योग्य होणार नाहीं. त्या वेळच्या इतर कांहीं चळ-वळींविषयीं त्यांनीं प्रकट केलेले विचार मात्र बरेच ग्राह्य वाटतात. परशु-रामपंत तात्या गोडबोले व कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या उद्योगाची, रसिकतेची व वाङ्मयसेवेची निबंधमालेंत प्रसंगोपात्त प्रशंसा केलेली आहे. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचा मालेंत कुठेंही उल्लेख सांपडत नाहीं. नाहीं म्हणावयाला, जॉनसनच्या चरित्रांत, इग्लंडमधील राजकीय मत-वैचित्र्याची चर्चा करितांना, ‘ सार्वस्विक संप्रदाय ’ म्हणजे कम्युनिझम याला पोषक अशा मतांचें प्रणयन करणारा मराठी ग्रंथ म्हणून, त्यांनीं एका टीपेंत विष्णुबुवांच्या ‘ राज्यप्रकरणीं निबंधा ’चा निर्देश केलेला आढळतो. परंतु, बुवांनीं मुंबईत दिलेल्या व्याख्यानांची व त्यामुळें

उडालेल्या खळबळीची वार्ता चिपळूणकरांना लागली नसेल, हें संभवत नाहीं. कारण बुवांचा लौकिक कलकत्ता–मद्रासपर्यंत त्या वेळीं पसरलेला होता. किंबहुना, प्राचीन हिंदु संस्कृतीचा अभिमान व तिचे निंदक जे ख्रिस्ती मिशनरी त्यांचा पाडाव करण्याची ईर्ष्या या दोहोंचीही स्फूर्ति चिपळूणकरांना विष्णुबुवांपासून मिळाली असावी, असें म्हणतां येईल. कारण, दक्षिण विद्यालयांत असतांना, तेथील वादसभेंत वाचलेल्या 'प्राचीन हिंदु लोकांचें ज्ञान' या आपल्या निबंधांत, पृथ्वी सूर्याच्या आकर्षणांत आहे असा उल्लेख वेदांत असल्याचें सिद्ध करण्यासाठीं, त्यांनीं विष्णुबुवांच्या 'वेदोक्त धर्मप्रकाशां'-तील विवेचनाचा आधार दिला होता. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या राजकीय व सामाजिक मतांची छाया निबंधमालेवर बिलकूल पडलेली नाहीं. फक्त त्यांचा धर्माभिमान व त्यांचे वाङ्मय गुण चिपळूणकरांनीं उचलले होते. ख्रिस्ती मिशनरी व नवीन शिकलेली मंडळी यांचा समाचार निबंधमालेंत अगदीं आरंभापासून घेतलेला आहे. मालेच्या पहिल्या दोन वर्षांत चिपळूणकरांचे राजकीय विचार जवळ जवळ मुळींच प्रकट झालेले नाहींत. सन १८७६ सालीं लिटनशाही सुरू होऊन लिटनच्या बेदरकार कारभारामुळें देशांत विलक्षण अस्वस्थता उत्पन्न झाली. याच काळांत मालेंत राजकीय विचार क्वचित् डोकावूं लागले; व स. १८८१ सालीं चिपळूणकरांनीं 'आमच्या देशाची स्थिति' हा राजकीय निबंध लिहिला. अशा रीतीनें भाषेच्या दुःस्थितीवरून निबंधमाला अखेर देशाच्या दुःस्थितीवर आली, हा केवळ कालमहिमा होय.

निबंधमालेचें वाङ्मय स्वरूप अत्यंत रमणीय आहे. विविध विषयांच्या सुलभ विवेचनानें व अनेक प्रकारच्या विपुल माहितीनें भरलेला इतका मनोरंजक व उद्बोधक ग्रंथ मराठींत दुसरा नाहीं. त्यांतही, मानवी आयुष्याच्या किती अल्प अवधींत ही सुंदर व भव्य इमारत

उठली, याचा विचार मनांत आला, म्हणजे चिपळूणकरांच्या कल्पकतेचा आचंबाच वाटतो. राष्ट्राची विवक्षित स्थिति व जिज्ञासा लक्षांत घेऊन मर्यादित प्रमाणावर रचलेला निबंधमाला हा, केवळ वाङ्मयाचा असा, जणुं कांहीं एक ज्ञानकोशच आहे. भूपृष्ठावर फार दूरवर पसरलेल्या विस्तीर्ण सरोवराला ज्याप्रमाणें 'सागर' म्हणतात, त्याप्रमाणें ज्ञानाचे बहुविध प्रदेश व्यापणाऱ्या विशाल निबंधसंहितेलाही 'ज्ञानकोश' म्हणणें अगदीं योग्य होईल; व त्या दृष्टीनें निबंधमालेला ज्ञानकोश म्हणावयाला हरकत वाटत नाहीं. चिपळूणकरांची ज्ञानदानाची पद्धत नीरस किंवा रुक्ष नाहीं. कोणताही विषय चि ाकर्षक करून सांगण्याची त्यांची हातोटी अगदीं अपूर्व आहे. विषय केवळ सुबोध करणें हें पुष्कळांना साधत; व असें बालबोध वाङ्मय लिहिणारे लेखक महाराष्ट्रांत चिपळूणकरांच्या वेळीं आणि पूर्वींही बरेच होऊन गेले. पण त्यांचें लेखन त्या वेळींही कोणी विशेष वाचलें नाहीं व आतांही वाचीत नाहीं. विषय नुसता सुबोध केल्यानें तो वाचकाला प्रिय होईलच, असें नाहीं. सामान्य वाचक हा बहुधा मनावरील भार हलका करण्याकरितां वाचतो. ज्या वाङ्मयांत त्याचें मन रमेल तच तो वाचणार. त्याला ज्ञान द्यावयाचें म्हणजे तें जसें सुबोध तसेंच मनोवेधकही करून द्यावें लागतें. मनोरंजन हे ललित वाङ्मयाचें साध्य असल्यामुळें सामान्य वाचकाचा त्या वाङ्मयाकडे फार ओढा असतो. विवक्षित विषयाच्या मुद्देसूद विवेचनानें भरलेले लेख सहसा मनोरंजक होत नाहींत; व म्हणन सामान्य वाचकाला विवेचनात्मक निबंध वाचणें फार जड जातें. बोध आणि मनोरंजन यांचा मिलाफ ज्यांत झालेला आहे, असें ललितेतर वाङ्मय मात्र सामान्य वाचकही गोडीनें वाचतो. लोकशिक्षणाचा हेतु नुसतें बोधप्रद वाङ्मय लिहिल्यानें साधत नाहीं. लोकशिक्षणाकरितां जें वाङ्मय लिहावयाचें, तें जसें बोधप्रद तसेंच चित्तवेधकही असलें पाहिजे. तरच तें लोक वाचतात. निबंध-

मालेचा हेतु भाषाशोधनाइतकाच लोकशिक्षणाचाही होता. त्यामुळेंच बहुधा चिपळूणकरांनीं आपले निबंध शक्य तितके मनोवेधक केले आहेत. कोणताही लेख मनोरंजक व्हावयाला त्यांत हृद्यंगम भावना, सुगम आणि सरस विवेचन, सुंदर किंवा चमत्कृतिपूर्ण कल्पना, चटकदार वर्णनें अथवा खुबीदार विनोद यांपैकीं कांहीं ना कांहीं तरी एक गुण अवश्य हवा. निबंधमालेंतील बहुतेक लेखांत हे सारे गुण कमी अधिक प्रमाणांत असल्यामुळेंच मालेला इतकी विलक्षण मोहकता आली आहे. केवळ विद्वत्तापूर्ण व बोधप्रद असून पुन्हा इतके चित्ताकर्षक असलेले निबंध मराठींत चिपळूणकरांपूर्वी कोणीही लिहिले नव्हते. याही कारणामुळें माला फार थोड्या अवधींत लोकप्रिय झाली. ॲडिसनपेक्षां चिपळूणकरांची भाषा अधिक आकर्षक परंतु कमी सुगम आहे. याला कारण, त्यांनीं आपली भाषा श्रमपूर्वक नटविली, हें होय. ॲडिसनच्या लेखांत सुंदर कल्पनांची मुबलक पेरणी मुळींच केलेली नसते; व भाषेचा ओघ सहज असतो. त्याचे लेख चित्तवेधक व्हावयाला त्याचा गर्भित, सूचित व स्पष्ट विनोद कारण झाला आहे. चिपळूणकरांचा विनोद ख्रिस्ती मिशनरी व नवीन शिकलेली मंडळी या दोन ठराविक विषयांवरच बहुधा चालतो. त्यामुळें तो प्रथम कितीही हास्यप्रचुर भासला, तरी पुढें त्यांत विशेष मौज वाटत नाहीं. सूचक विनोद जितका आनंद देतो, तितका स्पष्ट विनोद देत नाहीं. चिपळूण-करांचा बहुतेक विनोद स्पष्ट आहे. व्यक्तीच्या वैरूप्यावर केलेला विनोद हा जितका कमी दर्जाचा असता, तितकाच भाषेच्या वैरूप्यावर केलेला विनोदही असतो. मात्र व्यक्तिविषयक विनोद हा भाषाविषयक विनो-दाइतका निर्दोष असत नाहीं. व्यक्तिविषयक विनोदांत, जी गोष्ट मनु-ष्याच्या स्वाधीन नाहीं, त्या गोष्टीबद्दल त्याचा निर्दय उपहास केलेला असतो. उलट भाषाविषयक विनोदाच्या मुळाशीं सुधारणेची योग्य सदिच्छा असते; व त्यामुळें तो विनोद थोडा निर्दय असला, तरी

निर्दोष, उपकारक आणि आनंददायक वाटतो. चिपळूणकरांच्या भाषा-विषयक निबंधांतील विनोद अशा तऱ्हेचा आहे. समाजाच्या आचरट व बालिश समजुतींवर केलेला विनोद 'संपत्तीचा उपभोग' व 'लोक-भ्रम' या निबंधांत आढळतो. हा विनोदही सद्धेतुप्रेरित, स्पष्ट व हास्य-कारक आहे. बाकी लेखांतील विनोदाचा भर अतिशयोक्ति, उपरोध, उपहास आणि विरोधाभास यांवरच फार दिसतो; व तो वाचतांना स्विफ्ट, पोप, जूनियस, मेकॉले वगैरे लेखकांची आठवण होते.

ॲडिसनप्रमाणें चिपळूणकरांचाही प्रत्येक लेखावर सुभाषित घाल-ण्याचा रिवाज होता. लेखांवर सुभाषितें घालण्याच्या या पद्धतीसंबंधीं ॲडिसननें आपल्या पत्राच्या २२१ व्या अंकांत थोडक्यांत परंतु मार्मिक स्पष्टीकरण केलें आहे. त्या लेखांत म्हटल्याप्रमाणें मनुष्याला जशी मोहक मुद्रा तसें लेखाला सुंदर सुभाषित होय. सुभाषित हें लेखां-तील विषय सुचविणारें अगर खुलविणारें हवें. त्यानें जसा लेखकाचा व्यासंग तसाच लेखाचा विषय सुचविला अगर खुलविला गेला, तरच तें घातल्याचा उपयोग. नाहीं तर तें लेखकाच्या भारवाही विद्वत्तेचें निदर्शक होऊन लेखालाही केवळ भारभूत होतें. सुभाषिताचा उपयोग करण्यांत लेखकाची विद्वत्ता, मार्मिकता व योजकता व्यक्त होते. ॲडिसन व चिपळूणकर यांनीं आपल्या लेखांवर घातलेलीं सर्व सुभाषितें अल्पा-क्षररमणीय व समर्पक आहेत. ॲडिसन सुभाषितांची निवड युरोपांतील 'संस्कृत' वाङ्मयांतून करीत असे; व चिपळूणकरांचाही तसाच प्रघात होता. निबंधमालेंतील बहुतेक सुभाषितें संस्कृत आहेत. मराठी सुभाषितें दहा बाराच सांपडतात. 'डॉक्टर जॉनसन' या चरित्रात्मक निबंधाच्या आरंभीं हिंदी सुभाषित घातलेलें आहे. सुभाषितांप्रमाणेंच रम्य कल्प-नाही निबंधमालेंत ठिकठिकाणीं विखुरलेल्या आढळतात. चटकदार वर्णनेंही जागोजाग आहेत. पण, नवीन शिकलेली मंडळी व मिशनरी हेच पुष्कळ वेळां वर्ण्यविषय होत असल्यामुळें, सर्वच वर्णनें सारखीं

मजेदार वाटत नाहींत. त्याचप्रमाणें, चिपळूणकर विवेचनाच्या भरांत या त्यांच्या ठरीव विषयांवर एकदां येऊन थडकले, म्हणजे त्यांना बिलकूल भान राहत नाहीं व निबंध फुगत जातो. निबंधमालेला अशी सूज बरीच आली आहे. या विषयांना त्या वेळीं फार महत्त्व होतें; व लोकशिक्षणाच्या दृष्टीनें ही पुनरुक्ति इष्ट आणि आवश्यक होती, हें निर्विवाद आहे. किंबहुना, ही जाणीव मनांत सतत वागत असल्यामुळेंच, चिपळूणकरांनीं हा पुनरुक्तीचा दोष उघड्या डोळ्यांनीं पत्करलेला दिसतो. 'वक्तृत्व' या निबंधांतल्या दयानंद प्रभृतींवरील टीकेवर 'हितेच्छू'नें घेतलेल्या आक्षेपांना उत्तर देतांना त्यांनीं असें स्पष्टच विचारलें आहे कीं, नव्या मंडळींना जर जुन्या लोकांच्या आचरणांतील दोष दाखवून "हास्यरस यथास्थित पिकविल्याखेरीज आपलें व्याख्यान रंगलेंसें वाटत नाहीं, तर तोच श्लाघ्य क्रम पुढें चालवण्यास आमच्या निबंधमालेसच कां आडकाठी असावी?" इतकेंच नव्हे, तर तत्कालीन कांहीं व्यक्तींचा आणि वर्गांचा दंभस्फोट करितांना, आपल्या या कृतसंकल्पानुसार, त्यांनीं जाणूनबुजून कठोर आणि निंदाव्यंजक टीकेचें गरळ मालेंत ओतलें आहे. जणुं कांहीं, परमहंसांच्या मतलबसिंधुविषयीं, जगत्तारकाच्या प्रेषितांविषयीं, सत्याची दिवटी पाजळणारांविषयीं किंवा शेंदोनशें रुपयांच्या लालचीस भुलून दगेखोरपणाचें काम पत्करणाऱ्या अधमाधमाविषयीं लिहिण्याचा प्रसंग आला, म्हणजे त्यांच्या अंगांत जूनियसचा संचार होत असे! त्यांच्या या विषादिग्ध टीकापद्धतीबद्दल त्यांचे वडील कृष्णशास्त्री चिपळूणकर किंवा सहाध्यायी रा. ब. महाजनि यांनीं त्यांना अनेकदां दोष दिला होता. एकदां महाजनि हे चिपळूणकरांच्या भेटीला गेले असतां, त्यांच्याजवळ पडलेले जूनियसच्या पत्रांचे खंड पाहून, ते त्यांना म्हणाले, "काय हो, हीं पुस्तकें तुम्ही कशाला वाचतां? अगोदर तुमच्या लेखणींत काय कमी विष आहे, ते तुम्ही तिला जूनियस वाचून अधिक पूट देऊं पहातां!"

परंतु, त्या वेळीं समाजांत माजलेलीं दुर्मतें व स्वतःला देशहितेच्छु म्हणविणारांचा दांभिकपणा लक्षांत घेतला असतां, त्यांचा विध्वंस करावयाला उपयोगी पडलेला चिपळूणकरांच्या वाणींतील हा विषार सत्कारणीं लागला, असेंच म्हणावें लागतें. आज त्या विषयांचें प्रासंगिक महत्त्व लोपलेलें असल्यामुळें, आतां ती ठरीव स्वरूपाची टीका दुःसह वाटावी, हें साहजिकच आहे. मालेंतील उत्तम निबंधही या पुनरुक्तीमुळें पुष्कळच बेडौल झाले असून, कांहीं निबंधांची भाषाही संस्कृतप्रचुर व बोजड झाली आहे. ‘ मोरोपंताची कविता ’ या निबंधाची भाषा कित्येक ठिकाणीं बरीच क्लिष्ट व बोजड वाटते. सुंदर कल्पना किंवा चटकदार वर्णनें घालण्याच्या बाबतींत मेकॉले व चिपळूणकर यांच्यांत फार साम्य आहे. भाषा सजविण्याची आवडही दोघांना सारखीच होती. आपल्या वाचनांत आलेल्या अनेक ग्रंथांतून दृष्टांत देणें अगर संदर्भ दर्शविणें, हाही चिपळूणकरांचा मेकॉलेप्रमाणें एक विशेष आहे. ॲडिसन व मेकॉले यांच्या कृतींतील असे कांहीं उत्तम गुण निबंधमालेंत समुदित झालेले असल्यामुळेंच तिला इतकें आकर्षक स्वरूप प्राप्त झालें आहे.

निबंधमालेंतील वाङ्मय जितकें आकर्षक तितकेंच परिणामकारकही आहे. भावनांचे चढते उद्रेक दाखवून कोणतेंही वाङ्मय परिणामकारक करितां येतें. परंतु असलें भावनोत्कट वाङ्मय सहसा टिकाऊ होत नाहीं. परिणाम करणें एवढाच गुण ज्या वाङ्मयांत भरला आहे, अशा वाङ्मयाला शाश्वती क्वचितच मिळते. नुसती भावनांची उत्कटता गद्यांत उचित वाटत नाहीं. काव्यांत जसें भावनेचें तसें गद्यांत बुद्धीचें प्रभुत्व असतें भावनांचें मार्दव कवितेला खुलवितें आणि बुद्धीच्या प्रभावानें गद्याला कणखरपणा येतो. कवितेचें स्वरूप जसें कोमल, तसें गद्याचें प्रगल्भ असावें लागतें. हृदयाला हलविणें—भावनांना उद्दीपित करणें—हा जसा काव्याचा, तसा बुद्धीला वळविणें—मनाची खात्री पटवून देणें—हा

गद्याचा विशेष होय. काव्यांत जशी चमत्कृति, तशी गद्यांत समंजसता प्रधान असते. भावनांची उत्कटता किंवा चमत्कृति ज्यांत फार असते, त्या गद्याला सामान्यतः 'गद्यकाव्य' म्हणतात. वाल्मीकीच्या रामचंद्रांत व भवभूतीच्या रामचंद्रांत जितकं अंतर आहे, तितकेंच गद्यांत व गद्यकाव्यांत असतें. ललित शब्दसृष्टींत भवभूतीच्या रामचंद्राप्रमाणें प्रकृतिमधुर दिसणाऱ्या हृदयंगम गद्याला, भौतिक व तात्त्विक विवेचनाच्या वाग्व्यवहारांत उतरल्यावर तर, विशाखदत्ताच्या चाणक्याप्रमाणें केवळ अभ्यासजड व तर्ककर्कश स्वरूप येतें. सत्य तत्त्वांच्या किंवा सुसंगत विचारांच्या अनुषंगानें ज्यांत भावनांचा परिपोष किंवा प्रकर्ष झालेला असतो, तें वाङ्मय जसें परिणामकारक तसेंच प्रत्ययोत्पादकही होतें. निव्वळ भावनापूर्ण वाङ्मय जो परिणाम करील, तो फारच थोडा वेळ टिकेल. पण, त्याला जर प्रत्ययाची जोड मिळाली, तर तो परिणाम चिरकाल टिकतो. भावनेची बुद्धीशीं व परिणामाची प्रत्ययाशीं ज्यांत सांगड घातलेली असते, तेंच वाङ्मय व्यक्तीच्या किंवा समाजाच्या मनावर चिरस्थायी परिणाम करितें. नाहीं तर, वस्त्राला दिलेला कच्चा रंग कोरेपणीं जरी कितीही भडक दिसला व डोळ्यांत भरला, तरी पाणी दाखवितांच जसा ताबडतोब उतरतो, तसाच निव्वळ भावनामय वाङ्मयाचा परिणाम मनावर प्रथम जरी कितीही दृढ झालेला दिसला, तरी त्याला बुद्धीची चुणूक दाखवितांच तो डळमळावयाला मुळींच वेळ लागत नाहीं. निबंधमालेंतील बहुतेक वाङ्मय जितकें परिणामकारक तितकेंच प्रत्ययोत्पादक आहे. भावना आणि ओज यांचा उचित आविर्भाव ज्यांत झालेला आहे, तें वाङ्मय मनावर फार परिणाम करितें. निबंधमालेंत हे दोन्ही गुण ओतप्रोत भरलेले आहेत. मालेंतील भावनांच्या मुळाशीं चिपळूणकरांना देशस्थितीविषयीं वाटणारी तळमळ व कळकळ आहे; आणि तिच्यांतील ओज त्यांच्या उत्कट आत्मप्रत्ययांतून व देशा-

भिमानांतून अवतरलें आहे. त्यांनीं केलेलें देशस्थितीचें आकलन जरी अचूक नसलें, तरी बरेंच बरोबर होतें. त्यांची देशोद्धाराची सर्व भिस्त दिव्य पूर्वपरंपरेची विलुलित स्मृति जागृत करून स्वाभिमान उत्पन्न करण्यावर होती. स्वाभिमान हें अभ्युदयाचें अधिष्ठान आहे. स्वाभिमाना-शिवाय तेज नाहीं, तेजाशिवाय पराक्रम नाहीं व पराक्रमाशिवाय अभ्युदय नाहीं. विषण्ण आणि विपन्न स्थितींत असलेल्या राष्ट्राचा स्वाभि-मान जागृत करून त्याचें मानसिक दास्य नष्ट करणें, हा एकच उपाय त्याच्या उद्धाराचा आहे.

**निवसंति पराक्रमाश्रया न विषादेन समं समृद्धयः ।**

ही भीमाची ओजस्वी उक्ति जशी व्यक्तीला तशीच राष्ट्रालाही लागू पडते. महाराष्ट्राच्या अवनत स्थितीवर चिपळूणकरांनीं योजलेला उपाय निस्संशय अत्यंत योग्य होता. पूर्वेतिहासाचें, पूर्वपरंपरेचें आणि पूर्व-वाङ्मयाचें त्यांना उत्तम ज्ञान होतें; व त्या ज्ञानावरच त्यांच्या देशा-भिमानाची उभारणी झालेली होती कांहीं न वाचतां, कांहीं न विचार करितां केवळ अनुकरणानें व अविचारानें बनलेला देशाभिमान उथळ व थिल्लर असतो. चिपळूणकरांचा देशाभिमान असा पोकळ नव्हता. त्यांचा आत्मप्रत्यय अयोग्य होता, असें कोण म्हणेल ? कांहीं न करितां केवळ दर्पानें सदासर्वकाळ शरदभ्रांप्रमाणें गरजणाऱ्या वंध्य-कर्तृत्व व्यक्तींप्रमाणें चिपळूणकरांचा आत्मप्रत्यय अनुचित किंवा असंस्कृत नव्हता. पावसाळ्यांत होणारा मेघांचा गडगडाट जरी कानांना सुखावह वाटला नाहीं तरी मनांत उत्कंठा, प्रेम व आनंद उत्पन्न करि-तोच कीं नाहीं ? मालेचा तिसावा अंक संपवून उठतांना चिपळूणकर आपल्या बंधूंना म्हणाले—

" I am the Shiwaji of the Marathi language who had not his equal either to precede or succeed him ! "

हे उद्गार चिपळूणकरांनीं निबंधमाला निघून अडीच वर्षें झाल्यानंतर

काढिले आहेत. त्यांचे सर्व उत्कृष्ट भाषाविषयक निबंध या अवधींत बाहेर पडले होते. मालेंतील निबंधांनीं समाजांत आणि सत्ताधारी वर्गांत उत्पन्न केलेली खळबळ त्यांनीं या काळांत पाहिली आणि अनुभविली होती. ही स्थिति लक्षांत घेऊन चिपळूणकरांचे अभिमानोद्गार वाचले, तर ते खचित अयथार्थ वाटणार नाहींत. भरतीच्या वेळीं होणारी समुद्राची भव्य आणि उद्दाम गर्जना ऐकून कोणाचें मन उल्लसित होत नाहीं ? उदास आणि उद्विग्न झालेल्या समाजांत ज्याच्या ऊर्जस्वल वाणीनें उत्साह आणि अभिमान उत्पन्न केला, त्याला ही दर्पोक्ति निर्विवाद शोभते. मराठ्यांच्या स्वातंत्र्याचा पुनरुद्धार शिवछत्रपतीनें केला आणि मराठ्यांच्या वाङ्मयाचें पुनरुज्जीवन चिपळूणकरांनीं केलें. स्वदेशाच्या आणि स्वधर्माच्या पुनरुद्धाराला सतराव्या शतकांत शिवछत्रपतीचे प्रयत्न जसे कारणीभूत झाले, तसेच एकोणिसाव्या शतकांत चिपळूणकरांचे झाले, यांत शंका नाहीं. नर्मदेच्या प्रवाहाला अवरोध करणाऱ्या सहस्रार्जुनाप्रमाणें ज्यानें राष्ट्रांतील प्रतिगामी विचारांच्या प्रचंड ओघाला आळा घातला, त्याला गर्व झाल्यास तें क्षम्य आहे. चिपळूणकरांनीं ‘ गर्व ’ या विषयावरील आपल्या उत्कृष्ट निबंधांत कर्तृत्ववान् व्यक्तींच्या या अवगुणाचें समर्पक समर्थन केलें आहे. तें त्यांनाही उत्तम रीतीनें लागू पडतें. चिपळूणकरांचा देशाभिमान आणि आत्मप्रत्यय तेजस्वी होता; व त्यामुळेंच त्यांच्या वाणींत इतकें ओज भरलें आहे. देशस्थितीविषयीं त्यांना वाटणारी तळमळ व कळकळ केवळ अमर्याद होती. बत्तीस वर्षांच्या अल्प आयुष्यांत मनानें, वाणीनें व शरीरानें जितकी म्हणून देशाची सेवा करितां येईल, तितकी त्यांनीं निष्ठेनें केली. त्यांच्या अंतःकरणांतील हे सर्व विकार आणि विचार निबंधमालेंत पूर्णपणें आविर्भूत झाले आहेत; व म्हणूनच तिला इतकें परिणामकारक स्वरूप आलें आहे. त्यांनीं एकाद्या व्यक्तीची किंवा संस्थेची अवज्ञा किंवा विटंबना केली असली, तरी ती केवळ सद्धेतूनें प्रेरित होऊन, दुष्ट बुद्धीनें नव्हे.

'वक्तृत्व' या निबंधावरील 'हितेच्छू'च्या आक्षेपांचें खंडन करितांना हिंदी सुधारकांचे अग्रणी राजा राममोहन राय यांचा त्यांनीं केलेला निर्देश किंवा लोकहितवादींच्या निबंधसंग्रहावरील टीकेला प्रारंभ करण्यापूर्वीं त्यांच्या लोककल्याणासाठीं सतत चाललेल्या परिश्रमांची त्यांनीं केलेली प्रशंसा ही त्यांच्या प्रांजळ बुद्धीची निदर्शक आहे. त्यांच्या कांहीं टीका केवळ अविचारानें केलेल्या आहेत, हें खरें. परंतु तो अविचारही देशाभिमानमूलकच होता, हें अवश्य लक्षांत घेतलें पाहिजे. निबंधमालेंतील बहुतेक भावनात्मक वाङ्मय निर्दोष आहे. चिपळूणकरांच्या या विकारप्रेरित लेखनानें महाराष्ट्रांत घडवून आणिलेलें विचारपरिवर्तन पाहिलें, म्हणजे पुष्पदंताच्या--

**विकारोऽपि श्लाघ्यो भुवनभयभंगव्यसनिनः ।**

या उद्गारांचें मर्म मनाला बरोबर पटतें. विकारप्रेरित वाङ्मयाची महती त्यानें केलेल्या परिणामावर अवलंबून असते. आणि, त्या दृष्टीनें विचार केला, तर चिपळूणकरांचें विकारप्रेरित वाङ्मय फार श्रेष्ठ ठरतें, व तसें तें आहेही. निबंधमालेंतील भावनात्मक वाङ्मयाच्या मागें चिपळूणकरांचा निस्सीम स्वदेशाभिमान आणि स्वार्थत्याग आहे; व म्हणूनच देशाभिमान निर्माण करणें हें निबंधमालेचें शाश्वत नियत कार्य होऊन बसलें आहे.

## ३

चिपळूणकरांच्या निबंधांनीं महाराष्ट्रांत जसा देशाभिमान तसाच भाषाभिमानही उत्पन्न केला. निबंधमाला ज्या वेळीं निघाली, त्या वेळच्या मराठी भाषेच्या दुःस्थितीचें वर्णन मालेच्या पहिल्याच अंकांत केलेलें आहे. तें अतिशयोक्त नाहीं. शनिवार वाड्यावर तांबडें निशाण फडकल्यानंतर, पांच वर्षांच्या आंतच, मुंबईचा तत्कालीन गव्हर्नर मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यानें नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी स्थापन केली; व तिची शाखा म्हणून 'हैंद शाळापुस्तकमंडळी' ( The Native

School Book and School Society ) ही वेगळी संस्था काढून, तिच्या मार्फत शालोपयोगी वाङ्मय निर्माण करविलें. एल्फिन्स्टन हा वयाच्या बाविसाव्या वर्षापासून, इंग्रजांचा वकील या नात्यानें, पेशव्यांच्या दरबारांत वावरलेला होता; व मराठ्यांच्या वैगुण्यामुळें झालेला त्यांच्या सत्तेचा विनाश जसा त्यानें पाहिला होता, तशीच त्यांच्या दुर्दम स्वातंत्र्याकांक्षेचीही प्रतीति त्याला आलेली होती. त्यामुळेंच बहुधा, त्याच्या तंबूंतील मराठी पुस्तकांचा ढीग पाहून, मराठायुद्धांतील त्याच्या हाताखालचा एक सेनानी ले. क. ब्रिग्ज यानें त्याला, "हीं सारीं पुस्तकें कशासाठीं?" असा प्रश्न विस्मयानें विचारला असतां, त्या मुत्सद्यानें त्याला असें मार्मिक उत्तर दिलें कीं, "एतद्देशीयांच्या शिक्षणाकरितां!— पण त्यांचें शिक्षण हा कदाचित् आपला युरोपला परत जाण्याचा राजमार्ग ठरेल!" एल्फिन्स्टनला नेहमीं अशी भीति वाटत असे कीं, असंतोषाला थोडेंसें कारण दिलें असतांनाही ब्राह्मणवर्ग बिथरून जाऊन ब्रिटिश सत्तेवर उलटेल. म्हणून, पुणें शहर ताब्यांत येतांच बाळाजीपंत नातूंसारख्या पेशव्यांच्या सजातीयाकडून त्यानें शनिवार वाड्यावर तांबडें निशाण चढविलें; व वाईसारख्या क्षेत्रस्थानीं मुद्दाम शास्त्रीपंडितांची संभावना करून ब्रह्मवृंदाचा संतोष साधला. इंग्रजांचा एकछत्री अंमल सुरू झालेला बघून मिशनरींना जेव्हां शाळांतून ख्रिस्ती धर्माचें शिक्षण देण्याची हांव सुटली, तेव्हां एल्फिन्स्टननें, आपल्या शिक्षणविषयक खलित्यांत, सरकारला असा स्पष्ट इषारा दिला कीं, " शिक्षणाच्या योजनेंत धर्माची भेसळ करावयाला माझा तीव्र विरोध आहे.......त्यामुळें ब्राह्मणांना भावी संकटाचा इषारा मिळून, आपल्या शिक्षणाच्या योजनाच केवळ निष्फळ होतील असें नव्हे, तर साम्राज्यही ढांसळून पडेल!" एल्फिन्स्टनला वाटलेली ही भीति किती अर्थपूर्ण होती, हें पुढें विचारलहरी, दंभहारक व निबंधमाला या नियतकालिकांच्या आणि थोरले शास्त्रीबुवा, विष्णुबुवा ब्रह्मचारी व चिपळूणकर या पुरुषांच्या कर्तबगारीवरून अंशतः दिसून आलें.

हैंद शाळापुस्तकमंडळीच्या व्यवस्थापकांत जगन्नाथ शंकरशेट, सदाशिव काशिनाथ छत्रे, धाकजी दादाजी, बाळशास्त्री जांभेकर प्रभृति मुंबईतील तत्कालीन प्रमुख गृहस्थ होते. या मंडळीनें १८२५ च्या एप्रिलमध्यें, ग्रंथरचनेला उत्तेजन देण्यासाठीं, एक पत्रक काढून असें जाहिर केलें होतें कीं, "बालबोध ग्रंथ अथवा प्रौढ ग्रंथ—चांगलीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ. बालबोधास बक्षीस १०० ते ४०० रु. प्रौढ ग्रंथ २ ते ५ हजार रु.—याहूनही विशेष केल्यास विशेष शिफारस गौरनर यांस होईल." ग्रंथप्रकाशनाच्या कार्यावर या मंडळीनें, पांच वर्षांच्या अवधींत, दोन लाखांपेक्षां अधिक रक्कम खर्च केली. पण तिनें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत कॅ. केपिन याचें ग्रँट डफ याच्या मराठ्यांच्या इतिहासाचें भाषांतर व मोलस्वर्थ-कँडी यांचा कोश हे दोनच ग्रंथ काय ते उल्लेखनीय असे आढळतात. बाकीचें बहुतेक प्रकाशन हें, सर फेरोजशहा मेहता यांनीं म्हटल्याप्रमाणें, ज्या कागदांवर छापलें गेलें, त्यांच्याही मोलाचें नव्हतें. फेरोजशहांच्या या विधानांत जरी कदाचित् आतिशयोक्तीची थोडी छटा असली, तरी, लक्षावधि रुपयांच्या खर्चाच्या मानानें, सोसायटीनें तयार करविलेलें हें वाङ्मय एकंदरींत हीणकस होतें, असेंच म्हणावें लागेल. किंबहुना, न्या. रानडे यांनीं, आपल्या मराठी पुस्तकांच्या यादीवरील समालोचक इंग्रजी लेखांतही, बव्हंशीं असेंच मत दिलें आहे. सन १८१७ सालच्या अखेर शनिवार वाड्यावर तांबडें निशाण चढलें व स. १८६८ सालच्या आरंभीं चिपळूणकरांनीं लेखनाला सुरवात केली. या अवधींत एकंदर ६६१ मराठी पुस्तकें प्रसिद्ध झालीं. पण, अर्धशतकांत उत्पन्न झालेल्या या साहित्यसंभारामध्यें स्वतःची कल्पना चालवून लिहिलेली 'मुक्तामाले' सारखी कादंबरी, स्वतंत्र बुद्धीनें रचिलेलें 'माधवरावा'सारखें नाटक किंवा नवीन विचारांनीं प्रस्फुरित झालेला 'वेदोक्तधर्मप्रकाशा'सारखा ग्रंथ एकाद दुसराच दिसतो. त्यामुळें न्या. रानडे यांच्यासारख्या गुणग्रहणशील पुरुषानें

सुद्धां, आपल्या लेखांच्या समारोपांत, या वाङ्मयाविषयीं असे उद्गार काढले आहेत कीं, " निरपेक्ष बुद्धीनें पाहिलें असतां हा आढावा मुळींच समाधानकारक वाटत नाहीं...... तिऱ्हाइताला तर आपलें प्रस्तुत वाङ्मय बालिश आणि अप्रयोजकपणाचें वाटेल. या लाजिरवाण्या स्थितींतून बाहेर पडावयाला अनेक शतकें कळकळीनें परिश्रम करावे लागतील !" आपल्या समालोचनांत त्यांनीं, विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या 'वेदोक्तधर्मप्रकाशा'शिवाय, अन्य कोणत्याही ग्रंथाचा उल्लेख आदरानें केल्याचें दृष्टीस पडत नाहीं. किंबहुना, सुधारकांचे अग्रणी आणि आघाडीचे ग्रंथकार म्हणून ज्या लोकहितवादींना अलीकडे पुष्कळच महत्त्व देण्यांत येत असतें, त्यांच्या नांवाचा सुद्धां निर्देश, इतर लेखकांच्या ग्रंथरचनेची माहिती साक्षेपानें देणाऱ्या, सूक्ष्मदर्शी न्यायमूर्तींनीं आपल्या मराठी वाङ्मयावरील इंग्रजी लेखमालेंत केलेला नाहीं.

वस्तुतः तत्कालीन लेखकवर्गांत सदाशिव काशिनाथ छत्रे, हरि केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, गोविंद नारायण माडगांवकर, लोकहितवादी, केरोपंत छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित, विश्वनाथ नारायण मंडलिक प्रभृति मातबर विद्वानांचीं नांवें आढळतात. पण, त्यांनीं निर्माण केलेला ग्रंथसंभार पहावा, तर त्यांत इसापनीति, यात्रिकक्रमण, भूगोलशास्त्र, शब्दसिद्धि, शुचिर्भूतपणा, कोलंबसाचा वृत्तांत, पदार्थविज्ञान, सॉक्रेटिसाचा इतिहास, एल्फिन्स्टनच्या हिंदुस्थानाच्या इतिहासाचा अनुवाद अशा प्रकारचें शालोपयोगी किंवा भाषांतरित वाङ्मय दृष्टीस पडतें. फुलांतले रसगंध सेवन करीत हिंडणाऱ्या भ्रमरांच्या पंखांना परागकण चिकटून, त्यामुळें वनस्पतींच्या फलधारणेस ज्याप्रमाणें न कळत साहाय्य घडावें, त्याप्रमाणें इंग्रजी साहित्यांत विहार करणाऱ्या या रसिकांच्या लिखाणामुळें मराठी वाङ्मयांत नवीन कल्पनांचा प्रसार व्हावयाला अप्रत्यक्ष मदत काय झाली असेल, तेवढीच. त्यांचे ग्रंथ आज जिज्ञासेनें प्रत्यक्ष

चाळावयाला गेलें, तर न्यायमूर्तींनीं त्यांच्यावर केलेला पोरकटपणाचा आरोप समर्पक वाटल्याशिवाय रहात नाहीं. त्यांच्यापैकीं बहुतेक ग्रंथकार इंग्रजी वाङ्मयाचे अभिज्ञ होते; व त्यांनीं इंग्रजी भाषेंत लिहिलेले संशोधनात्मक प्रबंध किंवा इतर लेख पाहिले असतां, त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल कोणालाही आदरच वाटेल. परंतु, त्यांच्या बुद्धीची ती कुशाग्रता किंवा लेखणीचें तें कौशल्य मराठी भाषेच्या वांटणीला मात्र फारसें येऊं नये, हें आश्चर्य नव्हे काय ? किंबहुना, ज्या न्यायमूर्तींचें मराठी भाषेवर इतकें नितांत प्रेम होतें, आणि विद्यापीठांत तिचा प्रवेश व्हावा म्हणून ज्यांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली, त्यांचीं फक्त कांहीं धर्मपर व्याख्यानेंच तेवढीं मातृभाषेंतून दिलेलीं वाचावयाला मिळावीं, याबद्दल कोणाला खेद वाटणार नाहीं ? हें वैषम्य मनाला तीव्रतेनें जाणवल्यामुळेंच बहुधा चिपळूणकरांनीं निबंधमालेचा उद्देश विशद करितांना असे उद्गार काढले आहेत कीं, " मराठींत ग्रंथ लिहून आपल्या इंग्रजी विद्वत्तेस बट्टा आणणें हें तर नवीन विद्वानांना अगदीं आवडत नाहीं. प्रसंग आल्यास ते आपल्या महासनावरून मराठींतील ग्रंथांवर अभिप्राय देतात. पण तेही अडाणी लोकांच्या भाषेंत त्यांस समजतीलसें नव्हेत. तर फर्डेशाई इंग्रजींत !"........." आपले अमूल्य विचार प्रदर्शित करणें झालेंच, तर इंग्लिश भाषेहून हलक्या द्वारानें ते लोकांच्या मनांत शिरकविणें त्यांस अगदीं आवडत नाहीं. पण, सद्धर्मोपदेश करतांना अगर देशहिताबद्दल बोध करणें झाल्यास असल्या अडाणी लोकांशीं जेव्हां गांठ पडतेच, तेव्हां त्यांस क्षणभर आपली योग्यता एकीकडे ठेवावी लागते. " या उद्गारांतील उपरोध मर्मभेदक असला, तरी त्यांत अतिशयोक्तीचा अंश यत्किंचितही नाहीं. विशेषतः, प्रार्थनासमाजांतील उपासनासुद्धां त्या वेळीं पुष्कळदा इंग्रजींतून होत असत, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां चिपळूणकरांच्या या उपरोधिक टीकेबद्दल त्यांना कोण दोष देईल ?

तत्कालीन मराठी वाङ्मयांत हें जें विचारदारिद्र्य दृष्टीस पडतें, त्याचें मुख्य कारण आत्मविश्वासाचा अभाव हें होय. हा अभाव दुहेरी होता. एक तर, मराठी भाषा ही आपल्या प्रगत विचारांचें वाहन व्हावयाला पात्र नाहीं, अशी अव्वल इंग्रजी अमदानींतील सुशिक्षितांची प्रामाणिक समजूत होती; व दुसरें असें कीं, आपण यदाकदाचित् आपले विचार मराठी भाषेंतून व्यक्त केलेच, तरी ते लोकांना कितपत समजतील, याबद्दलही त्यांना जबर संशय होता. वस्तुतः, ज्या भाषेंतील ग्रंथरचनेला सतत आठ शतकांची उज्ज्वल कुलपरंपरा होती आणि ज्या राष्ट्राचे दिग्विजयी झेंडे अटकेपार फडकल्याला अद्याप पुरतें अर्धशतकही लोटलेलें नव्हतें, ती भाषा आणि तें राष्ट्र, केवळ त्यांची स्वतंत्रता नष्ट झाली एवढ्याच एका कारणामुळें, कांहीं असंस्कृत आणि असमंजस दशेला पोंचलें, असें होत नाहीं. अंशतः राष्ट्रहिताची चाड न बाळगल्यामुळें व अंशतः जगाच्या भौतिक प्रगतीकडे दुर्लक्ष केल्यामुळें, महाराष्ट्रावर स्वातंत्र्यनाशाचा प्रसंग ओढवला. बुद्धीचा आणि कर्तृत्वाचा ऱ्हास किंवा नाश हा या राजकीय आपत्तीच्या मुळाशीं होता, असें म्हणतां येणार नाहीं. कारण, स्वराज्य नाहींसें होऊन पुरीं पंचवीस वर्षें उलटलीं नाहींत, तोंच बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुबुवा ब्रह्मचारी, सार्वजनिक काका, मंडलिक, भांडारकर, रानडे यांच्यासारखे विद्वान्, मुत्सद्दी किंवा कर्तबगार पुरुष एकामागून एक उदयाला आले; व रात्र होऊन गडद अंधार पडल्यानंतरही आकाशांत तळपणाऱ्या तेजोगोलांनीं ग्रहमालेच्या अस्तित्वाची जाणीव लोकांच्या हृदयांत जागृत ठेवावी, त्याप्रमाणें या थोर व्यक्तींनीं, पारतंत्र्याच्या आपत्काळांतही महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची परंपरा खंडित झाली नाहीं, ही गोष्ट आपल्या कर्तृत्वानें जगाच्या प्रत्ययाला आणून दिली. ज्याच्या बुद्धीचा, कर्तृत्वाचा आणि आकांक्षांचा जोम स्वातंत्र्याचा लोप झाल्यानंतरही फार काळ दबून

राहिला नाहीं, अशा राष्ट्रापुढें पोरकट आणि परभूत वाङ्मय ठेवण्यांत पहिल्या पिढींतील लेखकांच्या हातून औचित्यभंग झाला, असें कां म्हणूं नये ? गुलामगिरीच्या गर्तेत फसलेल्या दिङ्मूढ राष्ट्राला धीर देईल आणि मार्ग दाखवील, असें त्यांच्या वाङ्मयांत कांहींही नव्हतें. लहान मुलाला मांडीवर घेऊन जशीं अआचीं गाणीं शिकवावीं आणि काऊचिऊच्या गोष्टी सांगाव्या, तसें या लेखकांनीं केलें. लोकहितवादींसारख्या ज्या एकाद दुसऱ्या लेखकानें समाजाचें विनयन करण्यासाठीं म्हणून हातांत लेखणी धरिली, त्याच्या त्या लेखणींतून समाजाच्या तेजोवधाला कारण होईल असें कालकूटच बव्हंशीं बाहेर पडलें. या साऱ्या प्रकाराला आत्मविश्वासाच्या अभावाशिवाय दुसरें कोणतें कारण सांगतां येईल ? बाळशास्त्री जांभेकर आणि रावसाहेब मंडलिक यांच्यासारख्या इंग्रजींतून नवीन शोधांनीं भरलेले निबंध लिहिणाऱ्या ग्रंथकारांनीं, स्वदेशाचा इतिहास व तोही स्वभाषेंतून लिहितांना मात्र, इंग्रज ग्रंथकारांच्या ओंजळीनें पाणी प्यावें, याचा तरी दुसरा काय अर्थ करणार ? फार कशाला, मराठी वाङ्मयाला ऊर्जित काळ यावयाला अनेक शतकें लोटावीं लागतील, असें भाकित जेव्हां न्या. रानडे यांनीं आपल्या समालोचनाच्या शेवटीं वर्तविलें, तेव्हां त्यांनाही बहुधा, त्या वाङ्मयाला अनेक शतकांची वैभवशाली कुलपरंपरा आहे, या गोष्टीचा विसर पडला असावा !

या काळांत मराठी भाषेची भरीव सेवा जर कोणी केली असेल, तर ती संस्कृत आणि इंग्रजी या दोनीही भाषांतील वाङ्मयाचें परिशीलन केलेल्या शास्त्रीमंडळीनेंच होय. बाळशास्त्री जांभेकर, जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके, लक्ष्मणशास्त्री हळवे, महादेवशास्त्री कोल्हटकर, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, कृष्णशास्त्री भाटवडेकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गणेशशास्त्री लेले, विष्णुशास्त्री पंडित, कृष्णशास्त्री राजवाडे, कृष्णशास्त्री गोडबोले प्रभृति शास्त्रीमंडळीनें कोश,

व्याकरण, नियतकालिकें, काव्यें, कादंबऱ्या इत्यादि निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ निर्माण करून अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा पाया घातला. यांपैकीं बहुतेक शास्त्री पुण्याच्या संस्कृत पाठशाळेंत तयार झालेले होते. स. १८३७ सालीं या पाठशाळेच्या अभ्यासक्रमांत, षट्शास्त्रांपैकीं कांहीं शास्त्रांचा संक्षेप होऊन, इंग्रजी भाषेचा प्रवेश झाला; व पुढें १८५१ सालीं तिचें रूपांतर पूना कॉलेजांत झालें. या मधल्या चौदा वर्षांच्या काळांत कोल्हटकर, चिपळूणकर, तळेकर, लेले, पंडित प्रभृति जे अनेक शास्त्री, संस्कृत आणि इंग्रजी या दोन्ही विद्यांचा संस्कार होऊन, या पाठशाळेंतून बाहेर पडले, त्यांनीं आपल्या प्रौढ आणि सरस गद्य पद्य ग्रंथांनीं मराठी भाषा समृद्ध केली. त्यांच्या बरोबरीनें ज्यांच्या वाङ्मयसेवेचा उल्लेख करितां येईल, असे दादोबा पांडुरंग हे एकच ग्रंथकार आंग्लविद्याविभूषितांत होऊन गेलेले दिसतात. महाराष्ट्र भाषेचें व्याकरण, यशोदापांडुरंगी, पारमहंसिक ब्राह्मधर्म, आत्मचरित्र इत्यादि त्यांच्या ग्रंथांची भाषा सुश्लिष्ट आणि रसाळ असून, ते वाचतांना त्यांच्या स्वतंत्र आणि मार्मिक बुद्धीची साक्ष जागोजाग पटते. किंबहुना, चिपळूणकरांच्या पूर्वीं मराठी भाषेचा नितांत अभिमानी आणि तिच्या वाङ्मयाचा मर्मज्ञ असा स्वतंत्र प्रज्ञेचा ग्रंथकार जर महाराष्ट्रांत कोणी झाला असेल, तर ते दादोबा पांडुरंग हेच होत. खुद्द चिपळूणकरांनींही दादोबांच्या प्रौढ भाषापद्धतीची आणि विवेचनकौशल्याची प्रशंसा निबंध-मालेंत केली असून, त्यांच्या यशोदापांडुरंगीमुळेंच मयूर कवीचा अपूर्व टाहो आपल्या कानीं पडल्याचा व ती टीका आपल्याला अत्यंत प्रिय असल्याचाही उल्लेख त्यांनीं कृतज्ञतापूर्वक केलेला आढळतो. शास्त्रीमंडळीनें सुरू केलेलें हें ज्ञानसत्र पुढें चालू ठेवण्याची जबाबदारी वस्तुतः विद्यापीठांतून बाहेर पडलेल्या पदवीधरांवर होती. पण त्या पवित्र कर्तव्याची त्यांना कधीं जाणीवही झाल्याचें दृष्टीस पडत नाहीं. स. १८५७ सालीं मुंबई विद्या-पीठाची स्थापना होऊन मराठी भाषेच्या पद्धतशीर अध्ययनाला प्रारंभ

झाला. पण ही सुधारणा मराठी वाङ्मयाच्या उत्कर्षाला पोषक झाली नाहीं. १८६२ पासून १८७० पर्यंत भांडारकर, मोडक, कुंटे, पंडित, रानडे, तेलंग प्रभृति जे १०१ स्नातक विद्यापीठांतून पद्व्या घेऊन बाहेर पडले, त्यांपैकीं पुष्कळांनीं मराठी भाषेचा अभ्यास विद्यालयांत असतांना केलेला होता. परंतु, चिपळूणकरांनीं निबंधमालेच्या पहिल्या अंकांत म्हटल्याप्रमाणें, यांपैकीं एकाही किताबवाल्यानें आपला ज्ञानौघ मराठी भाषेच्या प्रवाहांत ओतला नाहीं. नाहीं म्हणावयाला, भांडारकर, मोडक व रानडे यांचीं धर्मपर व्याख्यानें किंवा कुंटे यांचीं ‘ राजा शिवाजी ’ सारखीं काव्यें यांचा निर्देश अपवादादाखल करितां येईल. पण, प्रार्थना-समाजाच्या महर्षींचीं धार्मिक प्रवचनें एरवीं कितीही उद्बोधक असलीं, तरी त्यांच्यामुळें मराठी वाङ्मयाला कोणता अपूर्व लाभ झाला, असें म्हणतां येईल ? ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम किंवा रामदास या संत-कवींच्या अमृतोपम वाणींतून स्रवलेल्या धर्मविचारांहून आगळें किंवा उदात्त असें त्यांच्या प्रलपितांत काय आहे ? कुंटे यांचीं काव्यें हीं मराठी कवितेच्या, संक्रमणाच्या मार्गावरील, प्रगतीचें स्वरूप दाखवाव-याला खुणेचे दगड म्हणूनच यापुढें उपयोगीं पडतील.

विशेषतः, या पदवीधरांचा इंग्रजी भाषेंतून प्रकट झालेला पांडित्य-प्रकर्ष पाहिला, म्हणजे मातृभाषेविषयींची त्यांची उपेक्षाबुद्धि मनाला तीव्रतेनें जाणवल्याशिवाय रहात नाहीं. भांडारकरांचा दक्षि-णापथाचा इतिहास, कुंटे यांचा आर्य संस्कृतीचीं स्थित्यंतरें, रानडे यांचा मराठ्यांच्या सत्तेचा अभ्युदय, तेलंगांचा शंकराचार्य इत्यादि इंग्रजी ग्रंथांतील शोध आणि विचार इतके विद्वत्तापूर्ण आहेत कीं, त्यांचें वाहन होण्याचें भाग्य लाभल्याबद्दल जगांतील कोणत्याही भाषेला अभिमान वाटावा. किंबहुना, एकोणिसाव्या शतकांतील महाराष्ट्राच्या बुद्धीचें, संशोधनाचें आणि तत्त्वज्ञानाचें सारसर्वस्व या विद्वानांच्या इंग्रजी लिखाणांतून सांठविलेलें आहे, असें म्हटलें तरी शोभेल. परंतु

बिचाऱ्या मराठी भाषेला मात्र हें सारें असून नसल्यासारखें झालें आहे. धर्मांतर केलेला पुत्र कितीही कर्तृत्ववान् निपजला, तरी त्याच्या लौकिकाचा फायदा जसा त्याच्या मातेला आणि वंशाला मिळत नाहीं, तसाच या विख्यात पंडितांच्या बुद्धिवैभवापासून मराठी भाषेला आणि वाङ्मयाला कोणताही लाभ झाला नाहीं. परंतु, आपल्या मातृभाषेविषयीं त्यांना मुळींच कळकळ नव्हती, असें तरी कसें म्हणावें? कारण, मराठी भाषेचें स. १८७० सालीं मुंबई विद्यापीठांतून उच्चाटन झाल्यानंतर, निदान मोडक आणि रानडे या दोघांनीं तरी, तिचा विद्यापीठांत पुन्हा प्रवेश व्हावा, म्हणून पुष्कळच प्रयत्न केले. तेव्हां, उपदेशावें तें स्वतः आचरूं नये, हा जसा त्यांच्या इतर कांहीं बाबतींतील वर्तनाचा प्रकार, तसाच तो याही बाबतींत झाला, एवढेंच फार तर म्हणतां येईल. तथापि, ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं, स. १८६२ नंतर जी स्नातकमंडळी विद्यापीठांतून बाहेर पडली, त्यांच्यामधून दादोबा पांडुरंग किंवा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या तोडीचा एकही लेखक पुढें आला नाहीं. म्हणूनच, चिपळूणकरांनीं निबंधमालेच्या पहिल्या अंकांत उद्वेगानें असें विचारलें आहे कीं, युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत आठ दहा वर्षें राहिल्यामुळें तरी मराठी भाषेचें कोणतें मोठें हित झालें? उलट, जुन्या नव्या पद्धतीनें पढलेल्या शास्त्रीमंडळीनें, अव्वल इंग्रजी अमदानींत, ज्या भाषेची निष्ठेनें जोपासना केली, तिची या पदवीधरांनीं हेळसांड आरंभिल्यामुळें, तिला खिस्ती मिशनरींशिवाय दुसरा वाली आणि शाळाखात्याशिवाय कुठें थारा उरला नाहीं. या तिच्या दैन्याचें हृदयस्पर्शी शब्दचित्र ‘मराठी भाषेची सांप्रतची स्थिति’ या मालेंतील पहिल्या लेखांत चिपळूणकरांनीं रेखाटलें आहे. सुशिक्षितांची स्वभाषेविषयींची अनास्था वर्णन करितांना ते म्हणतात, “दहा वीस वर्षांमागें शिकलेल्या लोकांस मराठींत ग्रंथ लिहिण्याची बरीच हौस वाटत असे. पण आतां ती भाषा कोणास डोळ्यांसमोरही नको.” केवळ चिपळूण-

करांनींच अशा तऱ्हेचे उद्गार काढलेले आहेत, असें नाहीं. दादोबा पांडुरंग यांच्या आत्मचरित्रांतही या निराशेचें प्रतिबिंब स्पष्ट उमटलेलें आढळतें. नवीन सुशिक्षितांच्या या प्रवृत्तीचें एक मासलेवाईक उदाहरण द्यावयाचें झालें, तर तें न्या. रानडे यांचे सहाध्यायी व पहिले मराठी नाटककार विनायक जनार्दन कीर्तने यांचें देतां येईल. त्यांनीं वयाच्या विसाव्या वर्षी, थोरले माधवराव पेशवे यांच्या चरित्रावर, सरस छोटे-खानी नाटक लिहून महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर प्रभृति तत्कालीन रसिकांकडून वाहवा मिळविली. पण, त्यानंतर पांच वर्षांच्या आंतच मराठी भाषेविषयीं त्यांच्या मनांत इतकी अरुचि उत्पन्न झाली कीं, त्यांनीं पुढें सहसा मराठी पुस्तक हातीं धरिलें नाहीं ! या मतांतराला तरी आत्मविश्वासाच्या अभावाशिवाय दुसरें काय कारण दाखवितां येईल ?

चिपळूणकरांनीं या उपेक्षाबुद्धीचें उन्मूलन केलें. निबंधमाला निघण्या-पूर्वी ज्या भाषेंत रूपांतरित प्रबंधांची निपज होत होती आणि जी भाषा उच्च कल्पनांचा आविष्कार करावयाला समर्थ नाहीं, असा तत्का-लीन सुशिक्षितांचा समज होता, त्या अवनत आणि अपमानित भाषेला चिपळूणकरांच्या दिव्य प्रतिभेनें जगांतील थोर भाषांच्या प्रणालिकेंत नेऊन बसविलें. निबंधमालेचा जन्म झाल्याबरोबर मराठी भाषेचें पारतंत्र्य नष्ट झालें आणि मराठी वाङ्मयांतील भाषांतराचें युग संपून स्वतंत्र लेखनाच्या युगाला प्रारंभ झाला. भाषेचें पारतंत्र्य हें राष्ट्राच्या बौद्धिक दास्याचें द्योतक असतें. जेत्यांचा वीर्योत्कर्ष पाहून दिपलेली व दीन झालेली जित राष्ट्राची प्रतिभा परावलंबी बनते. ज्याची प्रतिभा दास झाली, तें राष्ट्र अभिमानाची आणि पराक्रमाची भाषा बोलूं शकत नाहीं. पराक्रम हें अभिमानाचें व्यक्त आणि विकसित स्वरूप आहे. कळीला जसें फूल, फुलाला जसा सुवास, तसा अभिमानाला पराक्रम व पराक्र-माला यश होय. अभिमान आणि पराक्रम हे स्वतंत्र आणि तेजस्वी

प्रतिभेचे गुण आहेत. प्रतिभा परतंत्र झाली कीं वाङ्मय परभृत होतें व वाङ्मय परभृत झालें कीं राष्ट्राला पुनरुदयाची आशा उरत नाहीं. स. १८१८ सालीं शांतता स्थापन झाल्यानंतर पुढच्या अर्धशतकांत इंग्रजांचें जें भौतिक आणि बौद्धिक वैभव प्रकट झालें, तें पाहून महाराष्ट्राची दृष्टि दिपली; व वर्षर्तूतील तुफान सिंधूच्या तडाख्यांना दाद न देणाऱ्या सह्याद्रीच्या कठोर शैलराजीप्रमाणें कणखर असलेल्या त्याच्या बुद्धीचा धर सुटला. स्वतःच्या प्रतिभेचा आणि पौरुषाचा त्याला विश्वास वाटेनासा होऊन त्यामुळें त्याची बावरलेली बुद्धि अनुकरणाची दुबळी भाषा बोलूं लागली. या स्थितींत चिपळूणकरांनीं महाराष्ट्राला धीर दिला. स्वाभिमानाचे स्वतंत्र विचार चिपळूणकरांपूर्वी इतरांच्याही ओठाशीं येऊन ठेपले असतील, नाहीं असें नाहीं. पण, त्यांनीं ते बोलून दाखविण्याचा हिय्या केला नाहीं व चिपळूणकरांनीं केला, इतकाच काय तो फरक. परंतु असल्या साध्या दिसणाऱ्या फरकांना राष्ट्राच्या इतिहासांत फार महत्त्व आहे. कारण त्यामुळें विचारांचा ओघ बदलून इतिहासांत युगांतर घडून येत असतें. भूमीच्या उदरांत अनंत झिरपे पाझरत असतात; व त्यांपैकीं कांहीं बाहेर उमळून आपल्या झुळझुळणाऱ्या पाण्यानें वाटसराची तृषाही भागवितात, हें खरें. पण, नदीचें विशाल आणि वंदनीय स्वरूप त्याच झऱ्याला प्राप्त होतें कीं, जो आपल्या प्रबळ जलौघानें भोंवतालचा सारा प्रदेश समृद्ध करून सोडतो. चिपळूणकरांच्या पूर्वीं होऊन गेलेल्या एकाद दुसऱ्या लेखकानें त्यांच्यासारखे विचार कदाचित् प्रकट केले असतीलही. पण, त्या लेखकांच्या वाणींत तितकें तेज नसल्यामुळेंच बहुधा आज त्यांचें लिखाण लोपून गेलें असून, उलट निबंधमाला मात्र, पन्नास वर्षें लोटून गेलीं तरीही, राष्ट्रीय स्फूर्तीचें निधान होऊन बसली आहे. चिपळूणकरांच्या कर्तृत्वामुळें मराठी भाषा स्वतंत्र आणि महाराष्ट्र स्वाभिमानी झाला. मराठी भाषेच्या सर्व सुप्त शक्ति निबंधमालेंत प्रादुर्भूत झाल्या; व आपल्या प्रतापशाली

आप मागें पडतें. चिपळूणकरांचे भाषाविषयक लेख अभिरुचिवर्धनाच्या दृष्टीनें लिहिलेले आहेत. त्यांत अवश्य तितकें शास्त्रीय विवेचन आलेलें असूनही त्यांतील विनोदामुळें ते कंटाळवाणे वाटत नाहींत. शिवाय, त्यांत प्रसंगोपात्त सुंदर उतारे दिलेले असल्यामुळेंही, त्यांच्या रंजकतेंत भर पडली आहे. रुक्ष शब्दांत केलेलें निव्वळ शास्त्रीय विवेचन भर दुपारच्या उन्हासारखें तापदायक होतें. परंतु, चिपळूणकरांच्या चित्तवेधक लेखनशैलीमुळें, या निबंधांतील विवेचन, उपवनांतील वृक्षलतांच्या हलत्या पानांतून पडणाऱ्या जाळीदार उन्हासारखें, सुखकर झालें आहे. या लेखांप्रमाणेंच 'विद्वत्त्व आणि कवित्व,' 'वाचन' व 'ग्रंथांवर टीका' हे लेखही अभिरुचिवर्धनाच्या हेतूनें लिहिलेले आहेत. कवित्वाला विद्वत्त्व अननुकूल आहे, हें मत चिपळूणकरांनीं मेकॉलेपासून उचललें. त्याचें मार्मिक मंडन या लेखांत केलें आहे. तें मनोरंजक असलें, तरी प्रत्ययोत्पादक नाहीं. विद्वत्तेनें विचारशक्ति वाढते; व त्या दृष्टीनें पाहिलें, तर विद्वत्त्व हें कवित्वाला फारसें पोषक नाहीं, असेंच म्हणावें लागेल. पण, त्याबरोबरच ही गोष्टही कबूल केली पाहिजे कीं, बेतशीर ऊन्ह मिळालें असतां अंकुर जसा जोम धरितो, तसाच विद्वत्तेचा योग्य प्रमाणांत झालेला संस्कार कवितेला उपकारक होतो. विद्वान् कवींची कविता बहुधा कृत्रिम असते, हें अनुभवसिद्ध सत्य आहे. तुकाराम व मोरोपंत हे दोन्ही कवि विद्वान् खरे. तथापि, तुकोबांच्या व पंतांच्या विद्वत्तेंत आणि विद्यार्जनबुद्धींत पुष्कळच फरक होता, हें लक्षांत घेतलें पाहिजे. संतांच्या वचनांचें वाचन आणि मनन घडावें या भावनेनें तुकोबांनीं ग्रंथपरिशीलन केलें; त्याच्या मुळाशीं विद्यार्जनाचा व्यावहारिक हेतु असेल, असें वाटत नाहीं. उलट पंतांनीं विद्यार्जनाच्या बुद्धीनें आणि रसिकतेनें अध्ययन केलें. देवार्चनाकरितां फुलें वेंचून माळ करणें निराळें व सुवासाच्या लोभानें, स्वतःचें शरीर शृंगारण्यासाठीं अगर विक्रीक-

रितां फुलांचे हार गुंफणें निराळें. तुकाराम व मोरोपंत यांच्या अध्ययनबुद्धींतील हा फरक त्यांच्या काव्यांतही व्यक्त झालेला आहे. पंतांनीं आपल्या विद्वत्तेचा कविता सजविण्याच्या कामीं अतोनात उपयोग केला. उलट इतकें वाचन झालें असूनही तुकोबांचें बोलणें उत्कट व साधें राहिलें. हा अनुभव लक्षांत घेऊनच बहुधा चिपळूणकरांनीं या लेखांतील विवेचन केलें आहे. त्यांच्या काव्यविषयक कल्पना किती व्यापक होत्या, याचीही उत्तम साक्ष हा लेख देतो. स. १८१८ पासून १८७० पर्यंत जें उत्कृष्ट रूपांतरित वाङ्मय तयार झालें, त्यांतील सुंदर उतारे या व 'भाषापद्धति' या लेखांत दिलेले आहेत. आपल्यापूर्वीं ज्यांनीं रूपांतरें वगैरे करून त्या अनास्थेच्या काळांत परिश्रमपूर्वक गद्य वाङ्मयाची भूमिका सिद्ध केली, त्या लेखकांविषयीं चिपळूणकरांना किती आदर वाटत असे, याची या उताऱ्यांवरून स्पष्ट कल्पना येते. केवळ अरसिकतेमुळें मागें पडत चाललेल्या वाङ्मयाविषयीं अभिरुचि उत्पन्न करण्याच्या उद्देशानेंही कदाचित् त्यांनीं हे उतारे दिले असतील.

'ग्रंथांवर टीका' हा चिपळूणकरांचा एक उत्तम निबंध आहे. विख्यात इंग्रजी कवि पोप याच्या 'Essay On Criticism' या काव्याचा उपयोग त्यांना हा लेख लिहितांना बराच झाला असावा. या लेखांत आधुनिक पद्धतीनें 'टीका' या विषयाची फार चांगली चर्चा केली आहे. चिपळूणकरांना या विषयावर लिहिण्याचा पूर्ण अधिकार होता. संस्कृत कवींचे रसिक टीकाकार म्हणून त्यांना महाराष्ट्रशारदामंदिरांत यापूर्वींच उच्च पद लाधलेलें होतें. सामान्य टीकाकारांत जी सर्वथैव दोषदर्शनाची दुष्ट लालसा दिसून येते, ती त्यांच्या ठिकाणीं नव्हती. अशा श्रेष्ठ टीकाकारानें आपले उदार विचार या लेखांत ग्रथित केलेले आहेत. वाणीच्या साधुत्वाविषयीं लोक दुर्जन असतात, असें भवभूतीनें म्हटलें आहे. त्याचाच प्रायः अनुवाद करून चिपळूणकर

म्हणतात, "एकंदर लोकांची स्तुतीपेक्षां निंदेकडे फारच विशेष प्रवृत्ति असते. कोणीं अमळ वर डोकें काढलें न काढलें, कोणाची अमळ कोठें प्रशंसा झाली न झाली, कीं लोकांस तें साहेनासें होऊन लागलीच चोहोंकडे त्याचे निंदक उभे राहतात. यावरून स्पष्टच आहे कीं, टीकेचें सामान्य स्वरूप म्हटलें म्हणजे मूळ ग्रंथाचें दूषण किंवा खंडण हेंच होय. दुसऱ्याची स्तुति करण्याकरितां कोणी एखाद्या ग्रंथावर विवेचन केलें आहे असें बहुधा कांहीं आपमतलब असल्याविना झालेलें सांपडणार नाहीं." चिपळूणकरांनीं हा लेख लिहिल्याला आतां अर्धशतक होत आलें. पण टीकेची ही सामान्य पद्धतीच महाराष्ट्रांत अजूनही प्रचलित आहे. कमलाच्या तळाशीं असलेल्या चिखलांत रमणाऱ्या बेडकाप्रमाणें आजही बहुतेक टीकाकार निव्वळ दोषदर्शनांतच आनंद मानतात. कोणत्याही ग्रंथाचा सर्व बाजूंनीं विचार करून शास्त्रीय, सांगोपांग आणि सोपपत्तिक टीका केलेली मराठींत क्वचितच दृष्टीस पडते. टीकाविषयक ग्रंथांतील सर्व मतें कशीं तरी खोडून काढलीं कीं, टीकाकार कृतकृत्य झाला! उघडच आहे, ग्रंथकार मूर्ख ठरल्याशिवाय टीकाकाराला मार्मिक कोण म्हणेल? ग्रंथकाराचें मर्मच्छेदन म्हणजेच टीकाकाराची मार्मिकता असा प्रकार आज महाराष्ट्रांत आढळून येतो. मराठी वाङ्मयाच्या रंगणांत नवीन विचारांचा, नवीन कल्पनांचा आणि नवीन मतांचा वावर हे चाबुकस्वार सहसा होऊं देत नाहींत. टीकेंत दोषदर्शन नसावें असें कोण म्हणेल? परंतु स्वतःच्या मनाला न फसवितां किती टीकाकारांना आज—

> A lash like mine no honest man shall dread,
> But all such babbling blockheads in his stead

अशी ग्वाही देतां येईल? 'अहृदय' टीकाकार हें शारदेच्या हृदयांतलें एक शल्यच आहे; व 'प्रेमळांची प्रेमळ स्थिति' असे जे कवि ते शारदेचें केवळ हृदयच असल्यामुळें त्यांना तर तें फारच दुःख देतें.

विध्वंसक टीका कोणींही करावी; व म्हणूनच दोषदर्शनाचा व्यवसाय करून सामान्य लेखकही वाग्व्यवहारांत तात्पुरती प्रतिष्ठा मिळवितात. स्वतःच्या भाऊबंदांचे खून पाडून तख्त बळकावणाऱ्या मोगल बादशहांप्रमाणें समकालीन व्यवसायबंधूंचा निःपात करून वाङ्मयप्रदेशावर स्वामित्व गाजविण्याकरितां या अरेरावांचा हा उपद्व्याप असतो. स्वतंत्र आणि संपन्न राष्ट्रांत या चाबुकस्वारांची कोणीच पर्वा करीत नाहीं. पण, ज्या भाषेला राजाश्रय किंवा लोकाश्रय नसतो, त्या भाषेचे हे 'दुर्जन' केवळ हितशत्रु होत. म्हणूनच चिपळूणकरांनीं दोषदृष्टि टीकाकारांचा निषेध केला आहे.

'संपत्तीचा उपभोग' व 'लोकभ्रम' हे मालेंतील लेख चिपळूणकरांच्या सामाजिक मतांचे निदर्शक आहेत. समाजसुधारणेचे प्रतिस्पर्धी म्हणून त्यांचा लौकिक आहे. परंतु त्यांत फारसें तथ्य नाहीं. खाजगी रीतीनें जरी ते समाजसुधारणेविषयीं अनुकूल बोलत असत, तरी या आपल्या मतांचें जाहीर प्रतिपादन करून लोकविरुद्ध आचरण करणें त्यांना संमत नव्हतें,—थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ते समाजभीरु होते, असाही एक प्रवाद आहे. तोही सत्याला धरून नाहीं. चिपळूणकर सुधारक होते; व त्यांना जें सत्य आणि इष्ट वाटलें, तें स्पष्ट सांगावयाला ते कधींही कचरले नाहींत. लोकप्रियतेचा लोभ कदाचित् त्यांच्या मनांत कधींकाळीं उद्भवला असेल. तथापि त्या लोभाला बळी पडून त्यांनीं सत्याचा अपलाप मात्र कधींच केला नाहीं. ब्राह्मसमाज, आर्यसमाज, प्रार्थनासमाज या व इतर कांहीं चळवळींवर त्यांनीं विध्वंसक टीका केली आहे, हें खरें. परंतु तेवढ्याच कारणावरून त्यांना सुधारणेचे विरोधक म्हणणें चुकीचें ठरेल. सामाजिक सुधारणा ही आर्यसमाज किंवा प्रार्थनासमाज यांच्या उपासनामंदिरांतच नांदत आहे असें समजणें, हें काशीच्या अगर पंढरीच्या देवळांतूनच देव बसला आहे, असें मानण्याइतकेंच अयुक्तिक होईल. सुधारणेचा व्याप सर्व

जगभर पसरलेला आहे. प्रगतिप्रवण मानवी प्रतिभेची दृष्ट-ज्ञातांच्या सीमा उल्लंघून पूर्णतेचें ध्येय गांठण्याकरितां जी धडपड सदैव चाललेली असते, तिलाच लौकिक भाषेंत सुधारणा असें म्हणतात. अर्थातच प्रतिभे-प्रमाणें सुधारणेची गतिही अकुंठित आणि अमर्याद आहे. सुधारणा या शब्दाचा हा व्यापक अर्थ लक्षांत घेऊन नंतरच कोणत्याही व्यक्तीचीं मतें किती प्रगमनशील आहेत, हें पाहिलें पाहिजे. या दृष्टीनें विचार केला, तर चिपळूणकर हे पहिल्या प्रतीचे सुधारक होते, असेंच म्हणावें लागेल. राजकारण आणि सामाजिक सुधारणा यांची महाराष्ट्रांत फार-कत झालेली आहे; व तिला चिपळूणकरांचे निबंध कारण झाले, असें मानण्यांत येतें. पण हें बरोबर नाहीं. कोणत्याही विचारसरणींत किंवा चळवळींत स्वतःला जें रुचण्यासारखें असेल, तेवढेंच फक्त उचलून त्याचें अनुकरण करण्याकडे बहुजनसमाजाची प्रवृत्ति असते; व त्यामुळें आरशांत पडणारें प्रतिबिंब जसें विपरीत दिसतें, तसेंच बहुजनसमाजानें अंगीकारिलेल्या कोणत्याही विचारसरणीला किंवा चळवळीला बहुधा विकृत स्वरूप येतें. चिपळूणकरांच्या नवीन विचारांची आज अशीच दुर्दशा झाली आहे. त्यांचे विचार बहुतेक सर्वच बाबतींत प्रगम-नशील होते. सामाजिक आणि राजकीय सुधारणांचा पुरस्कार करणाऱ्या व्यक्तींच्या मतांत जी विसंगति आज आढळून येते, तिला चिपळूण-करांच्या विचारसरणींत स्थान नव्हतें. त्यांचीं वाङ्मयविषयक मतें किती व्यापक आणि उदार होतीं, हें आतां निराळें सांगावयाला नको. महाराष्ट्राच्या तेजस्वी राजकीय विचारांचा उगम निबंधमालेंतून झाला, हें प्रसिद्धच आहे. त्यांचीं सामाजिक मतें राजकीय मतांइतकींच प्रखर होतीं; व लोकांच्या वेडगळ समजुतींवर त्यांनीं ‘ संपत्तीचा उपभोग ’ आणि ‘ लोकभ्रम ’ या लेखांतून कोरडेही उडविलेले आहेत. जाति-भेदाविषयीं त्यांचें मत अनुकूल नव्हतें. आपल्या समाजांत देशाभिमान कां नाहीं, याची मीमांसा करितांना ते म्हणतात—

"आमच्या देशांत जन्मभूमीचा अभिमान शिथिल होण्यास या राष्ट्राचें विस्तीर्णत्व व जातिभेद हीं दोन मोठीं कारणें झालीं आहेत. + + + दुसरा प्रकार जातिभेदाचा. यानें तर या राष्ट्राची फूट अतिशयच पाडली आहे. अठरापगड जातींस अठरा टोपकरांनीं गुंडाळून टाकलें, व साऱ्यांच्या हातीं सारखीच करवंटी दिली; पण लोकांचे डोळे अजून उघडत नाहींत.

"याशिवाय सांप्रत हास्यास्पद होऊन राहिलेला जो जातिभेद, त्याच्यासंबंधाचा वेडगळपणाचा पीळही कमी कमी होत जाऊन, या देशांतील सगळ्या जाति देशबंधुत्वाच्या थोरल्या नात्यांत अंतर्भूत होऊन, बारीकसारीक क्षुद्र भेदांची मातब्बरी लोक तादृश धरणार नाहींत, व एकोप्यापासून सर्वांचें किती हित आहे, हें दिवसेंदिवस अधिकाधिक समजूं लागतील, अशीही दृढतर आशा आहे."

आपल्या मृत्यूपूर्वी तीनच दिवस अगोदर चिपळूणकरांनीं हा लेख 'केसरीं'तून प्रसिद्ध केला. जातिभेदाचें समूळ उच्चाटन व्हावें अशा मताचे ते होते कीं नाहीं, हें जरी या लेखावरून अचूक ठरविणें कठीण असलें, तरी त्याविषयीं त्यांचें मत प्रतिकूल होतें, इतकें मात्र खचित म्हणतां येईल. शिवाय, ही गोष्टही त्यावरून सिद्ध होते कीं, शेवटपर्यंत त्यांनीं आपलीं खरीं मतें लोकांना स्पष्ट शब्दांत सांगितलीं.

परंतु, अशा तऱ्हेचीं उदार मतें असतांनाही, चिपळूणकरांनीं सुधारणेकरितां चाललेल्या बहुतेक प्रयत्नांचा मालेंतून आधिक्षेप केलेला आढळतो. नवीन विद्येचे सर्व संस्कार स्वतःला झालेले असूनही ज्याप्रमाणें ते सुशिक्षितांचा उपहास करीत, त्याचप्रमाणें स्वतःचीं सर्व मतें सुधारलेलीं असूनही त्यांना सुधारकांचा द्वेष असे. या त्यांच्या द्वेषाला सुशिक्षितांचें आणि सुधारकांचें स्वाभिमानशून्य वर्तनच सर्वस्वीं कारण झालें. आर्यसमाज आणि प्रार्थनासमाज यांची एकंदर समाजापासून फुटून निघण्याची प्रवृत्ति त्यांना मान्य नव्हती. या त्यांच्या मतांत बरेंच तथ्य होतें. हिंदु समाजांतील ही

फूट ख्रिस्ती मिशनरींना त्या वेळीं तरी पुष्कळच उपकारक झाली. ' हिंदु सुशिक्षितांना स्वधर्मांत अर्थ वाटत नाहीं,—धर्मांतर केल्यानें लोक बहिष्कार घालतील याच भयानें केवळ ते ख्रिस्ती धर्मांत न शिरतां सवता सुभा थाटून राहिले आहेत, '—असा पुकारा करावयाला तें एक त्यांना साधन झालें. ही फूट हिंदु समाजाच्याही बुद्धिभेदाला फार कारणीभूत झाली. आपले कोण व परके कोण हें ओळखण्याला मार्ग राहिला नाहीं. कारण मिशनरी व सुधारक हे दोघेही थोड्याबहुत प्रमाणांत हिंदु धर्माची निंदाच करीत. सुधारकांचा बहुतेक वाग्व्यवसाय इंग्रजींतूनच होत असल्यामुळें या गैरसमजांत भर पडली. त्यांतही, सुधारक सवता सुभा न थाटतां, हिंदु समाजांत विचारक्रांति घडावी, म्हणून त्या समाजांत राहूनच जर चळवळ करिते, तर हा लोकभ्रम वाढला नसता. परंतु, आर्यसमाज आणि प्रार्थनासमाज हे स्थापन झाल्यामुळें बहुजनसमाजाला आपला आणि या सुशिक्षितांचा संबंध अजिबात तुटला, असें वाटलें. त्या वेळची सर्व परिस्थिति लक्षांत घेतली असतां ही त्यांची समजूत गैर होती, असें म्हणवत नाहीं. आर्यसमाज आणि प्रार्थनासमाज यांनीं हिंदु समाजाची फार सेवा केली आहे, हें खरें. तथापि, हीच सेवा जर ते त्या समाजांत राहून करते, तर तें अधिक श्रेयस्कर झालें नसतें काय ? आपल्या समाजापासून आणि धर्मापासून फुटून पडणाऱ्या या सुधारकांविषयीं चिपळूणकरांना विलक्षण तिटकारा होता. तत्कालीन बहुजनसमाजाप्रमाणें तेही या सुधारकांत आणि मिशनरींत भेद समजत नसत; व त्यामुळें सुधारकांचाही मिशनरींबरोबर त्यांनीं अमर्याद उपहास केला आहे. शिवाय लोकांच्या सरसकट सर्वच धार्मिक समजुतींवर तुटून पडणें त्यांना संमत नव्हतें. समाज हा सर्वथैव सुबुद्ध आणि सुविद्य लोकांचाच बनलेला नसतो. त्यांत अनंत प्रकारचे लोक असतात. आणि, आकाशांतून पडलेलें पावसाचें पाणी जरी कितीही स्वच्छ असलें, तरी तें ज्याप्रमाणें जमिनीवर पसरतांच अशुद्ध होतें,

त्याचप्रमाणें कोणताही धर्म किंवा व्यवहार प्रथम कितीही उज्ज्वल व निर्मल असला, तरी लोकरूढ झाल्यावर अखेर त्याला शबल स्वरूप आल्याविना रहात नाहीं. कारण, भिन्न पार्थिव द्रव्यांच्या संकरानें पाणी जसें गढूळ होतें, तसा भिन्न लौकिक समजुतींच्या संसर्गानें धर्म किंवा व्यवहार मलिन होतो. जगांत जोंवर मतिमांद्य आणि अज्ञान यांचा वावर चालू आहे, तोंवर ही स्थिति निस्संशय अशीच राहणार. म्हणून, समाजाच्या ज्या धर्मसमजुती निरुपद्रवी आहेत, त्या जरी थोड्या विचित्र असल्या, तरी त्यांच्याकडे सदय बुद्धीनें काणा डोळा करावयाला हरकत नाहीं, असें चिपळूणकरांना वाटत असे. त्याचप्रमाणें, निरंतर दोषाविष्करणच करीत राहिल्यास समाजाला आपल्या वास्तविक गुणांविषयींही शंका उत्पन्न होईल, असेंही भय त्यांना वाटत असावें. शिवाय, सुधारक आणि मिशनरी डोळयांत तेल घालून दोषदर्शनाचें काम सारखें करीतच असल्यामुळें, आपण तेंच पुन्हा निराळें करण्याची जरूरी नाहीं, अशीही त्यांची समजूत झाली असावी. ज्या हतप्रभ आणि हताश राष्ट्राचें तेजोवर्धन करण्याकरितां त्यांचे सर्व प्रयत्न चालले होते, त्याचा तेजोभंग, सामाजिक वैगुण्यां-पुरताच कां होईना, करण्याचें जर त्यांच्या जिवावर आलें असलें, तर त्यांत काय नवल ? सुधारकांची कृतिशून्यता आणि स्वार्थपरता पाहूनही सुधारणेच्या चळवळीविषयीं त्यांचें मन साशंक झालें होतें. या कारणांमुळें निबंधमालेंत समाजाचें दोषाविष्करण केलेलें फारसें आढळत नाहीं व मतविसंगतिही क्वचित् दिसून येते.

तथापि, चिपळूणकर सुधारणेचे द्वेष्टे मात्र बिलकूल नव्हते, किंवा लोकांच्या भीतीनें त्यांनीं आपलीं मतेंही कधीं मुरगळलीं नाहींत. ते आपल्या समाजाचा आणि धर्माचा राग किंवा त्याग करणाऱ्या सुधारकांचे मात्र द्वेष्टे होते. आपल्या समाजाच्या दुर्गुणांची आपल्या देशबांधवांनीं लागेल तितकी निंदा करावी, परक्यांनीं मात्र आपल्या समाजाला यत्किंचितही

वाईट म्हणतां कामा नये, व तसें घडल्यास सर्वांनीं एक होऊन त्याचा प्रतिकार केला पाहिजे, अशी त्यांची भावना होती. राष्ट्रीय मानापमानाच्या ज्या सूक्ष्म कल्पना आजच्या सुधारलेल्या जगांत आढळतात व अनुभवाला येतात, त्यांना चिपळूणकरांचें हें मत पूर्णपणें धरून आहे. आणि, खरोखरीच जें राष्ट्र मानधन असेल, तें कितीही अवनतावस्थेला पोचलें, तरी त्याला परकीयांनीं केलेला उपमर्द कदापि सहन होणार नाहीं. तसा तो झाला, तर तें राष्ट्र मेलें, असें खुशाल समजावें. चिपळूणकरांच्या राष्ट्रीय मानापमानाच्या भावना अशा तऱ्हेच्या होत्या. त्यामुळें, 'सत्यदीपिके'वर टीका करितांना, सारस्वत, प्रभू वगैरे जातींविषयीं तुच्छतेचा भास उत्पन्न करण्यासारखी भाषा त्यांनीं लिहिण्याच्या भरांत सहजगत्या वापरली असतां, तिचा निषेध करणारें पत्र जेव्हां त्यांना एका 'कोंकण्या' कडून आलें, तेव्हां त्यांतील आवेशाचा आविर्भाव पाहून त्यांना खेद न होतां, उलट आनंदच वाटला; व त्या पत्राला उत्तर देतांना डिंवचल्यावरोबर उफाळणाऱ्या त्याच्या तल्लख स्वाभिमानबुद्धीची त्यांनीं तारीफही केली. या उत्तरांत त्यांनीं स्वतःविषयीं असा खुलासा केला आहे कीं, "...आमचा पुस्तककर्त्यांच्या नात्यानें जगाशीं जो शत्रुमित्रत्वसंबंध आहे, तो केवळ सत्य व स्वदेशप्रीति या दोहोंच्या संबंधानेंच काय तो आहे. म्हणजे आपल्या जन्मभूमीचा योग्य अभिमान असून ज्यांस सत्य आवडतें, ते आमचे मित्र; व स्वदेशाची टवाळी करण्यांत ज्यांस भूषण वाटतें व जे असत्यास जाणून बुजून भजतात किंवा त्याच्या निरसनाविषयीं अनास्था प्रकट करतात, ते आमचे द्वेष्टे. याखेरीज इतर संबंध आम्ही कोणतेही ओळखीत नाहीं." या उद्गारांवरून त्यांची भूमिका स्पष्ट होते. त्यांना सत्य प्रिय होतें, पण स्वदेश त्याहींपेक्षां प्रियतर होता; व सुधारणा इष्ट होती, पण स्वधर्म तिच्याहीपेक्षां इष्टतर होता. त्यांची देशाभिमानाची भावना अत्यंत हळुवार, नाजूक व तीव्र होती.

तृणास जरि येथल्या कुणि अनार्यता लाविली,
बसेल हृदयास या तरिहि डागणी ताविली

—इतकी ती कोमल, काव्यमय होती. तिच्या उत्कटतेला तर सीमाच नव्हती. त्यामुळें, आपल्या धर्माचा नायनाट करण्याकरितां धडपडणाऱ्या ख्रिस्ती मिशनरींना, हिंदु समाजाची अवहेलना करण्याच्या बाबतींत, सुधारकांकडून, अप्रत्यक्ष कां होईना पण, सहाय्य मिळतें, हें पाहून त्यांना अगदीं मरणप्राय दुःख झालें; व सुधारकांचा अतिशय संताप आला. त्या आवेगांत त्यांनीं साऱ्याच सुधारकांवर अत्यंत कठोर, व क्वचित् अप्रशस्तही, टीका केली आहे. तथापि, त्या क्षुब्ध मनःस्थितींत त्यांनीं कांहींही लिहिलेलें असलें, तरी त्यामुळें त्यांचीं जीं मतें होतीं तीं नव्हतीं, असें ठरत नाहीं. खळबळलेल्या पाण्यांत पडलेलें चंद्राचें प्रतिबिंब जरी विकृत, भग्न व अस्पष्ट दिसलें, तरी पाणी शांत झाल्यावर तेंच सुंदर, सुश्लिष्ट व स्पष्ट दिसूं लागतें. ‘ वक्तृत्व ’ किंवा ‘ लोकहितवादी ’ या निबंधांत, मिशनरींची व नवीन मंडळींची निंदा करण्याच्या ऐन भरांत, चिपळूणकरांनीं कांहींही लिहिलेलें असलें, तरी त्यांचीं खरीं सामाजिक मतें या परिहासप्रलापांत आलेलीं नसून, तीं ‘ संपत्तीचा उपभोग, ’ ‘ लोकभ्रम, ’ ‘ देशोन्नति ’ इत्यादि लेखांतूनच व्यक्त झालीं आहेत व त्यांतच तीं पाहिलीं पाहिजेत.

आर्यसमाज, प्रार्थनासमाज आणि सत्यशोधक समाज या नवीन धर्मसंस्थांविषयीं चिपळूणकरांचें मत प्रतिकूल होतें, हें प्रसिद्धच आहे. धर्म या विषयाचा चिकित्सक किंवा सश्रद्ध बुद्धीनें त्यांनीं विचार केला होता, असें वाटत नाहीं. ते स्वतः एकेश्वरी मताचे होते; व प्रचलित धर्मसमजुतींविषयीं त्यांना आदरही फारसा नव्हता. परंतु, या तिन्ही संस्थांच्या पुरस्कर्त्यांकडून होणारा स्वधर्माचा अधिक्षेप सहन न झाल्यामुळें चिपळूणकरांनीं त्यांच्यावर वारंवार कडक टीका केली आहे. ही टीका जरी अतिशयोक्त असली, तरी तिच्यांत अगदींच तथ्य नव्हतें, असें मात्र नाहीं. आर्यसमाजाचे संस्थापक दयानंद सरस्वती

यांच्यावर त्यांनीं जी कठोर टीका केली आहे, त्या टीकेंतील वैयक्तिक उपहासाचा भाग सोडला, तर बाकी टीका बरीच योग्य होती, हें कबूल केलें पाहिजे. जीवजातावर मृत्यूचा पाश टाकणारा काळ जरी निष्ठुर असला, तरी निःपक्षपाती नाहीं. अनंत व्यक्तींच्या कर्तृत्वावर विस्मरणाचें आवरण घालून त्यांना नामशेष किंवा निःशेष करणारा काळ अलौकिक व्यक्तींच्या फक्त अवगुणांवरच तेवढें पांघरूण घालतो. वर्तमानकाळाच्या सूर्यप्रकाशांत स्पष्ट दिसणारे विभूतींचे अवगुण गतकाळाच्या अंधारांत लुप्त होतात; व त्यांच्या सद्गुणांचें आणि सत्कृतींचें तेज मात्र कालांतरानें अधिकाधिक तळपूं लागतें. दयानंदांची स्थितीही आज अशीच झालेली असल्यामुळें चिपळूणकरांनीं त्यांच्यावर केलेली टीका आतां सर्वच अत्यंत अनुचित वाटते. परंतु तितकी ती अनुचित खास नाहीं. स्वमतप्रसाराच्या बाबतींत दयानंदांचें धोरण चढावाचें होतें. आपल्याला संमत नसलेल्या तत्त्वांवर, मतांवर आणि संस्थांवर ते अगदीं बेगुमानपणानें तुटून पडत असत. त्यांचें लक्ष समाजयावर असल्यामुळें त्यांची वादाची किंवा वक्तृत्वाची पद्धतही शुद्ध नसे. मालेंतील 'वक्तृत्व' या निबंधावरील आपल्या दुसऱ्या टीकात्मक पत्रांत मोडक यांनींही, दयानंदांच्या वादविवादाच्या पद्धतीविषयीं, नापसंती व्यक्त केलेली आढळते. वेदांचा अर्थ लावण्याची त्यांची रीत पुष्कळ पंडितांना बिलकूल मान्य नव्हती. 'वेद, पुराणें आणि शब्दप्रमाण' या आपल्या लेखांत डॉ. भांडारकर यांनीं दयानंदांच्या वेदार्थपद्धतीविषयीं स्पष्ट विरुद्ध मत दिलें होतें. ही सर्व स्थिति ध्यानांत घेतली, म्हणजे चिपळूणकरांची त्यांच्यावरील टीका अगदींच अयोग्य होती, असें म्हणवत नाहीं. त्यांतही, आज आपण ज्या बुद्धीनें दयानंदांकडे व आर्यसमाजाकडे पाहतों, त्या बुद्धीनें त्या टीकेचा विचार करणें अगदीं गैर होईल. चिपळूणकरांनीं ज्या वेळीं ती टीका लिहिली, त्या वेळीं दयानंदांच्या कर्तृत्वाचें फक्त विध्वंसक स्वरूप तेवढेंच प्रकट झालें होतें. आर्यसमाजाच्या भावी धर्मकार्याचें उज्ज्वल चित्र जर त्यांच्या प्रतिभादृष्टीपुढें त्या वेळीं असतें,

तर त्यांनीं त्या समाजाच्या प्रवर्तकावर इतकी विदारक टीका कशाला केली असती ? पण, भविष्यत्काळाच्या झांकल्या मुठींत काय सांठवून ठेविलेलें आहे, हें त्यांना तरी आधीं कसें कळावें ? अर्थात् तत्कालीन परिस्थिति लक्षांत घेऊनच त्या टीकेचा विचार केला पाहिजे. वस्तुत:, इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून, दयानंदांच्या इतका आर्य संस्कृतीचा प्रभावशाली उद्धारक दुसरा निर्माण झालेला नाहीं. त्यांचा देशाभिमान इतका उत्कट होता कीं, क्षात्रतेजाचें आगर म्हणून एका काळीं इतिहासांत गाजलेल्या राजपुतान्यांत ज्या वेळीं ते गेले, त्या वेळीं तेथील व्यसनमग्न रजपुतांची नादान मन:स्थिति पाहून, एरवीं प्रत्यक्ष आईच्या मृत्यूच्या वार्तेनेंही ज्यांच्या विरक्त चित्ताला यत्किंचित्ही द्रव आला नाहीं, त्या दयानंदांच्या डोळ्यांना अश्रूंच्या धारा लागल्या ! ब्राह्म वगैरे इतर सुधारणावादी धार्मिक पंथांवर त्यांचा जो राग होता, तो मुख्यत: याच कारणामुळें कीं, त्या पंथांना स्वत:च्या संस्कृतीचा असावा तितका अभिमान नसून, परकीयांचें अनुकरण करण्याकडेच त्यांचा ओढा जास्त असे. त्याग, तपस्या आणि तत्त्वनिष्ठा यांची दयानंद हे केवळ मूर्ति होते. पण, त्यांच्या तपस्तेजाला तामसीपणाची जोड मिळालेली असल्यामुळें, त्यांची विद्वत्ता विद्युद्दीपाच्या निर्मळ ज्योतीप्रमाणें न प्रकाशतां, तिच्यांतून पुष्कळदां वितंडवादाचा धूमाग्नि उफाळून विचारी लोकांच्या मनांत निर्वेद उत्पन्न करीत असे. चिपळूणकरांचें मन दयानंदांविषयीं इतकें प्रतिकूळ व्हावयाला तरी त्यांची प्रतिपक्षाविषयीं बेसुमार तुच्छतेनें बोलण्याची प्रवृत्तीच कारण झालेली दिसते.

चिपळूणकरांनीं प्रार्थनासमाजावर केलेली टीकाही कांहीं बाबतींत अगदीं समर्पक वाटते. जगांतील सर्व धर्मपंथांना समदृष्टीनें लेखून त्यांतील उदात्त तत्त्वांचा समन्वय करण्याची जी एक प्रवृत्ति विचारी लोकांत दृष्टीस पडते, तिचें प्रार्थनासमाज हें मूर्तिमंत उदाहरण होय. ज्या परमहंस सभेंतून हा समाज उत्क्रांत झाला, तिचा कल जरी

ख्रिस्ती धर्माकडे बराच होता, तरी खुद्द या समाजाच्या विचारप्रणालींत मात्र भागवतधर्माच्या तत्त्वज्ञानाचें सुंदर प्रतिबिंब पडलेलें आहे. प्रार्थनासमाजाच्या रूपानें, हिंदुस्थानांतील साऱ्या धर्मांची एकवाक्यता करून, सर्वसंमत होईल असा राष्ट्रीय धर्म ( National Religion ) स्थापन करावा, अशी त्याच्या प्रवर्तकांची आकांक्षा होती. परंतु, आपल्या विशिष्ट ध्येयाची पूर्तता किंवा प्रसार करण्यासाठीं अवश्य असलेली स्वार्थत्यागाची बुद्धि त्यांच्या ठिकाणीं नसल्यामुळें, ही आकांक्षा साहजिकच फलद्रूप झाली नाहीं. " मूर्तिपूजा, जातिभेद वगैरे आम्ही बिलकूल मानीत नाहीं म्हणून शेंकडों वेळां ईश्वरोपासनेच्या वेळीं मंदिरांत सांगून बाहेर आले कीं पुन्हा लागले जगाच्या रूढीला ! "—हें मोडक यांच्या पहिल्या पत्राला उत्तर देतांना चिपळूणकरांनीं केलेलें त्यांचें वर्णन कांहीं चुकीचें नव्हतें. ब्राह्मसमाजाचे अध्वर्यु बाबू प्रतापचंद्र मुजूमदार यांनीं, मुंबईच्या आपल्या या धर्मबंधूंविषयीं बोलतांना, असे उद्गार काढले होते कीं, " त्यांच्यापैकीं एकाही सभासदानें यज्ञोपवीताचा त्याग केला आहे किंवा जात सोडली आहे, असें मला वाटत नाहीं. " परंतु या त्यांच्या क्रियाशून्यतेबद्दल आश्चर्य वाटण्याचें मात्र मुळींच कारण नाहीं. कारण, न्या. रानडे यांनीं, संगतसभेंतील एका चर्चेच्या वेळीं, असें स्पष्टच बोलून दाखविलें होतें कीं, " जोंपर्यंत पुष्कळांची समजूत आपल्या समजुतीहून निराळी आहे, तोंपर्यंत आपल्या समजुतीप्रमाणें आचरण करणें बरोबर नाहीं. " " बोलल्याप्रमाणें वागलेंच पाहिजे असा आग्रह आम्ही धरित नाहीं, " या प्रतापचंद्रांच्या उद्गारांचें मर्म झालें, तरी हेंच होय. जिथें ब्राह्मधर्माच्या खुद्द प्रवर्तकांनाच मुळीं आपण बोलल्याप्रमाणें वागलें पाहिजे अशी तळमळ लागलेली नव्हती, तिथें त्या धर्माच्या तत्त्वांचें निष्ठेनें परिपालन करणारा नवरंगे यांच्यासारखा एकाद दुसराच सुधारक अपवादादाखल निघावा, यांत काय नवल ? नवीन धर्म

स्थापन करावयाला निघालेल्या या प्रेषितांच्या स्वार्थत्यागाची आर्थिक बाजू पहावयाला गेलें, तरी तिथेंही असलाच प्रकार दृष्टीस पडतो. वस्तुतः प्रार्थनासमाजाचे बहुतेक महर्षि हे बडे सरकारी हुद्देदार व संपन्न होते. पण, आपल्या आवडत्या कार्यासाठीं सर्वस्वाचें समर्पण करण्याची प्रवृत्ति, आर्यसमाजाप्रमाणें, या समाजाच्या धुरीणांत होती, असें दिसत नाहीं. किंबहुना, प्रार्थनासमाजाचें धर्ममंदिरसुद्धां, त्याचीं मतें मान्य नसलेल्या लोकांच्या मदतीनेंच बव्हंशीं, बांधलें गेल्याबद्दल, त्या मंदिराच्या प्रवेशसमारंभाच्या वेळीं, न्या. रानडे यांनीं उद्वेग व्यक्त केला होता ! त्यामुळें, राष्ट्रीय धर्म स्थापन करण्याच्या उद्योगांत या मंडळीला अपेश येऊन, उलट ख्रिस्ती धर्माचें अनुकरण केल्याचा आरोप मात्र त्यांच्यावर आला. केवळ चिपळूणकरांनींच त्यांच्यावर ख्रिस्ती धर्माचें अनुकरण केल्याबद्दल ‘ केसरीं ’ तून टीका केली होती, असें नव्हे. ‘ ज्ञानप्रकाशा ’ सारख्या, त्याही वेळीं सुधारक म्हणून गणल्या गेलेल्या, पत्रानें अशाच प्रकारचा आरोप, प्रार्थनासमाज स्थापन झाल्या-नंतर लगेच, त्याच्यावर केला होता; व राजारामशास्त्री भागवत यांच्या-सारख्या अव्वल दर्जाच्या कर्त्या सुधारकानेंही,‘मराठ्यांच्या संबंधानें चार उद्गार ’ या आपल्या ग्रंथांत, ख्रिस्ती धर्माच्या नमुन्यावर हा नवा नंदादीप पाजळल्याबद्दल समाजाच्या प्रतिष्ठापकांना उघड उघड दोष दिलेला आढळतो. अशा स्थितींत, या आधुनिक धर्मद्रष्ट्यांवर, अनुकरणाबद्दल म्हणा किंवा क्रियाशून्यतेबद्दल म्हणा, चिपळूणकरांनीं केलेली टीका अगदींच अयोग्य आहे, असें कसें म्हणावें ?

प्रार्थनासमाजाच्या या महर्षींपेक्षां स्वार्थत्यागाच्या आणि कर्तबगा-रीच्या बाबतींत सत्यशोधक समाजाचे जनक जोतिराव फुले हे निस्संशय सरस ठरतील. स्त्रियांची आणि अस्पृश्यांची शाळा व विशेषतः बाल-हत्याप्रतिबंधकगृह चालविण्याच्या कामीं त्यांनीं भोगलेला छळ व सोसलेली झीज ही त्यांच्या त्यागबुद्धीची निदर्शक आहे बहुजनसमा-जाच्या उन्नतीविषयीं त्यांना अतिशय कळकळ होती, यांत शंका नाहीं.

परंतु, कांठावरील झाडांचीं पानें आंत पडून कुजल्यामुळें झऱ्याचें स्वच्छ पाणीही जसें कलुषित होऊन जावें, तशी त्यांच्या अंतःकरणांतील दलितांविषयींची अनुकंपा जातिद्वेषाच्या संपर्कामुळें दूषित होऊन गेली होती. शिवाय त्या कळकळीचें स्वरूप एकांगी होतें. लोकांच्या राजकीय आणि आर्थिक दास्याची जाणीव तीव्रतेनें होऊन विष्णुबुवा ब्रह्मचारी यांना ज्याप्रमाणें सार्वस्विक संप्रदायाचा पुरस्कार करावासा वाटला, तसें जोतिरावांचें झालें नाहीं. बहुजनसमाजाच्या दास्याची फक्त धार्मिक बाजू तेवढीच त्यांना दिसली. त्यांची कल्पना अशी होती कीं, देशांतून एक ब्राह्मणांची जात नष्ट झाल्याबरोबर भूतलावर बळीचें राज्य स्थापन होऊन शूद्रातिशूद्र स्वर्गसुखांत लोळूं लागतील ! वस्तुतः, ब्राह्मण हे सत्ताहीन झालेले असल्यामुळें त्यांचें वर्चस्व फार काळ टिकणें शक्य नाहीं, हें त्यांना कळावयाला हवें होतें. परंतु, निराश्रित धर्माच्या वैकल्पिक गुलामगिरीपेक्षां राज्यसत्तेनें निर्मिलेली आर्थिक गुलामगिरी ही अधिक व्यापक आणि विघातक असते, याची जाणीव त्यांना कधींच झाली नाहीं. त्यामुळें, सत्यशोधक समाजाच्या घटनेंत त्यांनीं असा कायमचा निर्बंध घालून दिला कीं, "या समाजांत राजकीय विषयांवर बोलणें अजी वर्ज आहे." अर्थात् त्यांची बहुजनसमाजाविषयींची कळकळ विशिष्ट जातीविषयींच्या विद्वेषानें किडून जाऊन तो विषार त्यांच्या लिखाणांतून जागोजाग उमटला. शिवाय, त्यांच्या पुस्तकांतून अज्ञानजन्य दुर्मतांचाही असा कांहीं विचित्र गोंधळ दृष्टीस पडतो कीं, चिपळूणकरांनीं त्याबद्दल केलेल्या त्यांच्या उपहासाचें नवल वाटत नाहीं. किंबहुना, स्वतः जोतिरावही इतरांवर टीका करितांना आपली लेखणी किती निरर्गल चालवीत असत हें लक्षांत घेतलें, म्हणजे चिपळूणकरांनीं त्यांच्या ग्रंथांची केलेली निर्दय टवाळी एकंदरींत न्याय्यच वाटते. 'आर्य ब्राह्मणांतील पहिला दिवाभीत' व 'नूतन शंकराचार्य' न्या. रानडे यांच्यावर, 'इषारा' नांवाच्या एका चोपड्यांत,

जोतिरावांनीं केलेली टीका ही त्यांच्या विकृत विचारसरणीचा एक मासला म्हणून दाखवितां येईल. निबंधमालेच्या चवथ्या वर्षाच्या समारोपांत त्यांच्या या साऱ्या कुत्सित कल्पनांचा फोलपणा दर्शवितांना चिपळूणकरांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

" आमच्या ज्ञातीचे जे कांहीं वास्तविक दोष असतील, ते सर्व आम्हांस कबूल आहेत. त्यांवर पांघरूण घालण्याची आमची बिलकूल इच्छा नाहीं. त्याप्रमाणेंच आमच्या शूद्र देशबंधूंवर जातिभेदाच्या संबंधानें वगैरे जीं दुःखें खरोखर येत असतील, तीं हलकीं करणें किंवा होतील तितकीं नाहींशी करणें, हें प्रत्येक देशहितेच्छूचें कर्तव्य होय, हेंहीं आम्हांस मान्य आहे; व आमची पक्की खात्री आहे कीं, या कामास आमच्या ज्ञातिबांधवांची विमुखता दृष्टीस पडणार नाहीं, इतकेंच नव्हे तर पुष्कळ मोठ्या उत्साहानें त्यास साह्य करतील. तर असे कांहीं सुविचार मनांत आणून आमचे सत्यसमाजवाले देशबंधु त्याप्रमाणें जर चालतील, व या आर्यभूमीचा आजपर्यंत साऱ्या जातींनीं जसा अभिमान बाळगिला तसाच पुढेंही बाळगून आपआपसांत वितुष्ट वाढूं न देण्याविषयीं जर तजवीज ठेवतील, तर अजूनही आमची स्थिति सुधारेल. "

—चिपळूणकरांनीं सत्यशोधकांना केलेला हा हितबोध निदान विचारी लोकांना तरी खचित पटेल. आर्यसमाज, प्रार्थनासमाज आणि सत्यशोधक समाज यांच्यावर त्यांनीं वेळोवेळीं केलेल्या या टीका त्यांच्या सामाजिक मतांविषयीं गैरसमज उत्पन्न करावयाला फार कारणीभूत झाल्या आहेत. परंतु, या टीकांच्या मुळाशीं जे विकार किंवा विचार होते, त्यांचें पृथक्करण केल्यावर चिपळूणकरांच्या सामाजिक मतांच्या उदारपणाविषयीं शंका उरत नाहीं.

चिपळूणकरांचे मालेंतून जे विस्तृत आणि विद्वत्तापूर्ण निबंध प्रकाशित झाले, त्यांत, 'जॉनसनचें चरित्र' सोडल्यास, 'इतिहास' हा

निबंध जसा कालानुक्रमानें तसाच गुणांनींही बहुधा पहिला येईल. ख्रिस्ती मिशनरी व नवीन शिकलेली मंडळी यांच्या तीक्ष्ण उपहासाला प्रथम या निबंधापासूनच आरंभ झाला; व ही उपहासात्मक टीका, हिंदुस्थानसरकारच्या सालोसाल वाढणाऱ्या लष्करी खर्चाप्रमाणें, पुढें प्रत्येक विस्तृत निबंधांतून अधिकाधिक फुगत गेली. चिपळूणकरांनीं गिबन, मेकॉले, बकल प्रभृति इंग्रज लेखकांच्या इतिहासग्रंथांचें उत्तम परिशीलन केलें होतें. त्याचें प्रतिबिंब या लेखांत पडलें आहे. बकलनें आपल्या इतिहासाच्या पहिल्या भागांत 'इतिहास' या विषयाचें शास्त्रीय दृष्टीनें जसें विवेचन केलें आहे, तसें विवेचन या लेखांत आढळत नाहीं. किंबहुना, तशा प्रकारच्या शास्त्रीय दृष्टीनें हा लेख लिहिलेलाच नाहीं. आपल्या समाजांत इतिहासाविषयीं जी अनभिरुचि आणि अनास्था एकंदरींत दिसून येते व ज्या कोत्या समजुती दृष्टीस पडतात, त्यांचा निरास करावा या हेतूनें हा निबंध लिहिलेला आहे. ग्रॅन्ट डफच्या इतिहासावर कीर्तने यांनीं केलेल्या मार्मिक टीकेमुळें तत्कालीन सुशिक्षितांच्या मनांत स्वदेशाच्या इतिहासाविषयीं कोणत्या भावना उद्भूत झाल्या होत्या, या गोष्टीचीही कल्पना या निबंधावरून येते. किंबहुना, मालेच्या आठव्या अंकांत त्यांनीं केलेला या विषयाचा समारोप म्हणजे त्या भावनांचा उद्दाम आविष्कारच होय. चिपळूणकरांचा जाज्वल्य देशाभिमान या समारोपांत प्रथमच उत्कटतेनें आविर्भूत होऊन, त्याच्या प्रखर दीप्तीनें लोकांच्या मनांत विस्मय आणि सरकारी अधिकाऱ्यांच्या मनांत विषाद उत्पन्न केला. इतिहाससंशोधनाविषयीं महाराष्ट्रांतील सुशिक्षित मंडळींत आज जें थोडेंबहुत प्रेम दृष्टीस पडतें, त्याला हा स्फूर्तिदायक निबंध कारण झाला, असें म्हणावयाला हरकत नाहीं. खुद्द चिपळूणकर हे महाराष्ट्रीय इतिहाससंशोधकांचे अग्रेसर आहेत. 'संस्कृत कविपंचक' या प्रबंधाप्रमाणें, साने व मोडक या विद्वानांच्या साहाय्यानें काढलेलें, 'काव्येतिहाससंग्रह' हें नियतकालिकही त्यांच्या रसिक व संशोधक बुद्धीची साक्ष देते.

'वक्तृत्व' हा निबंध 'इतिहास' या निबंधाहून बराच मोठा आहे. या लेखांत पुनरुक्ति आणि विषयांतर या दोषांना जरी पुष्कळच वाव मिळालेला असला, तरी माहितीच्या किंवा विषयविवेचनाच्या दृष्टीनें तो कमी सरस आहे, असें नाहीं. यानंतरचा मोठा निबंध 'इंग्रजी भाषा' हा होय. चिपळूणकरांचा हा निबंध माहितीच्या दृष्टीनें फार अपूर्ण आहे. परंतु, त्यांच्या राजकीय विचारांची प्रगति आतांपर्यंत कुठवर झाली होती, व निबंधमालेंत त्यांचें प्रतिबिंब दिवसेंदिवस कसें अधिक पडूं लागलें होतें, याची कल्पना येण्याच्या दृष्टीनें या निबंधाचें महत्त्व फार आहे. 'इंग्रजी भाषा,' 'डॉक्टर जॉनसन,' 'लोकहितवादी' व 'आमच्या देशाची स्थिति' या निबंधांचा विचार निव्वळ वाङ्मय दृष्टीनें करून चालणार नाहीं. चिपळूणकरांच्या राष्ट्रीय विचारांच्या प्रगतीचें सुसंगत स्वरूप या निबंधांतून दृष्टीस पडतें. 'इंग्रजी भाषा' हा निबंध त्यांनीं स. १८७६ सालच्या उत्तरार्धात लिहिला. निबंधमालेला राजकीय दृष्टीनें जें पुढें तीव्र आणि तेजाळ स्वरूप आलें, ते यावयाला प्रथम याच निबंधापासून सुरवात झाली. स. १८७६ पासून १८८० सालपर्यंत ज्या उलाढाली हिंदुस्थानांत घडून आल्या, त्यांचा परिणाम या चार निबंधांवर अतिशय झाला आहे. तेव्हां, त्या उलाढालींचा थोडा तरी परामर्ष घेतल्याशिवाय, या निबंधांवर लिहिणें योग्य होणार नाहीं.

निबंधमालेचा जन्म हा राजकारणांतील नव्या मन्वंतराचा निदर्शक आहे. मालेच्या जन्मानंतर पुढील दहा वर्षांमध्यें केवळ हिंदुस्थानांतच नव्हे, तर सव जगांत ज्या घडामोडी झाल्या, त्यांनीं हिंदी राजकीय चळवळीचें भावी स्वरूप निश्चित केलें. या घडामोडींशीं किंवा त्यांतून उद्भवलेल्या चळवळीशीं मालेचा प्रत्यक्ष संबंध कांहीं नाहीं, ही गोष्ट खरी. पण, त्यांचा परिणाम चिपळूणकरांच्या स्वातंत्र्याकांक्षी प्रतिभेवर उत्कटतेनें होऊन, मालेचें स्वरूप दिवसेंदिवस अधिका-

धिक प्रखर होत गेलें, यांत मात्र शंका नाहीं. निबंधमालेच्या जन्मानंतर दोन महिन्यांच्या आंतच डिस्राएलीच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडांत हुजूर पक्षाची कारकीर्द सुरू होऊन, त्याच्या विजिगीषेमुळें आशियाच्या राजकारणांत अनेक उत्पात घडून आले; व त्याची प्रतिक्रिया हिंदुस्थानाच्या राज्यकारभारावर जोरानें झाली. लॉर्ड नॉर्थब्रुक हा त्या वेळीं हिंदुस्थानाचा व्हाइसरॉय होता. त्यानें हिंदी गिरण्यांना संरक्षण देण्यासाठीं मँचेस्टरच्या कापडावर जकात बसविल्यामुळें, त्याच्यावर नोकरीची मुदत भरण्यापूर्वींच स्वदेशीं परत जाण्याचा प्रसंग आला. त्याच्या जागेवर डिस्राएलीनें लॉर्ड लिटन याची नेमणूक केली. या प्रसंगीं लिटनला घातलेल्या पत्रांत त्यानें असे सूचक उद्गार काढले होते कीं, "मध्य आशियांतील राजकीय परिस्थिति अतिशय नाजूक व बिकट असून, त्या दृष्टीनें हिंदुस्थानाच्या व्हाइसरॉयाच्या जागेवर चांगल्या मुत्सद्याची योजना होणेंच अवश्य आहे. या जागेचा स्वीकार जर तुम्ही केला, तर स्वदेशाची सेवा व त्याबरोबरच शाश्वत कीर्तीही संपादन करण्याची संधि तुम्हांला मिळेल." लिटनच्या हातून पुढें घडलेल्या साऱ्या अनन्वित कृत्यांचें बीज डिस्राएलीच्या या उद्गारांतच आहे. किंबहुना, हिंदी संस्थानें एकामागून एक खालसा करून डलहौसीनें ज्याप्रमाणें जुन्या राजवटींतील सत्ताधारी वर्गाला बंड करावयास उद्युक्त केलें, त्याप्रमाणें प्रजेचे मूलभूत हक्क एकामागून एक हिरावून घेऊन लिटननें नव्या अमदानींतील सुशिक्षितवर्गांत तीव्र असंतोष उत्पन्न केला. सत्तावन सालच्या बंडानंतर राज्यसत्तेचें जें हस्तांतर झालें, त्याच्या मुळाशीं हिंदी लोकांच्या हितरक्षणाची बुद्धि असावी, असा सुशिक्षितांचा समज झाला. कारण, पार्लमेंटच्या ज्या कायद्यानुसार हें परिवर्तन घडून आलें, त्याचें नांवच मुळीं 'हिंदुस्थानाचें राज्य अधिक चांगल्या रीतीनें चालविण्याचा कायदा' ( An Act for the Better Government of India ) असें होतें. या राज्यक्रांतीनंतर

लगेच बाहेर पडलेल्या व्हिक्टोरिया राणीच्या उदार जाहिरनाम्यामुळें ही समजूत दृढतर झाली; व हा जाहिरनामा म्हणजे आपल्या राजकीय हक्कांचा जणुं एक ताम्रपटच आपल्याला बहाल करण्यांत आला आहे, असें सुशिक्षितांना वाटलें. पण ही त्यांची कल्पना पुढील सोळा वर्षांत भ्रामक ठरली. राज्यकारभारांत झालेल्या या स्थित्यंतरामुळें, दादाभाई नौरोजी यांनीं वेल्बी कमिशनला पाठविलेल्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें, लांचलुचपतीच्या जागीं रयतेचा रक्तशोष करणारे हजारों रुपयांचे तनखे आले, व्यक्तिगत अरेरावीच्या जागीं कायदेशीर दडपशाही आली व वशिलेबाजीच्या जागीं वर्णभेदाचें प्रस्थ माजलें, एवढाच काय तो फरक पडला ! ईस्ट इंडिया कंपनीला दर वीस वर्षांनीं तरी आपल्या कारभाराचा जाब पार्लमेंटला द्यावा लागत असे. पण हें नवीन सरकार स्वतःशिवाय कुणालाच जबाबदार नव्हतें. लिटनशाहींत या अंदाधुंदीची परमावधि झाली. उद्योगधंदे बुडविण्यांत आले; प्रजा निःशस्त्र करण्यांत आली; व वारंवार अवर्षणें पडल्यामुळें होरपळून गेलेली जमीन जें निकस अन्न देईल, त्यानें सरकारसारा आणि स्वतःचें पोट भरण्याचा दुर्धर प्रसंग रयतेवर येऊन ठेपला. सिव्हिल सर्व्हिसची वयोमर्यादा कमी करून, वरिष्ठ नौकऱ्यांचें द्वार हिंदी लोकांना बंद करण्यांत आलें; व स. १८३३ च्या कायद्याला हरताळ फांसून त्यांच्यासाठीं मुद्दाम कमी दर्जाचा नौकरपेशा निर्माण करण्यांत आला. बाहेरून येणाऱ्या विदेशी मालावरील संरक्षक जकाती उठवून, ब्रिटिश व्यापाराला उत्तेजन देण्यांत आलें; व बाहेर जाणाऱ्या स्वदेशी मालावर प्रतिबंधक जकाती बसवून, हिंदी व्यापाराचा उच्छेद करण्यांत आला. स. १८७६ सालीं दुष्काळानें प्रथम दक्षिण हिंदुस्थानांत आपलें भीषण स्वरूप प्रकट केलें; व तो लवकरच सर्व देशभर पसरून स. १८७९ सालपर्यंत टिकला. या दुष्काळांत पन्नास लाख माणसें मृत्युमुखीं पडलीं ! पण, कोट्यवधि लोक अशा रीतीनें अन्नाला मोताद होऊन मरत असतां, राणीनें सम्राज्ञीपद धारण केल्याबद्दल दिल्लीला

मेजवान्या झडत होत्या; व दुष्काळानें मुलूख सारा बेचिराख होऊन गेला असतां, साम्राज्याच्या महोत्सवाचीं चिराखदानें दिल्लीला पाजळत होतीं. हिंदी जनतेवरील या दारुण आपत्तीच्या प्रसंगीं तिला सहानुभूतीचा संदेश पाठविण्याऐवजीं डिस्राएलीनें, मोगल बादशहांच्या पुरातन सिंहासनावर बसण्याची संधि लिटनला लाभल्याबद्दल, त्याचें उलट अभिनंदन केलें! शेतकऱ्यांना साऱ्याची माफीच काय, पण तहकुबीही सरकारकडून मिळाली नाहीं; व दारिद्र्याबरोबर कर्जबाजारीपणाही त्यांच्या खोपटींत कायमचा येऊन बसला. आपल्या या जुलमी कारभाराविरुद्ध जनतेला चकार शब्द काढतां येऊं नये, म्हणून लिटननें अखेर हिंदी वृत्तपत्रांच्या मुस्कुटदाबीचाही कायदा जारी केला.

स. १८७४ पासून १८८० पर्यंतचा हा अर्ध तपाचा काळ हिंदुस्थानाप्रमाणें महाराष्ट्रालाही अतिशय धामधुमीचा गेला. स. १८७३ सालच्या अखेर बडोद्याचे अधिपति श्री. मल्हारराव गायकवाड यांच्यावर सरकारचा रोष होऊन त्यांच्या राज्यकारभाराची चौकशी सुरू झाली. स. १८७५ च्या आरंभीं, बडोद्याचा रेसिडेंट क. फेर याला विषप्रयोग केल्याच्या आरोपावरून, सरकारनें महाराजांना पदच्युत केलें; व त्यांची सर्व खाजगी मालमत्ताही त्याबरोबरच जप्त केली. बडोद्याच्या राज्यव्यवस्थेंत अंदाधुंदी माजलेली होती, ही गोष्ट खरी. पण, महाराजांवर सरकारची इतराजी व्हावयाला, त्यांच्या ठिकाणीं असलेल्या राज्यकर्तृत्वाच्या अभावापेक्षां त्यांच्या स्वाभिमानाचा प्रभावच अधिक कारण झाला, याची जाणीव महाराष्ट्रांत सर्वांना होती. किंबहुना, मुंबईच्या गव्हर्नरासमोर मांडलिकाच्या दर्जानें वागण्याचें त्यांनीं नाकारलें, व तसा प्रसंग येऊं नये म्हणून लॉर्ड नॉर्थब्रुक यानें मुंबईस भरविलेल्या दरबारालाही ते हजर राहिले नाहींत, इत्यादि कारणांमुळेंच त्यांच्यावर पदच्युतीचा प्रसंग ओढवला, अशी लोकांची खात्री होती. त्यामुळें, त्यांच्यावरील या संकटाची बातमी पुण्याला येऊन

पोंचतांच, सार्वजानिक काकांनीं एक लक्ष रुपयांच्या मदतीचें आश्वासन त्यांना तारेनें दिलें; व महाराजांची चौकशी त्यांच्या योग्यतेला अनुरूप अशा निःपक्षपाती न्यायाधीशांकडून करविण्यांत यावी, अशी मागणी सार्वजनिक सभेनें सरकारजवळ केली. स. १८३९ सालीं सातारचे तेजस्वी छत्रपति प्रतापसिंह महाराज यांना पदच्युत करण्यांत आलें तेव्हां, किंवा पुढें दहा वर्षांनीं सातारचें राज्य अजिबात खालसा करण्यांत आलें तेव्हांही, ज्या पुणें शहरानें त्या अन्यायाबद्दल दुःखाचा एक उसासा टाकला नाहीं किंवा निषेधाचा एक शब्द उच्चारला नाहीं, त्यानें या वेळीं, तशाच प्रकारच्या आपत्तींत, मल्हाररावांना मोठ्या धैर्यानें मदत करून, आपल्या त्या पातकाची जणुं निष्कृतीच केली ! सभेच्या मागणीप्रमाणें महाराजांची चौकशी होऊन जरी त्यांच्यावरील आरोपाचें निरसन झालें, तरी राज्याधिकाराला मात्र ते नालायख ठरून, त्यांची अखेर मद्रासला रवानगी करण्यांत आली. त्यांच्या चौकशीचें हें वावटळ निवळतें न निवळतें, तोंच स. १८७५ सालच्या मे महिन्यांत शेतकऱ्यांच्या बंडाळीचा वणवा महाराष्ट्रांत सर्वत्र भडकला. या दंग्यांत कर्जबाजारी शेतकऱ्यांनीं सावकारांच्या दप्तरांची होळी करून आपला ऋणभार हलका केला; व द्रव्यलोभी सरकारनें, आपलें सारावाढीचें अमानुष धोरण न बदलतां, उलट होरपळलेल्या सावकारांवरच कायद्याचें शस्त्र उचललें. स. १८७८ सालीं कोल्हापूरचे बालनृपति छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या छळाची बातमी सर्व महाराष्ट्रांत पसरून, मल्हारराव गायकवाडांच्या पदच्युतीमुळें आधींच व्यथित झालेलीं, लोकांचीं मनें त्यांच्या बंदिवासाच्या कहाणीनें विदीर्ण होऊन गेलीं. वासुदेव बळवंत फडके यांच्या बंडाची धामधूमही याच सुमाराला सुरू होऊन, सत्तावन सालच्या बंडापासून स्तिमित झालेल्या राजकीय वातावरणांत मोठीच खळबळ उडाली. मल्हारराव महाराजांना मदत करण्याच्या

बाबतींत सार्वजनिक सभेनें जी तत्परता दाखविली, तिच्यामुळें सरकारचें मन सभेविषयीं थोडेसें कलुषित झालेंच होतें. किंबहुना, बडोद्याचा रेसिडेंट क. फेर यानें महाराजांवर जे अनेक आरोप केले होते, त्यांपैकीं एक आरोप असा होता कीं, आपल्या हस्तकांना दक्षिणेंत पाठवून, त्यांच्याकडून महाराजांनीं राजद्रोही चळवळीचा प्रसार महाराष्ट्रांत करविला. त्यामुळें, फडके यांनीं बंडाचें निशाण उभारतांच, त्या बंडामागें पुण्यांतील राजकारणी मंडळी असावीत, अशी सरकारची कल्पना झाली; व स. १८७९ सालच्या मे महिन्यांत बुधवार आणि विश्रामबाग या पेशव्यांच्या वाड्यांना आगी लागून, त्यांच्या मुळाशीं कोणी रानडे नांवाचा इसम असल्याची हूल उठतांच, सरकारनें पुण्याच्या पुढाऱ्यांवर उघड उघड दंश धरला. न्या. रानडे यांची तडकाफडकी धुळ्याला बदली करण्यांत आली; पुण्याला लष्करी कायदा लागू करण्यांत आला; व फडके यांना पकडून जन्मठेपीची शिक्षा ठोठावण्यांत आली. फडके यांचें बंड हा, शिवछत्रपतीच्या चरित्रापासून स्फूर्ति घेऊन केलेला, जुन्या पद्धतीच्या राज्यक्रांतीचा शेवटचा प्रयत्न होय. आणि, राष्ट्रीय सभेच्या रूपानें सनदशीर चळवळीचा जन्म होण्यापूर्वीं, अशा तऱ्हेचा प्रयोग करण्यांत येऊन, त्या मार्गाची विफलता लोकांच्या मनावर तीव्रतेनें बिंबली जावी, हा तरी एक योगायोगच म्हटला पाहिजे. पुण्याच्या पुढाऱ्यांचा या बंडाशीं अर्थातच कांहीं संबंध नव्हता. पण, फडके यांना पकडून सरकारनें त्यांच्यावर खटला भरतांच, सार्वजनिक काकांनीं मोठ्या धैर्यानें त्यांचें वकीलपत्र घेऊन, बंडखोर झाला तरी त्यालाही कायदेशीर मदत करावयाला पुण्याचे पुढारी कचरत नाहींत, ही गोष्ट सरकारच्या प्रत्ययाला आणून दिली. या एकंदर प्रकारामुळें पुणें शहर व तेथील ब्राह्मणवर्ग यांच्याविषयीं सरकारच्या मनांत कायमची अढी उत्पन्न होऊन, तिचे परिणाम पुढें निबंधमालेलाही थोड्याबहुत प्रमाणांत भोंवले.

आपल्या डोळ्यांसमोर प्रत्यहीं घडणारे हे विपरीत प्रकार पाहून तत्कालीन सुशिक्षितांच्या मनांत कोणत्या भावना, कोणते विचार उचंबळले असतील ? अठ्ठावन सालचा जाहिरनामा वाचून हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराला आतां जबाबदार वळण लागलें, अशी ज्यांची कल्पना झाली होती, त्यांना अवघ्या दीड तपांत आपली स्वप्नसृष्टि जळून खाक झालेली पाहून,—राणीचा अंमल सुरू होण्यापूर्वीं संपन्न आणि सायुध असलेलें राष्ट्र उण्यापुऱ्या अठरा वर्षांच्या अवधींत हैराण आणि हतप्रभ झालेलें पाहून काय वाटलें असेल ? इंग्रजी राज्य हें रामराज्य असून इंग्रज लोक हे आपले उद्धारक आहेत, या १८१८ सालापासून १८७० पर्यंत सतत पन्नास वर्षें कानांवर पडत आलेल्या तत्त्वज्ञानाचा फोलपणा जर कोणत्या कारणांमुळें बहुजनसमाजाच्या अनुभवाला आला असेल, तर तो या दहा वर्षांत एकामागून एक घडून आलेल्या अनर्थांनीं. विशेषतः, स: १८७७ सालच्या जानेवारींत 'कैसर-इ-हिंद' ही पदवी महाराणीनें धारण केल्याचा समारंभ दिल्ली येथें ज्या वेळीं दरबार भरवून करण्यांत आला, त्या वेळीं जेते आणि जित, राज्य आणि साम्राज्य व प्रजाजन आणि बंदिजन यांच्यांतील वैषम्य स्पष्ट होऊन, ब्रिटिश राजनीतीचें खरें स्वरूप लोकांना कळून चुकलें. किंबहुना, मोंगलांच्या उध्वस्त राजधानींत भरलेला तो सम्राज्ञीचा दरबार म्हणजे जेतृत्वाच्या दिमाखाचें मूर्तिमंत प्रदर्शनच होतें ! राणीच्या या नव्या पदवीच्या प्रश्नावर तेव्हां पार्लमेंटांत झालेल्या वादामुळें ब्रिटिश राजनीतीच्या अंतरंगावर इतका विदारक प्रकाश पडला कीं, तिच्या निःस्वार्थीपणाच्या अवडंबरावर पुढें लोकहितवादींसारख्या लब्धप्रतिष्ठांचाही फारसा विश्वास उरला नाहीं. या मन्वंतराचें वर्णन चिपळूणकरांनीं असें केलें आहे कीं, "सती, ठगी, बालहत्या वगैरेबद्दल हळहळणारी व बंदोबस्त करणारी बेंटिक प्रभृति मंडळी कोणीकडे आणि खुद्द कलेक्टरास दुष्काळांत लोक मरतात येवढा उल्लेख केल्याबद्दल ताबडतोब अर्धचंद्र देणारें व लक्षा-

वधि प्रजा मरणाच्या दारीं बसली असतां दिल्लीस दिवा लावणारं ब्रीकन्सफील्डप्रमुख महापंचायतन कोणीकडे! पूर्वीचा जो निदान बाह्यात्कारीं तरी बरोबरीचा संबंध होता, तो जाऊन यापुढें आम्ही राजाधिराज, संस्थानिक हे आमच्या खालीं एक पायरी आणि एरवींची हिंदु प्रजा ही त्याहूनही खालच्या पायरीची, हाच काय तो इत्यर्थ त्या दिवशीं जागजागीं कैसर-इ-हिंदच्या नांवानें खंडोगणती दारू जाळून जे हजारों रुपये खराब केले त्यांत होता. यापूर्वी सारे लोक मोगलाईस व पेशवाईस नांवें ठेवून इंग्रेजी राशियतीची जी तारीफ करीत असत, ती स्थिति आतां गेली." या राजकीय मतपरिवर्तनाला पोषक अशी विचारक्रांति याच सुमारास पाश्चात्य विद्वन्मंडलांत घडून आली होती. विल्यम जोन्स, चार्लस विल्किन्स, हेन्री कोल्ब्रुक, मॉनियर विल्यम्स, गटे, श्लेजेल, हंबोल्ट, विल्सन, मॅक्समुलर प्रभृति युरोपियन पंडितांनीं, संस्कृत वाङ्मयाचें अध्ययन, संशोधन आणि संपादन करून, अखिल मानवजातीच्या इतिहासांत त्या वाङ्मयाला किती लोकोत्तर महत्त्व आहे, हें सर्व जगाच्या निदर्शनाला आणून दिलें. युरोपांत झालेल्या या विचारक्रांतीची लाट हिंदुस्थानांत येऊन थडकतांच नवीन पिढीच्या देशाभिमानानें उचल खाल्ली व जुन्या पिढीच्या स्वाभिमानशून्यतेचा उपहास होऊं लागला. मेकॉले, मिल प्रभृति इंग्रज लेखकांनीं हिंदु संस्कृति आणि सारस्वत यांच्याविषयीं जीं अनुदार मतें प्रदर्शित केलीं होतीं, व ज्यांचा अनुवाद कावेबाज मिशनरी आणि घायकूत सुधारक यांनीं जवळ जवळ अर्धशतक केला, त्या मतांचा फोलपणा या विचारक्रांतीमुळें निर्विवाद सिद्ध होऊन, सुधारकांना देखील स्वाभिमानी होण्याची आवश्यकता वाटूं लागली. प्रार्थनासमाजाचे एक महर्षि डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांनीं न्या. रानडे यांना या सुमारास पाठविलेल्या एका खाजगी पत्रांत असा मार्मिक इशारा दिलेला आढळतो कीं, "वैदिक आणि बौद्ध वाङ्मयाच्या व्यासंगामुळें सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची चळवळ सध्यां सुरू झाली आहे,

अशी कबुली प्रि. वर्डस्वर्थ यांनीं सुद्धां एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें बोलतांना परवां दिली. हिंदूंच्या धार्मिक आणि तात्त्विक कल्पनांचा प्रभाव आज सर्व युरोपवर होत असून, आपण जर त्यांची उपेक्षा केली, तर तिचे परिणाम निस्संशय अनिष्ट होतील. अशा स्थितींत आपल्या समाजाशीं असलेले आपले मतभेद आपण मिरवित सुटणें अत्यंत विघातक ठरेल !" स्वाभिमानाची ही जी ऊर्मि सांस्कृतिक पुनरुज्जीवनामुळें उत्पन्न झाली होती, तिला प्रोत्साहक अशा राजकीय घटना याच वेळीं आशिया खंडांत घडून आल्या. रशियानें स. १८७७ सालीं, युरोपांतून तुर्कस्थानाचें उच्चाटन करण्यासाठीं, त्याच्यावर स्वारी केली. या युद्धांत जरी अखेर तुर्कस्थानाचा पराभव झाला, तरी साऱ्या युरोपनें दुखणाईत म्हणून धिक्कारिलेल्या त्या मुसलमान राष्ट्रानें प्लेवनाच्या वेढ्यांत रशियाला इतकें जेरीस आणलें कीं, त्याच्या त्या पराक्रमाचा डिंडिम तमाम दुनियेंत दुमदुमला ! याच प्रकाराची थोडीशी पुनरावृत्ति पुढें अँग्लो-अफगाण युद्धांत झाली. हिंदुस्थानाच्या वायव्येला, डिस्राएलीच्या सूचनेनुसार, शास्त्रीय सरहद्द निर्माण करण्याच्या हेतूनें, लिटननें अफगाणिस्थानाच्या कारभारांत केलेली ढवळाढवळ अंगलट येऊन, ब्रिटिश वकील सर लुई कॅव्हगनरी याच्या नेतृत्वाखालीं तिथें गेलेल्या शिबंदीची अफगाण सैन्यानें कत्तल केली. रूसो-टर्किश युद्धानें जसा युरोपियनांचा दरारा धुळीला मिळविला, तशी या अँग्लो-अफगाण युद्धानें ब्रिटिशांची दहशत खिळखिळी केली.

अशा या क्रांतिकारक परिस्थितींत 'इंग्रेजी भाषा,' 'डॉक्टर जान्सन,' 'मोरोपंताची कविता,' 'लोकहितवादी' व 'आमच्या देशाची स्थिति' हे मालेंतील पांच निबंध लिहिले गेलेले आहेत. त्यामुळें चिपळूणकरांच्या स्वाभिमानाची दीप्ति या निबंधांतून उत्तरोत्तर अधिक देदीप्यमान होत गेलेली दिसते. इंग्रजी भाषेवरील निबंध, विवेचनाच्या दृष्टीनें अत्यंत एकांगी असून, त्यांत त्या भाषेंतील ललित वाङ्मयाला

तर नुसता स्पर्शही केलेला नाहीं. मग वर्डस्वर्थ, बायरन, शेले यांच्या काव्यांची किंवा डिकन्स, थॅकरे, इलियट यांच्या कादंबऱ्यांची माहिती त्यांत कोठून आढळणार? मेकॉलेनंतर उदयाला आलेल्या अर्नोल्ड, बेजहॉट प्रभृति निबंधकारांचा किंवा मिलनंतर उदयाला आलेल्या रस्किन, स्पेन्सर प्रभृति तत्त्वज्ञांचाही निर्देश त्यांत सांपडत नाहीं. चिपळूणकरांचा इंग्रजी वाङ्मयाचा व्यासंग फक्त निबंध आणि इतिहास यांच्या पुरताच मर्यादित होता, असें या निबंधावरून निस्संशय म्हणतां येईल. किंबहुना, असेंही म्हटलें तरी शोभेल कीं, मालेच्या आठव्या अंकांत इंग्रज इतिहासकारांच्या दुर्मतध्वंसनाचें जें कार्य अपुरें राहून गेलें होतें, तें उरकून घेण्याच्या उद्देशानेंच, जणुं कांहीं, त्यांनीं मुद्दाम हा निबंध लिहिला. कारण, ब्रिटिश इतिहासकारांनीं आपल्या ग्रंथांतून पौरस्त्य राष्ट्रांविषयीं जीं पूर्वग्रहदूषित विधानें केलीं आहेत, त्यांच्या आवेशपूर्ण खंडनानेंच या निबंधाचा अर्धा अधिक भाग व्यापलेला दृष्टीस पडतो. त्यामुळें 'इतिहास' या निबंधापेक्षां कितीतरी अधिक खळबळ या निबंधानें उडवून दिली. इंग्रज इतिहासकारांच्या हिंदुस्थानाकडे पहाण्याच्या विकृत दृष्टिकोनाचें अत्यंत मर्मभेदक आविष्करण मालेच्या तिसाव्या अंकांत केलेलें होतें. हा अंक बाहेर पडतांच, मेजर जेकब यांनीं, 'एलिफास' या टोपण नांवानें, 'देशी वृत्तपत्रें व कारस्थानी ब्राह्मण' या सदराखालीं, 'बॉंबे गॅझेट' मध्यें एक पत्र लिहून, त्यांतील चार उताऱ्यांच्या भाषांतराचा नजराणा, नवीन पदवीधरांच्या राजनिष्ठेचा नमुना म्हणून, खुद्द प्रांताधिपतीच्या हुजुरास सादर केला. साहेबबहादुर एवढेंच करून थांबले नाहींत. त्यांच्या काकदृष्टीला मालेच्या या अंकांत जसा राजद्रोह दिसला, तसेंच त्याच्या मागें पुणेरी ब्राह्मणांचें कारस्थानही पण दिसलें. या कारस्थानाची परंपरा त्यांनीं आपल्या पत्रांत अशी लाविली कीं, निबंधमालेचा संपादक ब्राह्मण, ज्या शाळेंत तो शिक्षक आहे तिचा मुख्याध्यापक ब्राह्मण, ज्या मराठी भाषेंत माला निघते तिच्यांतील वृत्तपत्रांची हालहवाल (report)सर-

कारपर्यंत पोंचविणारा अधिकारी ब्राह्मण व ज्या पुणें शहरांत हा संपादक रहातो तें पुणें शहरही ब्राह्मणांचें इतिहासप्रसिद्ध आगर !—अशा स्थितींत या ब्राह्मण शिक्षकाच्या राजद्रोहाची दाद सरकारला लागावी कशी ? ही परंपरा लावण्यांत साहेबमजकुरांचा उद्देश, चिपळूणकरांबरोबरच त्यांचे वरिष्ठ, पूना हायस्कूलचे हेडमास्तर, महादेव मोरेश्वर कुंटे, त्यांचे वडील, रिपोर्टर ऑन दी नेटिव्ह प्रेस, कृष्णशास्त्री चिपळूणकर व पुण्यांतील एकंदर ब्राह्मणवर्ग या सर्वांनाच पर्यायानें राजद्रोही ठरवून,सार्वजनिक चळवळ दडपून टाकण्याचा सल्ला सरकारला देण्याचा होता.त्यामुळें मालेंत केलेला मल्हारराव महाराजांच्या पदच्युतीचा निषेध व तुर्कांच्या पराक्रमाचा गौरव यांचा बादरायण संबंध ते सार्वजनिक सभेशीं जोडावयालाही चुकले नाहींत. आणि, शेवटीं त्यांनीं सरकारला असा स्पष्ट इषारा दिला कीं, ब्राह्मण हा जन्मजात कारस्थानी असून, युरोपांतील कोणत्याही गुप्त कटांच्या जाळ्यांपेक्षां ब्राह्मणांची संघटना अधिक दृढतर आहे व तेच देशांतील सर्व अस्वस्थतेच्या मुळाशीं आहेत ! अशा रीतीनें ‘ बॉंबे गॅझेट ’ मधून निबंधमालेवर आग पाखडूनच न थांबतां, मेजरमहाशयांनीं तिच्या सबंध तिसाव्या अंकाचें इंग्रजी भाषांतरही सरकारला सुपूर्त केलें. त्याबरोबर शाळाखात्यापासून तों सेक्रेटरिएटपर्यंत सारी नोकरशाही आमूलाग्र हादरून गेली ! चिपळूणकरांचे विद्यालयीन गुरु रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे या सुमारास मुंबई सरकारचे चीफ सेक्रेटरी मि. गॉन यांच्याकडे कांहीं गाऱ्हाणें घेऊन गेले असतां, साहेबांनीं रागानें तणतणतच त्यांच्याजवळ असे उद्गार काढले कीं, “ पुण्यांतील कोणी ब्राह्मण पदवीधर कांहीं वर्तमानपत्र काढतो व त्यांत इंग्रज सरकारविषयीं वाईट साईट मजकूर छापतो. तुम्हां ब्राह्मणलोकांना विद्या शिकवून सरकारनें ज्या मोठमोठ्या हुद्याच्या जागा दिल्या, त्याचें हें फळ ! ” कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची तर ‘ एलिफास ’ च्या या शुंडाप्रहारानें फारच अनुकंपनीय स्थिति झाली.

त्यांच्यावर सहजच असा ठपका आला कीं, केवळ पुत्रप्रेमामुळें मालेंतील आक्षेपार्ह मजकूर सरकारच्या नजरेस आणून देण्याच्या आपल्या कर्तव्याला ते जागले नाहींत. परंतु, शास्त्रीबुवांची पुण्याई अद्याप पुरती निःशेष झालेली नसल्यामुळें, 'एलिफास'नें एवढें थैमान केलें तरीही, त्यांच्या प्रतिष्ठेला सरकारनें धक्का लावला नाहीं. तथापि, शाळाखात्यांत त्यांच्या हातच्या चिठीचपाटीला जो प्रमाणपत्राचा मान पूर्वीं मिळत असे, तो मात्र या प्रकरणामुळें मिळेनासा झाला. चिपळूणकरांचे कनिष्ठ बंधु लक्ष्मणराव हे यानंतर कांहीं दिवसांनीं, आपल्या वडिलांची चिठी घेऊन, चाटफील्ड यांच्याकडे नोकरी मागावयाला गेले असतां, डायरेक्टरसाहेब रागानें बिचाऱ्या अर्जदाराला म्हणाले कीं, "तुम्हां लोकांना सरकार विद्या शिकवितें, मोठमोठ्या नोकऱ्या देतें आणि त्याचें उसनें तुम्ही त्याच सरकारची निंदा करण्यासाठीं वर्तमानपत्रें लिहून फेडतां!" 'एलिफास'च्या या खोडसाळ पत्राला स्वतः चिपळूणकरांनीं 'ज्ञानप्रकाशां'-तून तावडतोब इंग्रजीमध्यें छोटेंसेंच पण समर्पक उत्तर दिलें; व मालेच्या तिसऱ्या वर्षाच्या उपसंहारांतही त्याचा थोडासा समाचार घेतला. शिवाय, त्यांचे सहाध्यायी रा. ब. महाजनि यांनीं, 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्रांत 'ब्राह्मण' या सहीनें पत्र लिहून, 'एलिफास'नें माला-कार आणि ब्राह्मणवर्ग यांच्यावर केलेल्या आरोपांचें मार्मिक खंडन केलें. परंतु 'एलिफास'ची ही सारी कारवाई कांहीं अगदींच फुकट गेली नाहीं. कारण, स. १८७७ सालच्या डिसेंबरांत चाटफील्डसाहेबांनीं, रत्नागिरीसारख्या गैरसोईच्या ठिकाणीं चिपळूणकरांची बदली करून, त्यांना अप्रत्यक्ष रीतीनें एक प्रकारची सौम्य शिक्षा केली.

'एलिफास'च्या पत्रानें उत्पन्न केलेल्या या वादळाचा चिपळूण-करांच्या मनोवृत्तीवर यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. किंब-हुना, यदाकदाचित् कांहीं झालाच असला, तर तो एवढाच कीं, सरकारी नोकरीबद्दल स्वभावतःच पराङ्मुख असलेलें त्यांचें

विरागी मन या प्रकारामुळें तिच्याविषयीं अजिबात विटून जाऊन, तें बंधन शक्य तितक्या लवकर तोडून टाकण्याचा विचार त्यांच्या मनांत उद्भूत झाला असावा. हिंवाळ्यांत जें बर्फ पडलें असतां मोठाले वृक्षसुद्धां अगदीं झडून वठून जातात, त्यानें आच्छादिलेल्या पर्वताच्या शिखरांना मात्र उलट एक प्रकारची गंभीर शोभा येते. चिपळूणकरांच्या मनाची सुद्धां या प्रसंगीं अशीच अवस्था झाली. शिवाय, या साऱ्या वादळांत त्यांना स्वतःला अनपेक्षित वाटावें, असें खरोखरी कांहींच नव्हतें. राजद्रोहाचा आरोप हा मुळीं निबंधमालेच्या पांचवीलाच पुजलेला होता. 'ज्ञानोदय,' 'सत्यदीपिका' वगैरे जीं पत्रें मिशनरींनीं किंवा बाबा पद्मनजींसारख्या त्यांच्या बगलबच्चांनीं चालविलेलीं होतीं, त्यांनीं मालेचा जन्म झाल्या दिवसापासूनच या आरोपाचें शस्त्र तिच्यावर उचललें होतें. हा आरोप करण्यांत त्यांचा हेतु उघडच असा होता कीं, आपल्या या हांकाटीमुळें बिथरून जाऊन सरकारनें मालेची इतिश्री करावी. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं काढलेली 'विचारलहरी' त्यांनीं पूर्वी याच उपायांनीं दडपून टाकली होती. परंतु, जन्मतांक्षणींच सूर्यबिंबावर झेंप घालणाऱ्या मारुतीचा अपराध जसा देवांनीं त्याच्या पित्याकडे पाहून पोटांत घातला, तशी सरकारनें, शास्त्रीबुवांचा ऋणानुबंध लक्षांत घेऊन, निबंधमालेंत आरंभापासूनच आविर्भूत झालेल्या देशाभिमानाची गय केली. तेव्हां, चिपळूणकरांना आपण कोणत्या परिस्थितींत वावरत आहों, याची पूर्ण जाणीव होती, यांत शंकाच नाहीं. किंबहुना, विचारस्वातंत्र्याचें धोरण त्यांनीं जाणूनबुजून अंगीकारिलेलें असल्यामुळेंच, तत्कालीन इतर ग्रंथकारांप्रमाणें, सरकारचा आश्रय आपल्या मालेला मिळावा, असा विचार चुकूनही कधीं त्यांच्या मनाला शिवला नाहीं; व माला सुरू झाल्यापासून तीन वर्षांच्या आंतच ते निर्वाहाचीं स्वतंत्र साधनें निर्माण करण्याच्या उद्योगाला लागले. अशा स्थितींत 'एलि-

फास ’च्या पत्राचा त्यांच्या मनावर किंवा मालेच्या स्वरूपावर काय परिणाम होणार ? तथापि, या प्रसंगामुळें त्रस्त झालेल्या आपल्या वडिलांच्या मनाला अधिक ताप होऊं नये म्हणूनच बहुधा, त्यांनीं जॉनसनच्या चरित्रासारखा सोज्वळ विषय या वर्षीं निबंधासाठीं निवडला. ‘एलिफास’च्या टीकेचें वादळ सभोंवतीं घोंघावत असतां त्यांनीं हा निबंध लिहिलेला असल्यामुळें, त्यांच्या मनांत त्या वेळीं घोळत असलेल्या विचारांचें त्यांत उत्कृष्ट प्रतिबिंब पडलेलें आहे. जॉनसन हा त्यांचा सर्वच दृष्टींनीं आवडता ग्रंथकार. मेकॉले हा जसा त्यांना लेखनाच्या, तसा जॉनसन हा जीवनाच्या बाबतींत आदर्श वाटत असे. मेकॉलेची लिहिण्याची शैली त्यांना अत्यंत प्रिय होती, ही गोष्ट खरी. पण, एकाद्या फुलाचे रंग कितीही मोहक वाटले, तरी त्याच्या उग्र दर्पानें जसें मन उमेखून जावें, तसें मेकॉलेच्या दुर्मतांमुळें त्यांचें मन त्याच्याविषयीं विटून गेलेलें होतें. परंतु, खाणींतील पाषाण बहुमोल धातुकणांनीं संपन्न असावा, त्याप्रमाणें जॉनसनच्या दोषांतही असे मोहक गुणांश मिसळलेले होते कीं, चिपळूणकरांना त्याच्या अवगुणांविषयींसुद्धां एक प्रकारचा आदर वाटत असे. वाङ्मयसेवेच्या बाबतींतील त्याची निरपेक्ष बुद्धि, कोणाच्याही आश्रयाची चाड न बाळगणारा त्याचा निःस्पृहपणा, दुरभिमानाच्या थरावर जाणारा त्याचा जाज्वल्य देशाभिमान, शास्त्रीय शोधांच्या आव्हानाला दाद न देणारी त्याची कडवी धर्मनिष्ठा व दारिद्र्यांतही कधीं न ढळलेलें त्याचें अकलंक चारित्र्य या त्याच्या गुणांविषयीं चिपळूणकरांना निरतिशय आदर होता; व त्या गुणांवर प्रकाश पाडणाऱ्या त्याच्या चरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांचें वर्णन त्यांनीं अत्यंत सहृदयतेनें केलें आहे. किंबहुना, हा त्यांचा निबंध वाचीत असतांना असा भास पुष्कळदां होतो कीं, जॉनसनच्या चारित्र्याचें शब्दचित्र रेखाटतांना चिपळूणकरांनीं स्वतःच्या स्वभावविशेषांचे उज्ज्वल रंग त्यांत न कळत भरलेले आहेत. कर्तबगार

मनुष्यानें आपल्या डोळ्यांपुढें ध्येय म्हणून ठेवलेल्या विभूतीचें चरित्र जर वर्णन केलें, तर त्या वर्णनांत त्याच्या स्वतःच्या मनःस्थितीचें प्रतिबिंब अजाणतां पडून जातें, म्हणतात. चिपळूणकरांचा जॉनसन-वरील निबंध हें याचें एक सुंदर उदाहरण आहे.

त्यांचा मोरोपंतांच्या कवितेवरील निबंध या निबंधाइतका सरस नाहीं. स. १८७८ सालीं मुद्रणनियंत्रणाचा कायदा बंधक झाल्यामुळें त्यांनीं, पूर्वीं योजून ठेविलेले इतर विषय मुद्दाम बाजूला सारून, हा निव्वळ वाङ्मय चर्चेचा विषय हातीं घेतला. मालेंतील विचा-रस्वातंत्र्याची तडफ कमी झाल्याबद्दल तक्रार करणाऱ्या एका चहात्याच्या पत्राला घातलेल्या उत्तरांत त्यांनीं असे उद्गार काढलेले आढळतात कीं, " माझ्या लेखणींतील जोम आणि जिव्हाळा जरी कमी झाल्यासारखा वाटत नसला, तरी १८७८ सालच्या नवव्या कायद्यानें माझ्या मनांत फार दिवस घोळत असलेल्या विषयांवर मला पाणी सोडावयाला लावलें, यांत शंका नाहीं." अर्थात् मनाच्या एक प्रकारच्या नाउमेदीच्या स्थितींत त्यांनीं हा निबंध लिहिलेला असल्यामुळें, त्यांच्या प्रतिभेचे आत्मीय गुण त्यांत अगदीं कमी प्रमाणांत प्रकट झालेले आहेत. रा. ब. दादोबा पांडुरंग यांचा केकावलीवरील टीकाग्रंथ वाचून, त्यांना वयाच्या पंध-राव्या वर्षींच, पंतांच्या कवितेची गोडी लागली होती. परंतु, मयूर कवीच्या वाणीवर त्यांची भक्ति जरी निरतिशय होती, तरी तिचा व्यासंग मात्र त्यांनीं, परशुरामपंत तात्या गोडबोले, शंकर पांडुरंग पंडित किंवा वामन दाजी ओक यांच्याप्रमाणें, निष्ठेनें केला होता, असें वाटत नाहीं. यशोदा–पांडुरंगीच्या रसाळ प्रस्तावनेंत दादोबांनीं मोरोपंतांच्या कवितेविषयीं जें मार्मिक विवेचन केलें आहे, त्यांतील मुद्यांचाच प्रपंच त्यांनीं आपल्या निबंधांतून विस्तारपूर्वक केलेला दिसून येतो. वस्तुतः, माधव चंद्रोबा यांच्या ' सर्वसंग्रह ' मासिकांतून पंतांच्या कवितेचीं बरींच प्रकरणें प्रसिद्ध झालेलीं होतीं; व तीं बार-

काईनें वाचून जरी त्यांनीं आपला निबंध सजविला असता, तरीसुद्धां त्यांच्या विवेचनाला पुष्कळच पूर्णता आली असती. पण तेवढीही काळजी त्यांनीं घेतली नाहीं. त्यामुळें, एकाद्या अफाट देशांतील शेलकीं ठिकाणें धांवत्या वाहनांतून पाहून त्याच्या एकंदर परिस्थितीविषयीं बांधलेलीं अनुमानें जशीं चुकावीं, तसा त्यांच्या या निबंधाचा प्रकार झाला आहे. विपर्यास, विसंगति, वितंडवाद, अतिशयोक्ति इत्यादि सारे दोष त्यांत दृष्टीस पडतात. भाषा बोजड व रचना बेडौल आहे, माहिती अपूर्ण व विवेचन असंबद्ध आहे आणि टीका उथळ व मतें अपरिपक्व आहेत. या निबंधाचा उद्देश पंतांच्या कवित्वगुणाचें यथाथ स्वरूप विशद करण्याचाच मुख्यतः होता. पण, तो उद्देश बाजूला राहून, रानडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर प्रभृति पंत-कवितेच्या दूषकांना दूषणें देण्यांतच निबंधाचा अर्धा अधिक भाग खर्ची पडला आहे. त्यांच्यावरील टीकेचा हा पाल्हाळ पाहिल्यावर असें वाटल्याशिवाय रहात नाहीं कीं, रानडेप्रभृति सुधारकांनीं ज्या विषयावर पूर्व पक्ष केला त्याच्यावर उत्तर पक्ष करण्याच्या लालसेनेंच बहुधा चिपळूणकरांनीं हा विषय चर्चेला घेतला असावा. किंबहुना, ज्या ॲक्टच्या प्रभावानें हजारों लेखण्या भयस्तब्ध होऊन बोथाटून गेल्या, त्यानें आपल्या लेखणीची प्रखरता मात्र यत्किंचितही कमी झालेली नाहीं, ही गोष्ट लोकांच्या प्रत्ययाला आणून देण्यासाठींच जणुं कांहीं, त्यांनीं, रानडे यांच्या लेखांतील ‘ कलाकृति ’ (Work of art) या शब्दांचें ‘ चित्रकाव्य ’ असें विपर्यस्त भाषांतर करून, त्यांच्यावर अप्रस्तुत टीकेचा इतका कडाका उडविला !

परंतु, चिपळूणकरांचा हा निबंध कितीही सदोष असला, तरीं त्यानें तत्कालीन सुशिक्षितांच्या जुन्या मराठी कवितेकडे पहाण्याच्या बुद्धींत क्रांति घडवून आणली, यांत संशय नाहीं. एक तर, प्राचीन मराठी कवितेचें आणि तिच्या एका धुरीणाच्या, समाजांतील विशिष्ट वर्गाच्या उपहासाचा विषय होऊन बसलेल्या, अभियुक्त कृतींचें यथार्थ

स्वरूप विशद करणारा अशा तऱ्हेचा वक्तृत्वपूर्ण निबंध पूर्वी कोणीही लिहिलेला नव्हता; व दुसरें असें कीं, या निबंधाच्या रूपानें त्यांनीं सुरू केलेल्या मराठी कवितेविषयींच्या चर्चेत गणेशशास्त्री लेले, बापूसाहेब कुरुंदवाडकर, जनार्दन बाळाजी मोडक, वामन दाजी ओक, काशिनाथ पांडुरंग परब, केशवराव कानेटकर यांच्या सारख्या मार्मिक रसज्ञांनीं भाग घेतल्यामुळें, जरी त्यांच्या विवेचनांतील कांहीं वैगुण्यें उघडकीला आलीं, तरी सतत अडीच वर्षे चाललेल्या या साहित्य-सत्रामुळें जुन्या मराठी कवितेकडे लोकांचें चित्त जोरानें वेधलें गेलें. आणि, ॲडिसनच्या लेखमालेनें जसें मिल्टनच्या कविकीर्तीवरील विस्मरणाचें पटल बाजूला सारून तिचें रमणीय स्वरूप व्यक्त केलें, त्याप्रमाणें चिपळूणकरांच्या या पंतांवरील प्रचंड निबंधानें मराठी कवितेची थोरवी लोकांच्या निदर्शनाला आणून दिली. मयूरकवीच्या वाणींत जरी कदाचित् असावी तितकी माधुरी नसली, तरी त्याचा रचनाकलाप आणि त्याहीपेक्षां त्याच्या प्रतिभेचें लास्य हीं एकाहून एक रम्यतर आहेत, ही गोष्ट जर महाराष्ट्राच्या प्रत्ययाला कोणीं प्रथम आणून दिली असेल, तर ती चिपळूणकरांनींच. तत्कालीन सुशिक्षितांत पंतांविषयीं जो अनादर होता, तो या निबंधानें नाहींसा होऊन त्यांची कविता हळुहळू लोकप्रिय होऊं लागली. ही लोकप्रियता कालांतरानें इतकी वाढली कीं, राजारामशास्त्री भागवतांसारख्या चिकित्सक पंडितालाही कालिदासाबरोबर पंतांची तुलना करणें योग्य वाटलें. परंतु, आज शांत मनानें विचार केल्यावर असें वाटतें कीं, चिपळूणकरांचा तो निबंध जितका उथळ होता, तितकीच ती लोकप्रियतेची ऊर्मि आणि रसिकतेची उचंबळही उथळ होती. पंतांच्या कवितेचा आत्मा चमत्कृति हा असून, शब्दार्थांच्या नानाविध चमत्कारांनीं त्यांचीं काव्यें गजबजलेलीं आहेत. भाविक मनाला हलवून सोडणारी किंवा जिज्ञासु बुद्धीला चिंतनाची स्फूर्ति देणारी भावनांची उत्कटता किंवा उदात्तता त्यांच्या कवितेंत

फारशी नाहीं. त्यांची केकावलि वाचतांना अंतःकरणाला अगदीं पाझर फुटतो, असें चिपळूणकरांनीं म्हटलें आहे. परंतु, त्या काव्यांतही भक्तिप्रेमाच्या स्वाभाविक उमाळ्याऐवजीं कोटिक्रमाचें अर्थगौरवच अधिक आढळतें. या श्लोककेकावलीपेक्षां स्वतः पंतांनीं लिहिलेली आर्या-केकावलि किती तरी जास्त हृदयस्पर्शी आहे! तुकोबांच्या भावमधुर अभंगांबरोबर मयूराच्या या कोटिबहुल केकांची तुलना करणें तर सर्वथैव अनुचित होईल. पंतांचें आर्याभारत रसाविर्भावाच्या आणि रचनासौंदर्याच्या दृष्टीनें मुक्तेश्वरी भारतापुढें फिकें पडतें. त्यांच्या कवितेचें खरें महत्त्व भाषेच्या दृष्टीनें आहे, रसाच्या दृष्टीनें नव्हे. संस्कृत-प्रचुर प्रौढ रचना करून त्यांनीं मराठी भाषेला शिष्ट आणि सुसंस्कृत रूप दिलें. शुद्ध आणि सुश्लिष्ट रचना करण्याबद्दल इंग्रजींत जसा पोप तसे मराठींत पंत हे सर्वश्रेष्ठ कवि असून, ड्रायडन आणि पोप यांच्या कवितेनें इंग्रजी भाषेवर जे उपकार केले, तेच पंतांच्या कवितेनें मराठी भाषेवर केले, असें म्हटलें तरी शोभेल. त्यांच्या वाङ्मयक्षेत्रांतील कामगिरीचे हे विशेष चिपळूणकरांनीं दाखविलेले नाहींत. तथापि, त्यांच्या या मोरोपंतांवरील निबंधांतलें विवेचन जरी एकांगी आणि सदोष असलें, तरी त्यानें घडवून आणलेलें मतपरिवर्तन इतकें महत्त्वाचें आहे कीं, त्यांच्या क्रांतिकारक लेखणीच्या प्रभावाचें तो एक उत्कृष्ट स्मारक समजला जाईल.

## ४

चिपळूणकरांची बदली करितांना चाटफील्डसाहेबांची अपेक्षा बहुधा अशी असावी कीं, रत्नागिरीसारख्या दूरच्या शांत ठिकाणीं गेल्यामुळें त्यांच्या मनोरचनेंत सरकारी नोकरीला अनुरूप असा फरक घडून येईल. परंतु, तसें कांहीं न होतां, उलट तिथें गेल्यावर भरपूर एकांत लाभून, त्यांना आपल्या भावी धोरणाचें स्वरूप निश्चित करितां आलें.

शिक्षणव्यवसायाविषयीं जरी चिपळूणकरांना एक प्रकारचें प्रेम वाटत असे, तरी सरकारी नोकरीचा मात्र त्यांना स्वभावतःच तिटकारा होता; व अनायासें घरीं चालत आलेली शाळाखात्यांतील नोकरी जी त्यांनीं पत्करली, ती मुख्यतः याच भावनेनें कीं, तिच्यामुळें आपल्याला जरूर तें स्वास्थ्य प्राप्त होऊन, फुरसतीचा मुबलक वेळ वाङ्मयसेवेंत घालवितां येईल. आणि ही त्यांची समजूत कांहीं चुकीची नव्हती. शिक्षण आणि साहित्य हीं वस्तुतः एकाच ज्ञानोपासनेचीं दोन अंगें असल्यामुळें तीं एकमेकांना पूरक असावीं, असेंच कोणीही म्हणेल; व स्वतंत्र राष्ट्रांतून शिक्षणखातें हें साहित्याच्या संवर्धनाला हातभार लावित असलेलेंच नेहमीं आढळून येतें. किंबहुना अव्वल इंग्रजी अमदानींत शाळाखात्याची भूमिका ही साहित्याच्या आश्रयदात्याचीच होती. सदाशिव काशिनाथ छत्रे यांच्यापासून तों कृष्णशास्त्री चिपळूणकरांपर्यंत त्या काळांतील बहुतेक लेखक शाळाखात्यांत नोकर होते; व त्यांच्या ग्रंथांना त्या खात्यानें आश्रयही भरपूर दिला. नियुक्त मेषपातृत्वाखेरीज दुसरें कांहीं शिक्षकानें करितां कामा नये, ही शिस्त शाळाखात्याला अद्याप लागावयाची होती. त्यामुळें चिपळूणकरांनीं विश्वस्त बुद्धीनें त्या खात्यांत प्रवेश केला. पण, त्यानंतर चार वर्षांच्या आंतच शाळाखात्याचें स्वरूप इतकें बदलून गेलें कीं, स. १८७४ सालीं निबंधमाला आपल्या नांवावर ज्या चिपळूणकरांनीं निःशंक मनानें सुरू केली, त्यांनाच पुढें ‘ काव्येतिहाससंग्रहा– ’ वर आपलें नांव घालणें इष्ट वाटलें नाहीं. या परिवर्तनाबद्दल जरी चिपळूणकरांच्या विचारांची प्रखरताच बव्हंशीं जबाबदार असली, तरी शाळाखात्यांतील त्यांच्या नोकरीला मुहूर्त एकंदरींत चांगला लागला नव्हता, एवढी गोष्ट मात्र निश्चित. त्यामुळें, चाटफील्डसाहेबांनीं मुद्दाम सुखाची म्हणून दिलेली नोकरी त्यांच्या मनस्तापाला कारण होऊन, शाळाखात्याविषयीं त्यांच्या मनांत कायमची शिसारी उत्पन्न झाली.

चिपळूणकरांचें मन शाळाखात्याविषयीं इतकें विटावयाला त्यांच्या

स्वतःच्या स्वभावाइतकेंच, त्यांचे वरिष्ठ, पूना हायस्कूलचे मुख्याध्यापक, महादेव मोरेश्वर कुंटे यांचें थिल्लर वर्तनही कारण झालें. ज्या मनुष्याच्या हाताखालीं आपल्याला काम करावयाचा प्रसंग येतो, त्याच्याविषयीं जर आपले पूर्वग्रह अनुकूल नसले, तर भावी वैमनस्याची भूमिका आगाऊच तयार होऊन बसते. कुंटे यांच्या बाबतींत चिपळूणकरांचा असाच प्रकार झाला. कुंटे स्वतः कोल्हापूरहून पुण्याला येण्यापूर्वींच त्यांच्या अप्रयोजकपणाचा दुर्लौकिक तिथें येऊन पोंचला होता; व पूना हायस्कूलवर त्यांची नेमणूक होऊन ते पुण्याला आल्यावर तर त्यांचा विक्षिप्तपणा हा वर्तमानपत्रांच्या कुचाळीचा नित्याचा विषय होऊन बसला. त्यांची पोरकट वागणूक, पाल्हाळिक वक्तृत्व आणि पोकळ वल्गना यांची पुण्यासारख्या वावदूक शहरांत कुचेष्टा झाली नसती, तरच नवल. त्यांच्या 'राजा शिवाजी' या वीररसप्रधान काव्याचे पहिले दोन सर्ग, ते कोल्हापुरास असतांना स. १८६९ सालीं, प्रसिद्ध झाले होते. या काव्याची दक्षिणा प्राइझ कमिटीनें जरी सढळ हातानें संभावना केली होती, तरी तिच्या इंग्रजी प्रस्तावनेंत कुंटे यांनीं आपण कांहीं तरी अचाट कवित्व करित असल्याच्या अभिनिवेशानें, पंत-पंडितादि जुन्या कवींवर जे कोरडे उडविले होते, त्यामुळें पुष्कळ रसिकांचीं मनें दुखावलीं गेलीं होतीं. पुण्यास आल्यावर स. १८७२ सालीं कुंटे यांनीं 'मन' हें तात्त्विक काव्य प्रकाशित केलें. त्यावर चिपळूणकरांनीं, 'कविमहाशय तत्त्वज्ञानांत शिरले (A poet turned a philosopher)' या मथळयाखालीं, 'ज्ञानप्रकाशां'त विस्तृत इंग्रजी टीका लिहून, त्यांच्या ग्राम्य रचनाशैलीची चांगलीच शोभा केली. अशा रीतीनें, कुंटे यांच्या हाताखालीं प्रत्यक्ष काम करण्याचा योग येण्यापूर्वींच, चिपळूणकरांचें मन, पुण्यांतल्या तत्कालीन इतर अनेक सुशिक्षितांप्रमाणें, त्यांच्याविषयीं सकारण कलुषित झालेलें होतें. शिवाय, पूना हायस्कुलांत त्यांची नेमणूक करितांनाही कुंटे यांनीं आपल्या स्वभावानुसार थोडासा आच-

रटपणा केलाच. वस्तुतः, चिपळूणकरांना नोकरी मिळाली, ती चाटफील्डसाहेबांच्या शास्त्रीबुवांवरील लोभामुळें. स. १८७२ सालीं चाटफील्डसाहेब हे, रिपोर्टरच्या कचेरीला भेट देण्यासाठीं, शास्त्रीबुवांच्या घरीं आले असतां, बोलण्याच्या ओघांत त्यांचा थोरला मुलगा बी. ए. झाला असल्याचें साहेबांना कळलें. त्याबरोबर त्यांनीं साहजिकच शास्त्रीबुवांना विचारलें, "मग मुलगा नोकरी कां धरीत नाहीं ?" त्यावर शास्त्रीबुवांनीं असा खुलासा केला कीं, "तो तूर्त एम. ए.चा अभ्यास करित असल्यामुळें नोकरीच्या बाबतींत अद्याप त्याचा कांहीं निश्चय झालेला नाहीं." ही गोष्ट चाटफील्डसाहेबांच्या लक्षांत होती. म्हणून, स. १८७३ सालच्या आरंभीं पूना हायस्कुलांत दुय्यम शिक्षकाची जागा रिकामी होतांच, त्यांनीं, शास्त्रीबुवांना संतुष्ट करण्याच्या हेतूनें, चिपळूणकरांना त्या जागेवर नेमण्याची सूचना कुंटे यांना केली. अशा तऱ्हेची वस्तुस्थिति असतांना, कुंटे यांनीं चिपळूणकरांना बोलावून आणून, चाटफील्डसाहेबांच्या शिफारशीचा यत्किंचितही सुगावा लागूं न देतां, त्यांना असें सांगितलें कीं, "आमच्या शाळेंत शिक्षकाचें काम करण्याची जर तुमची इच्छा असेल, तर रिकाम्या झालेल्या जागेसाठीं मी डायरेक्टरसाहेबांकडे तुमची शिफारस करितों !" विनीत श्रीमंतानें सोडलेला गुप्त दानाचा संकल्प अंमलांत आणतांना त्याच्या घमेंडखोर गुमास्त्यानें, जणुं आपणच स्वतः तें दान देत आहों, असा आव आणून आपल्याकडे आलेल्या गरजू माणसाला लाजवावें, त्यांतलाच हा प्रकार झाला. पुढें, चिपळूणकरांना, आपल्यावरील या उपकाराचा उगम खरोखरी कोठून झालेला होता, हें कळल्यावर कुंटे यांच्या या शिष्टपणाविषयीं त्यांच्या मनांत जर तिटकारा उत्पन्न झाला असला, तर त्यांत दोष कोणाचा ?

तथापि कुंटे यांच्या शाळेंतील वरिष्ठपणाच्या नात्याला मात्र आपल्या या पूर्वग्रहांचा ढका चिपळूणकरांनीं सहसा लागूं दिला नाहीं. पण, खुद्द त्यांच्या ठिकाणींच आपला बोज सांभाळण्याची पात्रता नव्हती, याला

काय करणार ? वरिष्ठपणाचा अधिकार हा असा आहे कीं, त्याच्याविषयीं इतरांना आदर वाटावयाला निग्रहानुग्रहाच्या सामर्थ्यापेक्षांही वृत्तीच्या गांभीर्याची आवश्यकता अधिक असते. नाहीं तर, आकाशांत तरंगणारा दिवा जरी कांहीं काळ ताऱ्यासारखा भासला, तरी वाऱ्याच्या झुळकेबरोबर त्याची ज्योत कमी अधिक होतांना पाहून जशी त्याच्या खऱ्या स्वरूपाची कल्पना येते, तसा अधिकारामुळें प्रतिष्ठेला चढलेल्या मनुष्याचा दरारा, त्याच्या वर्तनांतील थिल्लरपणा लक्षांत येतांच, कमी होतो. कुंटे यांना समाजांतील मान्य व्यक्तींविषयीं तुच्छतेनें बोलण्याची खोड होती. स्वाभिमान हा जितका आंतल्या गांठीचा असतो, तितकीच घमेंड ही सैल जिभेची असते. त्यामुळें घमेंडखोर माणसाच्या वल्गना इतरांच्या निंदेशिवाय बहुधा पुऱ्या होत नाहींत. कुंटे यांनीं शाळेंतील इतर शिक्षकांच्या देखत, कोणत्याही प्रकारचें कारण नसतां, चिपळूणकरांच्या तोंडावर त्यांच्या वडिलांची एक दोनदां अगदीं अप्रशस्त अशी कुचाळी केली. त्यांच्या हातून ही आगळीक बुद्धिपुरःसर घडली, असें नव्हे. किंबहुना ते स्वतः दुसऱ्याच क्षणीं ती गोष्ट कदाचित् विसरूनही गेले असतील. पण, कुंटे हे जितके भडभड्ये, तितकेच चिपळूणकर हे खोल होते. खोल मनाचीं माणसें क्वचितच खुनशी नसतात. जणुं कांहीं, अथांग डोहाचा आसरा घेणाऱ्या सुसरींप्रमाणें, कटु प्रसंगांच्या स्मृति खोल मनांत कायमचा दबा धरून बसतात. चिपळूणकरांचें मन या पितृनिंदेमुळें बेसुमार दुखावलें गेलें; व त्याचा परिणाम लवकरच त्या उभयतांच्या शाळेंतील संबंधांवर झाला. चिपळूणकरांना शिस्तीचें अवधान असावें तितकें नव्हतें. शालापत्रक किंवा निबंधमाला चालविण्याच्या बाबतींत ज्या प्रकारचा अव्यवस्थितपणा त्यांच्या हातून घडला, त्यापेक्षां जास्त चालढकल शाळेच्या कामाच्या बाबतींत त्यांच्या कडून होत असे. सकाळच्या वेळीं घरीं लिहिण्यावाचण्याच्या कामांत ते गढलेले असले, म्हणजे शाळेंत जावयाला त्यांना पुष्कळदां उशीर व्हावयाचा; व तिथें गेल्यावर पहिला

तास सुट्टीचा सांपडून, त्यांना तेथील ग्रंथसंग्रहांत रमण्याची संधि मिळाली, म्हणजे तर घंटेकडे दुर्लक्ष करूनही त्यांची स्वारी वर्गांत उशिरां हजर व्हावयाची ! वस्तुतः विद्यार्जनाइतकीच विद्यादानाचीही हौस त्यांना होती. पण, ते बोलून चालून दुय्यम शिक्षक असल्यामुळें, खालच्या वर्गांतील अप्रबुद्ध मुलांना शिकविण्याचीच पाळी त्यांच्यावर येत असे. अशा स्थितींत, शाळेंतील कामाविषयीं निरुत्साह वाटून जर त्यांच्या हातून निष्काळजीपणा घडला असला, तर त्यांत नवल कसलें ? त्यांची विद्वत्ता लक्षांत घेऊन तिचा उपयोग जर कुंटे यांनीं शाळेच्या कामीं कुशलतेनें करून घेतला असता, तर कदाचित् त्या दोघांमधील वैमनस्य इतकें विकोपाला गेलें नसतें. पण त्यांना तें सुचलें नाहीं. उलट, चिपळूणकरांच्याही ठिकाणीं हेडमास्तरांनीं या बाबतींत गाजविलेली, रास्त म्हणतां येईल अशी, अरेरावी सहन करण्याचा समंजसपणा नव्हता. जॉनसनच्या चरित्रांतील असलाच एक प्रसंग वर्णन करितांना त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं, "...त्यानें एका शाळेंत चाकरी धरिली. ही शाळा खाजगी होती; व हींत जॉनसन हा दुय्यम म्हणून राहिला; व शाळेच्या अध्यक्षाचें व याचें कधींही न पटल्यामुळें त्यानें ती जागा लवकरच त्रासानें सोडून दिली. शाळेचे सरमास्तर स्वभावानें मोठे गर्विष्ठ व तिस्मारखान होते. त्यांचा हिशोब असा होता कीं, या दुय्यमाला आम्ही मोठी मेहरबानी करून अन्नाला लावला आहे, तेव्हां आमचा मोंगलाई अंमल यानें निमूटपणें मान खालीं करून सोसला पाहिजे. पण जॉनसन कसचा ? जो पुढें ऑसबोर्न याच्या डोक्यांत त्याचेंच एक भलें मोठें बुक पाहून घालायाला चुकला नाहीं, व ज्यानें चेस्टरफील्ड सारख्याचीही पर्वा ठेवली नाहीं, तो यःकश्चित् शाळामास्तराला विचारतो काय ? त्यानें खाडदिशीं चाकरीला लाथ मारली." हे त्यांचे उद्गार, कुंटे यांच्या बाबतींतील, त्यांच्या स्वतःच्या मनोवृत्तीचे निदर्शक आहेत, असें कोण म्हणणार नाहीं ?

चिपळूणकरांनींही, शाळाखात्यांतील शिस्तीचा जाच दुःसह झाल्या-मुळें, अखेर, जॉनसनप्रमाणें, नोकरीला लाथ मारली. वस्तुतः, तो काळ नोकरींत राहून देशसेवा करण्याचा होता; व तत्कालीन धुरंधर मुत्सद्दी न्या. रानडे यांची मोठी तारीफ ही समजली जात असे कीं, सारें आयुष्य सरकारी नोकरींत घालवून त्यांनीं राजकीय चळवळीचीं सूत्रें हलविलीं. वासुदेव बळवंत फडके यांचा एक अपवाद सोडला, तर देशकार्यासाठीं नोकरीचें बंधन तोडण्याची आवश्यकता मनाला जाणवल्याचें उदा-हरण त्या काळांत दुसरें क्वचितच सांपडेल. आणि त्यांत फारसें आश्चर्यही नाहीं. राजकर्त्यांचे आणि आपले हितसंबंध एक नाहींत, ही गोष्ट जरी लोकांच्या प्रत्ययाला दिवसेंदिवस तीव्रतेनें येत होती, तरी राज्यकर्त्यांचा अंतिम उद्देश केवळ आपलें कल्याण कर-ण्याचाच आहे, या कल्पनेचा पगडा त्यांच्या मनावरून उडालेला नव्हता. किंबहुना, आपली उन्नति करण्यासाठींच ईश्वरानें इंग्लंड आणि हिंदुस्थान यांचा हा अशा प्रकारचा संबंध जुळवून आणला आहे, ही कल्पना त्या वेळच्या पुढारी समजल्या गेलेल्या कर्त्या पुरुषांच्याही बुद्धींत भिनून गेलेली होती. लोकहितवादी आणि रानडे यांचें सारें राजकीय तत्त्वज्ञान या कल्पनेवर अधिष्ठित झालेलें होतें. त्यामुळें राज-सेवा व तिच्या अनुषंगानें मिळणारी प्रतिष्ठा हीं पुढारीपणाचीं लक्षणेंच होऊन बसलीं होतीं. परंतु चिपळूणकरांचे विचार मात्र या बाबतींत अगदीं निराळे होते. निबंधमालेच्या चवथ्या वर्षाच्या समारोपांत त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

“ गेल्या सहा वर्षांच्या अनुभवावरून आम्हांस एका तत्त्वाचा पक्का बोध झाला आहे कीं, लोकोपयोगार्थ ज्यास ग्रंथरचना करणें असेल, किंबहुना लोककल्याणाविषयीं केवळ वाग्डंबर मिरवायाचें नसून हातून जर कांहीं कृति करायाची असेल, तर त्यास मुख्य गोष्ट स्वतंत्रता ही पाहिजे. पारतंत्र्याच्या व्यवसायांत ऐन

उमेदीचें वय व दर एक दिवसांतील बहुतेक भाग घालवून, बाकी राहिलेलें वय व काळ ज्ञानसंपादनाकडे किंवा लोकहितार्थ उद्योग करण्याकडे लावून कितीसा उपयोग होणार ? शिवाय, स्वातंत्र्य हें, आपले विचार निर्धास्तपणें प्रगट करण्यास व हवें तें काम हातीं घेण्यासही, अत्यंत आवश्यक होय. या स्वातंत्र्याची अलीकडील बादशाही अंमलांत तर किती जरूरी आहे, हें बहुधा कोणासही सांगावयास नको."
त्या वेळच्या इतर पुढाऱ्यांहून देशसेवेच्या बाबतींतील चिपळूणकरांची मनोवृत्ति आणि मतें हीं किती भिन्न होतीं, हें या उद्गारांवरून स्पष्ट कळून येतें. इंग्रजी राज्य ही इतरांना इष्टापत्ति वाटत होती; व त्यामुळें त्या राज्ययंत्राचें आपण घटक होऊन बसल्यानें आपल्या देशसेवेंत कांहीं उणेपणा येतो, अशी शंकाही बहुधा त्यांच्या मनाला कधीं शिवली नसावी. मनाच्या, बुद्धीच्या आणि शरीराच्या सर्व शक्ति देशसेवेच्या धुरेला जुंपून आयुष्याचा प्रत्येक क्षण देशकार्यांत व्यतीत करण्याचें ध्येय अद्याप उदित झालेलें नव्हतें. त्या दिव्य ध्येयाचा साक्षात्कार महाराष्ट्रांत प्रथम चिपळूणकरांच्या प्रतिभेला झाला. कोणत्याही अभिनव कल्पनेचें दर्शन किंवा स्फुरण मनाला घडावयाला संस्कार आणि स्वभाव यांची अनुकूलता लागत असते. इंग्रजी राज्यकर्त्यांच्या संस्कृतीविषयीं ज्या प्रकारचा आदर आणि त्यांच्या सत्प्रवृत्तीविषयीं ज्या प्रकारचा विश्वास त्या काळच्या इतर पुढाऱ्यांना वाटत असे, त्या प्रकारचा आदर आणि विश्वास चिपळूणकरांना कधींच वाटला नाहीं. ज्या ऐतिहासिक वातावरणांत त्यांच्या प्रतिभेचा विकास झाला होता, तें वातावरण अशा तऱ्हेच्या भावनांच्या परिपोषाला सर्वथैव प्रतिकूल होतें. आपण त्याच व्यक्तीला किंवा समाजाला आपले उद्धारक समजावयाला तयार होतों कीं, ज्याच्या मनाचें आणि बुद्धीचें ऐश्वर्य हें स्वतःच्या संस्कृतीहून आपल्याला श्रेष्ठ वाटतें. पण, पाश्चात्य संस्कृति ही आपल्या संस्कृतीहून उच्च आहे, असें चिपळूणकरांना

कधींही वाटलें नाहीं. किंवा, राजकर्त्यांनीं ज्या भौतिक सुधारणा, वस्तुतः स्वतःच्या सत्तेचे पाश दृढतर करण्यासाठीं म्हणून, देशांत घडवून आणल्या होत्या, त्या खरोखरी केवळ आपल्या प्रगतीसाठींच करण्यांत आलेल्या आहेत, असें मानण्याइतकीही त्यांची बुद्धि भाबडी नव्हती. उलट, इंग्रजी अंमलापासून इतर फायदे कितीही झालेले असले, तरी त्यामुळें घडलेली स्वातंत्र्याची हानि ही इतकी अघोर आणि इतकी अपरिमित आहे कीं, लक्षावधि दिव्यांचा लखलखाट ज्याप्रमाणें सूर्याच्या संजीवक प्रकाशाची उणीव भरून काढूं शकत नाहीं, त्याप्रमाणें त्या भौतिक सुधारणा नष्ट झालेल्या स्वतंत्रतेची भरपाई करूं शकत नाहींत, अशी त्यांच्या मनाची खात्री होऊन चुकली होती. अर्थात्, जी हानि इतकी दारुण कीं, तिच्यामुळें अखिल मानवजातीला गुरुस्थानीं असलेल्या आपल्या प्राचीन संस्कृतीचा तेजोभंग झाला आणि अवघ्या शंभर वर्षांपूर्वीं उत्कर्षाच्या शिखराला चढलेलें आपलें पराक्रमी राष्ट्र नामशेष होऊन गेलें, त्या हानींतून--त्या पारतंत्र्याचा दुर्गतींतून--आपल्या धर्माचा आणि समाजाचा उद्धार करण्यासाठीं आपण कितीही स्वार्थत्याग केला, कितीही प्रयत्न केले, तरी ते थोडेच होतील, असें जर त्यांच्या मनाला वाटलें असलें, तर त्यांत काय आश्चर्य ? चिपळूणकर आणि त्या वेळचे इतर पुढारी यांच्या मनोवृत्तींत आणि मतांत जर कुठें फरक असेल, तर तो इथेंच. त्यामुळें, त्या पुढाऱ्यांना जें कार्य राज्यकर्त्यांचे हस्तक राहूनही करितां येईल असें वाटलें, राजसेवेंत आयुष्यांतील उमेदीचा सारा काळ घालवून उरलेल्या वेळांतही साधतां येईल असें वाटलें, तें देशकार्य हातीं घेण्यासाठीं, तें कार्य मनःपूर्वक करावयाला जरूर असलेली स्वतंत्रता मिळविण्यासाठीं, नोकरीचें बंधन झुगारून देण्याची आवश्यकता चिपळूणकरांना वाटली.

मात्र नोकरी सोडण्याचा हा आपला निर्धार त्यांनीं अविचारानें अंमलांत आणला नाहीं. तो निश्चय तडीस नेण्यापूर्वीं, रा. ब. महाजनि यांनीं म्हटल्याप्रमाणें, त्यांनीं आपल्या सामर्थ्याचा

अंदाज केला, आपल्या पायांवर उभें रहाण्याची पूर्व तयारी केली. स्वार्थत्यागाला जर विवेकाची जोड नसेल, तर त्याच्यापासून विधायक कार्य घडूं शकत नाहीं; व अविचारानें केलेलें साहस हें अखेर उपहासाला कारण होतें. साहस आणि स्वार्थत्याग हे जरी गुण मानले जात असले, तरी त्यांची गुणवत्ता निरपेक्ष नाहीं. विजेच्या स्फुरणाची दृष्टीला दिपविणारी चमक जशी त्या गुणांच्या आविर्भावांत असते, तसाच योग्य बंधनाच्या अभावीं वायां जाण्याचा किंवा विध्वंस करण्याचा तिचा अवगुणही पण त्यांच्या ठिकाणीं असतो. नोकरीला लाथ मारण्याचा चिपळूणकरांचा साहसी स्वार्थत्याग इतका यशस्वी व्हावयाला तरी त्यांचें व्यवहारचातुर्यच खरोखरी कारण झालें. स्वार्थत्याग म्हणजे आपल्या जीविताची केवळ नासाडी करून घेणें नव्हे : तर स्वतःच्या सर्व शक्तींची जोपासना साक्षेपानें करून आवडत्या ध्येयाच्या सिद्धतेसाठीं त्यांचा अविरत उपयोग करणें. दिवा हा आपल्या तेजानें भोंवतालचा प्रदेश प्रकाशित करितो खरा. पण केव्हां ? तर तो स्वतः सदैव स्निग्ध राहील तेव्हां. त्या दृष्टीनें, चिपळूणकरांनीं नोकरी सोडण्यापूर्वीं निर्वाहाचीं इतर साधनें उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला, यांत त्यांना कोणत्याही प्रकारचा कमीपणा नसून, उलट तो त्यांचा गुणच मानला पाहिजे. या उद्योगांतील त्यांचे प्रमुख सहकारी शंकर तुकाराम शाळिग्राम हे होते. ते मराठ्यांच्या इतिहासाचे मोठे अभिमानी असून, त्यांना लावण्या, पोवाडे, बखरी वगैरे ऐतिहासिक वाङ्मयाचा संग्रह करण्याचाही नाद होता. चिपळूणकरांच्या आणि त्यांच्या स्नेहाचा आधार मुख्यतः त्यांचें हें इतिहासप्रेमच होय. त्यांच्या संशोधनप्रियतेला प्रकाशनाचें क्षेत्र मिळवून देण्याची संधि चिपळूणकरांना लवकरच लाभली. स. १८७७ सालच्या मे महिन्यांत, चिपळूणकरांचे विद्यालयबंधु काशीनाथ नारायण साने आणि जनार्दन बाळाजी मोडक हे त्यांना भेटावयाला आले असतां,

'काव्येतिहाससंग्रह' काढण्याची कल्पना निघाली; व त्यांतील बखरींचा भाग साने, मराठी कवितांचा मोडक आणि संस्कृत ग्रंथांचा चिपळूणकर यांनीं संपादन करावा असें ठरून, शाळिग्राम यांच्यावर ऐतिहासिक वाङ्मयाचें संशोधन करण्याचें काम सोंपविण्यांत आलें. या योजनेनुसार, स. १८७८ सालच्या जानेवारींत, म्हणजे चिपळूणकर रत्नागिरीला आपल्या कामावर रुजू झाले त्या महिन्यांत, 'संग्रहा'चा पहिला अंक निघाला. या नव्या मासिकावर, शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांचा मालेवरील रोष लक्षांत घेऊन, चिपळूणकरांनीं आपलें नांव घातलें नव्हतें. 'काव्येतिहाससंग्रहा'च्या बरोबरच 'चित्र-शाळा' स्थापन झाली. शाळिग्रामांचे एक स्नेही, फोटोझिंको ऑफि-सांतील ड्राफ्ट्समन, बाळकृष्ण वासुदेव जोशी हे चित्रकलेंत निपुण होते. चिपळूणकर हे त्या कलेचे भोक्ते असल्यामुळें, शाळिग्राम यांच्या मध्यस्थीनें, त्यांचा जोशी यांच्याशीं परिचय होऊन, त्यांच्या प्रेरणेनें बाळकृष्णपंतांनीं ऐतिहासिक पुरुषांचीं चित्रें काढावयाला सुरवात केली. या त्यांच्या नव्या उपक्रमांतूनच, चिपळूणकरांनीं अवश्य तें आर्थिक साहाय्य दिल्यामुळें, चित्रशाळेचा उदय झाला. 'काव्येतिहाससंग्रहा'च्या तिसऱ्या अंकांत नाना फडणिसांची तसबीर प्रसिद्ध होतांच, साऱ्या महाराष्ट्राचें लक्ष चिपळूणकरांच्या या नवीन उद्योगाकडे वेधलें. चित्र-शाळेच्या नंतर एक वर्षानें 'किताबखाना' निघाला. १८७९ सालच्या मे महिन्यांत बुधवार वाड्याला लागलेल्या आगींत सरकारी बुकडेपोची आहुति पडली. या संधीचा फायदा घेऊन आपण पुस्तकांचें नमुनेदार दुकान काढावें, अशी कल्पना चिपळूणकरांच्या मनांत आली. छाप-खाना व त्याच्या अनुषंगानें पुस्तकांचें दुकान असा जोडधंदा चाल-विण्यांत गोंधळेकर प्रभृतींनीं मिळविलेलें यश पाहून त्यांना पुष्कळदां असें वाटत असे कीं, हा धंदा जर नवीन सुशिक्षितांनीं हातांत घेतला, तर सरकारच्या तोंडाकडे पहावें न लागतां, त्यांना नेकीनें उपजीविका

करितां येईल. शिवाय, त्यांच्या वडिलांचीं आणि त्यांचीं स्वतःचींहीं अनेक पुस्तकें विक्रीसाठीं हाताशीं होतीं; व स्वतःची खासगी शाळा काढण्याचा त्यांचा विचार या वेळीं निश्चित झालेला असल्यामुळें, अशा तऱ्हेनें दुकान काढलें असतां, त्याला गिऱ्हाइकाची वाण पडणार नाहीं, असेंही त्यांना वाटलें. म्हणून, शाळिग्राम यांच्या सहकारितेनें, त्यांनीं जुलै महिन्यांत किताबखाना उघडला. अशा रीतीनें ही नवी उद्योगपरंपरा सुरू होऊन ते निर्वाहाच्या बाबतींत अंशतः तरी निश्चिंत झाले. तथापि, हे सारे उद्योग हातीं घेण्यांतला अंतिम उद्देश तर राहोच, पण त्यांचें स्वरूपही आपल्या कुटुंबांतल्या मंडळीला किंवा इतर लोकांना कळूं नये, म्हणून ते अतिशय जपत असत. या बाबतींत त्यांनीं, स. १८७८ सालच्या जुलैमध्यें, बाळकृष्णपंत जोशी यांना पाठविलेलें पत्र अत्यंत बोधप्रद आहे. त्यांत शेवटीं त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

" जितकें काय लोकांस प्रत्यक्ष दिसणारच, त्या खेरीज साऱ्या कारभाराविषयीं तिघांखेरीज चवथ्यास एक अक्षरही कळणार नाहीं, अशी व्यवस्था ठेवा. लोकांस दिसण्यांत सहजच दिसणार आहे कीं, आजपर्यंत कोणी न काढलेली चित्रशाळा या तिघांनीं काढली आहे. तिघेही उमेदवार गडी, व्यापार कसा करावा हें एकासही माहीत नाहीं.... येवढ्या शहाण्या शहाण्यांनीं काढलेलीं स्वदेशी दुकानें, मेणबत्त्यांचे आगपेट्यांचे कारखाने जर धड चालत नाहींत, तर या छोट्या मंडळीनें अंगावर घेतलेलें हें अवडंबर कसें चालावें ? हे सर्व श्रम लवकरच फेडण्याची स्थिति येईल, अशी माझी खात्री आहे.... तुमची प्रकृति अशक्त आहे, तर अतिशय मेहनतही न करण्याविषयीं खबरदारी ठेवीत जा. तुमच्या व शाळिग्राम यांच्या नांवावर ज्या रकमा लिहून ठेवल्या आहेत, त्यांच्या संबंधानें बिलकूल काळजी मनांत आणूं नका. व्यापारी दृष्टीनें कोणत्याही कामांत शिरण्याचा जर माझा मनोदय असता, तर चित्रशाळा निघालीच नसती व निबंधमालाही निघती ना. "

चिपळूणकर उत्कट मनोवृत्तींचे असले, तरी खाजगी पत्रांतून स्वत.च्या भावनांचा आविष्कार करण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. त्यांतून हें पत्र तर, ज्याच्याशीं त्यांचा केवळ व्यावहारिक संबंध आलेला, अशा गृहस्थाला लिहिलेलें. परंतु, घरांतल्या वडील माणसांच्या भीतीमुळें, बाळकृष्णपंतांना विश्वासांत घेणें भाग पडून, त्यांना या पत्रांत साऱ्या गोष्टी मोकळेपणानें लिहाव्या लागल्या. त्यामुळें, त्यांच्या मनावरील संकोचाचें आवरण क्षणमात्र दूर होऊन, आपल्या सहकाऱ्यांविषयीं वाटणारी कळकळ, लोकांपुढें नाहक न मिरविण्याची इच्छा, अंगीकृत कार्य यशस्वी करून दाखविण्याची धमक आणि निर्वाहाचीं साधनें निर्माण करितांनाही न सुटलेलें ध्येयवादित्व या त्यांच्या स्वभावविशे-षांच्या हृदयंगम छटा त्यांत न कळत व्यक्त होऊन गेल्या.

परंतु, स्वतःच्या पायांवर उभें राहण्याचा चिपळूणकरांचा प्रयत्न जरी अशा रीतीनें यशस्वी होत चालला होता, तरी त्यांचे वडील कृष्णशास्त्री हे जर हयात असते, तर त्यांना नोकरी सोडण्याचा हिय्या झाला असता कीं नाहीं, हें सांगणें कठिण आहे. त्यांनीं नोकरी धरिली, ती अंशतः शास्त्रीबुवांच्या प्रेरणेनें; व तिचा उपद्रव मनाला होत असतां-नाही ते जे तिला चिकटून राहिले, तेही वडिलांचें मन नाराज करूं नये म्हणून. त्यांनीं जर प्रथमपासूनच वकिलीसारखा स्वतंत्र व्यवसाय केला असता, तर शास्त्रीबुवांना ती गोष्ट सर्वथैव इष्ट अशीच वाटली असती. परंतु, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या एक प्रकारच्या कृपेनें मिळालेली नोकरी मुद्दाम सोडून देऊन, त्यांच्या इतराजीचा प्रसंग आपल्यावर ओढवून घेण्याचें धोरण शास्त्रीबुवांना पसंत पडणें शक्य नव्हतें. पण, स. १८७८ सालच्या मे महिन्यांत त्यांना एकाएकीं देवाज्ञा झाल्यामुळें, स्वतःच्या मनाप्रमाणें वागावयाला चिपळूणकर मोकळे झाले. शास्त्रीबुवांसारख्या भाग्यशाली पुरुषाच्या मायेचें छत्र शिरावर असल्यामुळें संसारांतील कोणत्याही संकटाची झळ अशी आज-

पर्यंत त्यांना कधीं लागली नव्हती. पण, आतां कुटुंबाची जबाबदारी सारीच त्यांच्या अंगावर अचानक येऊन पडली; व 'दुःखं दुःखानुबंधि' या न्यायानें वडिलांच्या मृत्यूनंतर तशाच स्वरूपाचीं आणखी दोन दुःखें त्यांच्यावर कोसळून, त्यांचें मन अत्यंत व्यग्र आणि व्यथित झालें. पितृनिधनानंतर तीन महिन्यांनीं आपले धाकटे बंधु लक्ष्मणराव यांना घातलेल्या पत्रांत त्यांनीं असे सूचक उद्गार काढले होते कीं, " संसारसागरांतील वादळांत आतां आपण अगदीं पुरते सांपडलों आहों. पण, त्यामुळें नाउमेद न होतां, खंबीर नावाड्यांप्रमाणें, आपण आपत्तींशीं झुंजावयाला सज्ज झालें पाहिजे. " आणि खरोखरीच, घरगुती भांडणांनीं मन गांजलेलें असतांनाही, अवघ्या सहा महिन्यांच्या आंत सारी निरवानिरव करून, त्यांनीं नोकरी सोडण्याचा आपला निर्धार अंमलांत आणला. परंतु या आपल्या निश्चयाची परिस्फुटता मात्र त्यांनीं मुळींच होऊं दिली नाहीं. त्यांची कोणतीही योजना नेहमींच फलानुमेय असे. त्यांचा स्वभाव असा होता कीं, आपला विचार चांगला वाढीला लागून मूर्तावस्थेला आल्याशिवाय त्याची चाहूल सहसा लोकांच्या कानांवर पडूं द्यावयाची नाहीं. स. १८७९ सालच्या जानेवारींतच बहुधा, सरकारी नोकरीचा राजीनामा देऊन, स्वतःची शाळा स्थापन करण्याचा त्यांचा बेत नक्की झाला असावा. कारण, न्यू इंग्लिश स्कूलच्या विद्यार्थ्यांना उद्देशून त्यांनीं, उन्हाळ्याच्या सुटीच्या प्रारंभीं, जें भाषण नंतर केलें, त्यांत, शाळा काढण्याची योजना आपण पंधरा महिन्यांपूर्वी स्वतःच्या मनाशीं निश्चित करून टाकली होती, असा स्पष्ट उल्लेख त्यांनीं केल्याचें आढळतें. परंतु, आपलें हें हृद्गत पत्नीशिवाय अन्य कोणाजवळही बोलून न दाखवितां, स. १८७९ च्या मेमध्यें ते रत्नागिरीहून, सहा महिन्यांची अर्धपगारी रजा घेऊन, पुण्यास परत आले. या सुटीच्या काळांत त्यांनीं किताबखाना उघडला व चित्रशाळेची पुनर्घटना केली. सप्तेंबर महिन्याच्या शेवटीं त्यांनीं रत्नागिरी हायस्कूलचे हेडमास्तर

नारायण विनायक साठे यांच्याकडे आपला राजीनामा पाठवून दिला. तो वाचून साठे यांना आचंबा वाटला; व त्यांनीं चिपळूणकरांना असें पत्र घातलें कीं, "तुम्ही राजीनामा पाठविला आहे, तो डायरेक्टरसाहेबांकडे तसाच पाठवून देऊं काय ? परंतु, कदाचित् जर तुमचा विचार फिरेल व त्याबद्दल तुम्ही मला कळवाल, तर राजीनामा मी पुढें पाठवीत नाहीं." सरकारी नोकरी हा त्या काळांत जणुं दुसरा स्वर्गच होता; व जितांच्या राजकीय मोक्षाचे दोन प्रकार जे समीपता आणि सरूपता, ते नोकरींत शिरल्यानें थोड्या बहुत प्रमाणांत प्राप्त होऊन, राज्यसत्तेचे घटक म्हणून लोकांत प्रतिष्ठेनें मिरवितां येत असे. त्यामुळें, आकाशांतून निखळणारा तारा जसा दुरवस्थेला जाऊन पोंचावा, तशी चिपळूणकरांची दुर्दशा या अविचाराच्या कृत्यानें होईल, असें साठे यांना साहजिकच्च वाटलें. पण, चिपळूणकरांनीं त्यांना लगेच्च असें उत्तर पाठविलें कीं, "राजीनाम्याविषयींचा माझा फार दिवसांचा व पक्का निश्चय झालेला आहे. तो आतां मी फिरवूं इच्छित नाहीं. तुम्ही राजीनामा कृपा करून मंजुरीकरितां पुढें पाठवून द्यावा." साठे यांच्याप्रमाणेंच चिपळूणकरांच्या इतरही आप्तेष्टांना त्यांचें हें कृत्य आवडलें नाहीं; व रत्नागिरी हायस्कुलांतील त्यांचे सहकारी शिक्षक गांगल यांनीं त्यांना पत्र पाठवून या साहसापासून परावृत्त होण्याचाही सल्ला दिला. त्यांच्या या पत्राला पाठविलेल्या उत्तरांत चिपळूणकरांनीं आपलें मनोगत आणि भावी कार्याची रूपरेषाही स्पष्ट शब्दांनीं व्यक्त केली आहे. ते म्हणतात—

No wonder that my throwing up my place has called forth many a remark both here and there. In these days of helplessness and sub-serviency, Government service is looked upon in something of a heavenly light, and one deliberately giving it up must consequently be looked upon as little short of a mad man or a suicide.

But for my own part I have always thought differently of the matter. Rather than bend the knee to tyranny, I would snap asunder the chain once and for ever. I have told you once and often on what terms I stood while here with Mr. Kunte, and I resolved to throw up my place when I received the order from Ratnagiri. But various circumstances compelled me then to leave my native place and home. But even then I cherished the hope that I would achieve my liberty the moment a suitable opportunity occurred.

It is then my supreme disgust of the drudgery of a Government school-life that led me to resign my place...I am resolved to try what might be done for public good with the potent instrumentality of a press establishment worked by a vigorious hand.

गांगल यांनीं चिपळूणकरांना नोकरी न सोडण्याचा सल्ला दिला, हें त्यांच्या दृष्टीनें योग्यच झालें. मातेला दास्यमुक्त करण्यासाठीं अमृतकुंभ आणण्याच्या ईर्ष्येनें गरुडानें जेव्हां देवलोकीं जावयाला भरारी मारली, तेव्हां स्वतःला केवळ पंख आहेत एवढ्याच एका कारणामुळें त्याच्याशीं आपलें साद्दश्य कल्पिणाऱ्या इतर पक्ष्यांना त्याचें तें साहस जर अनुचित वाटलें असलें, तर त्यांत काय आश्चर्य ?

चिपळूणकर स्वतंत्र शाळा काढणार असल्याची बातमी बाहेर फुटतांच, पुण्यांतील तत्कालीन खाजगी शिक्षणसंस्थांच्या चालकांनीं साहजिकच त्यांचें सहकार्य मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यांना असें वाटलें कीं, चिपळूणकरांसारख्या लोकोत्तर पुरुषाची जोड जर आपल्या शाळेला लाभली, तर विद्यार्थिवर्गाचा ओघ तिच्याकडे आकर्षित होईल. म्हणून 'धी पूना नेटिव्ह इन्स्टिटयूशन'चे चालक वामन प्रभाकर भावे यांनीं आपल्या शाळेला येऊन मिळण्याची विनंती चिपळूणकरांना

केली. पण, त्यांची शाळा स्वतंत्र असली, तरी ती सरकारच्या मान्यतेचें मोर्तब तिच्यावर झालेलें नव्हतें, एवढ्याच अर्थानें. एरवीं तिच्यांत आणि सरकारी शाळांत कोणत्याच प्रकारचा फरक नव्हता. किंबहुना, भावे यांची शाळा चालविण्याची दृष्टि इतकी धंदेवाईक होती कीं, अन्नछत्राचा आश्रय न मिळालेल्या भिक्षुकानें चार घरें माधुकरी मागून मध्यान्ह साजरी करावी, त्याप्रमाणें बडे बडे अधिकारी आणि मिशनरी यांचा आपल्या शाळेंत सन्मान करून, त्यांच्याकडून संपादिलेल्या प्रशंसापत्रांनीं ते डायरेक्टरसाहेबांच्या शेऱ्याची उणीव भरून काढीत असत. चिपळूणकरांना तर असल्या लांगूलचालनाचें अगदीं वावडें होतें. शिवाय, ते स्वतंत्र शाळा काढावयाला उद्युक्त झाले, तें कांहीं निव्वळ निर्वाहाचें साधन म्हणून नव्हे; तर, शाळाखात्याच्या शिस्तींत जखडलेल्या निस्सत्त्व शिक्षणपद्धतींत स्वत्वाचा जिव्हाळा ओतून, तिला थोडें तरी नवीन वळण लावावें, या उद्देशानें. ‘ शालापत्रका ’च्या स. १८७२ सालच्या जानेवारीच्या अंकांतील ‘ शिक्षकाचें काम ’ या आपल्या लेखांत सरकारी शिक्षणपद्धतीविषयीं त्यांनीं असे उद्गार काढले होते कीं,—

“ हल्लीं विद्येचा फार फैलाव झाला व अभिरुचि वाढली, असें वाटतें. पण ती भ्रांति आहे. केवळ सरकारी चाकरीच्या लोभानेंच आमचे लोक विद्या शिकतात. त्यांना विद्येचें व्यसनच काय, पण साधारण आवडही नसते. ...... स्वतः शिक्षकालाच आपल्या कामाची थोरवी वाटत नाहीं. मग ती इतरांना कशी वाटावी ? उपाय नाहीं म्हणून शिक्षकाचें काम करावयाचें ही जी त्यांची समजूत तीच लोकांची. ... शिकविण्याचे विषयही बांधलेले. धर्म, नीति वगैरेचें वारेंदेखील शिक्षणाला लागूं नये, अशी सरकारची व्यवस्था. पण, ही स्थिति बदलून शिक्षण चालू असतां शिक्षक जर विद्यार्थ्यांच्या मनांत विद्येची खरी थोरवी भरवून देऊन, तिच्या अभ्यासानें होणाऱ्या अनिर्वाच्य सुखाची

त्यांना चट लावून देऊन उत्साह उत्पन्न करतील, तर शिक्षण हें ठिसूळ न बनतां तलवारीच्या पोलादासारखें कठीण व लखलखीत होऊन फार दिवस बिऱ्हाड करून ज्या अरिष्टरूपी राक्षसांनीं या देशास जेरीस आणलें त्यांचें निर्दाळण करील. ”

वयाच्या बाविसाव्या वर्षीं चिपळूणकरांच्या मनांत उद्भूत झालेले हे प्रभावी विचारच पुढें आठ वर्षांनीं न्यू इंग्लिश स्कूलच्या उत्पत्तीला प्रेरक झाले, असें म्हणावयाला कोणता प्रत्यवाय आहे? किंबहुना, पहिल्या वर्षाच्या उन्हाळयाच्या सुटीच्या प्रारंभीं त्यांनीं न्यू स्कूलच्या विद्यार्थ्यांना उद्देशून जें भाषण केलें, त्यांतही पुन्हा हेच विचार, प्रसंगानुसार थोड्या निराळ्या स्वरूपांत, प्रादुर्भूत झालेले आढळतात. शिक्षणाविषयीं ज्याचा दृष्टिकोनच असा अगदीं भिन्न होता, त्याला भावे यांच्या शाळेला जाऊन मिळणें कसें शक्य होतें? भावे यांच्यापेक्षां अगदीं निराळ्या भावनेनें प्रेरित झालेले दक्षिण विद्यालयांतील दोन तरुण विद्यार्थी चिपळूणकरांना याच सुमारास मुद्दाम येऊन भेटले. हे तरुण म्हणजे गोपाळ गणेश आगरकर आणि बाळ गंगाधर टिळक. आगरकरांना लिहिण्याची हौस जन्मजातच असल्यामुळें, मालेंतील जोरकस लेखनशैलीवर लुब्ध होऊन, त्यांनीं या पूर्वींच चिपळूणकरांशीं ओळख करून घेतली होती. कॉलेजांत आल्यानंतर एक वर्षानें, म्हणजे स. १८७६ सालच्या अखेर, ते आपला राजकीय विषयावरील एक निबंध चिपळूणकरांकडे घेऊन आले होते. हा निबंध चिपळूणकरांना दाखविण्याचें कारण असें कीं, त्यांचे राजकीय विचार किंबहुना तत्कालीन शिष्टांचा दंभस्फोट करण्याची त्यांची पद्धति आगरकरांना बव्हंशीं पसंत होती. क्रियाशून्य रावबहादुरें आणि खोडसाळ रेव्हरंडें यांच्याविषयीं चिपळूणकरांइतकाच तिटकारा त्यांनाही होता. ते न्या. रानडे यांच्या पंथांतले असल्याचा जो भ्रम अलीकडे बुद्धिपुरस्सर उत्पन्न करण्यांत आला आहे, त्याला मुळांत काडीचाही आधार नाहीं. रानडे आणि आगरकर यांच्या

मनोवृत्तींत आणि मतांत साम्य थोडें, वैषम्यच एकंदरींत फार होतें. रानडे जितके सश्रद्ध तितकेच आगरकर हे नास्तिक, ते जितके सामप्रिय तितकेच हे युयुत्सु, त्यांचीं राजकीय मतें जितकीं सौम्य तितकींच यांचीं प्रखर आणि त्यांच्या उक्तिकृतींत जितकी धरसोड, तितकेच हे बोलण्याप्रमाणें चालणारे. लोकांना शहाणे करून सोडण्याच्या ईर्ष्येनें विद्यार्थिदशेंत असतांनाच आगरकर प्रेरित झालेले होते. कॉलेजांत टिळकांशीं त्यांचा स्नेह जमून आल्यानंतर, स. १८७९ सालच्या जुलैमध्यें, सरकारी नोकरी न पत्करतां, मिशनरींप्रमाणें स्वार्थत्यागाच्या तत्त्वावर खाजगी शिक्षणसंस्था काढून, लोकांत ज्ञानप्रसार करावयाचा, असा संकल्प त्या दोघां तरुणांनीं केला; व पुण्यांतील त्या वेळच्या एका प्रसिद्ध पुढाऱ्याला पत्र लिहून त्यांनीं असें कळविलें कीं, "केवळ निर्वाहापुरतें वेतन घेऊन शिक्षणकार्यांत सर्व आयुष्य घालविण्याची आमची इच्छा असून, त्यासाठीं अवश्य असलेला निधि उभारण्याची जर शक्यता असेल, तर शिक्षण मोफत द्यावयालाही आम्हीं तयार आहों." हे पुढारी म्हणजे बहुधा न्या. रानडे असावे. त्यांनीं या तरुणांच्या उच्च हेतूंची तारीफ करून, तुम्ही स्वतः प्रत्यक्ष कांहीं तरी कार्य करून दाखविल्याशिवाय लोक तुम्हांला साहाय्य करणार नाहींत, असा सल्ला त्यांना दिला.

हा सल्ला इतका परस्पर होता कीं, आगरकर आणि टिळक यांचा निश्चय जर ठिसूळ असता, तर त्यांनीं स्वतंत्र शिक्षणसंस्था काढण्याची कल्पना सोडून दिली असती. पण, ज्ञानप्रसाराच्या कार्यांत निस्स्वार्थ जीवन कंठण्याचा त्या ध्येयवादी तरुणांनीं पुरा निर्धार केलेला असल्यामुळेंच, या मोघम उत्तरानें त्यांचा बिलकूल मनोभंग न होतां, त्यांनीं नंतर समानशील अशा चिपळूणकरांची गांठ घेतली; व ते काढीत असलेल्या शाळेला मिळण्याचें नक्की ठरविलें. या योजनेबद्दल आपल्या बंधूंना लिहिलेल्या पत्रांत चिपळूणकरांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

The memorable 1st of October is fast approaching. And I shall enjoy the pleasure of kicking off my chains that day.

Mr. Agarkar ( going for M. A. ), Mr. Tilak ( going for LL.B. ), Mr. Bhagwat and Mr. Karandikar ( appearing for B. A. ) have tendered proposals for joining me in the enterprise. This they have done of their own accord. We have settled 1st of January for the hoisting of the standard. Such a battery must carry the High School instananteously before it.

पण या तोफखान्यांतले तीन गोलंदाज, तोफ प्रत्यक्ष डागली जाण्यापूर्वीच, निरनिराळ्या कारणांमुळें गळाले. करंदीकर आणि भागवत यांना हा देशसेवेचा मार्ग यशस्वी होण्याची शंका वाटल्यामुळें त्यांनीं आधींच आपलें अंग त्यांतून काढून घेतलें; व आगरकरांना एम. ए. च्या परीक्षेला बसावयाचें असल्यामुळें, त्यांच्यावरही आयत्या वेळीं मागें रहाण्याचा प्रसंग आला. खुद्द टिळकांच्याही मनाची अवस्था, कदाचित् आपल्या या सहकाऱ्यांच्या वर्तनामुळेंही असेल, थोडी दोलाचलच होती. म्हणून, ता. १५ डिसेंबर १८७९ रोजीं नव्या शाळेची जी उद्देशपत्रिका चिपळूणकरांनीं प्रसिद्ध केली, तींत कोणाच्याही नांवाचा निर्देश न करितां, शिक्षण स्वस्त आणि सुलभ करण्याचा आपला उद्देश असल्याची अगदीं सौम्य घोषणा केली होती. परंतु, त्यांची स्वतःची लोकप्रियता आणि त्यांच्या या नव्या उपक्रमाविषयींची लोकांची उत्सुकता इतकी विलक्षण होती कीं, हरि नारायण आपटे, नारायण सखाराम पानसे, वैजनाथ काशिनाथ राजवाडे प्रभृति, पुढें वेगवेगळ्या कार्यक्षेत्रांत कीर्ति मिळविलेले, सरकारी हायस्कुलांतील विद्यार्थी, त्यांच्या शाळेंत जाण्यासाठीं, चार महिने आधीं बिचाऱ्या हायस्कूलचा निरोप घेऊन, घरीं बसले होते. न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना, ता. १ जानेवारी १८८० रोजीं, मोरोबादादा

फडणवीस यांच्या वाड्यांत झाली. त्या प्रसंगीं स्वतः चिपळूणकर, टिळक आणि माधवराव नामजोशी हे तिथे हजर होते; व प्रथम इंग्रजींत थोडेंसें प्रास्ताविक भाषण करून, चिपळूणकरांनीं शाळेच्या कामाला सुरवात केली. पहिल्या दिवशीं शाळेंत दीडशें विद्यार्थी होते. ही संख्या सहा महिन्यांच्या आंतच पांचशेंवर गेली; व सरकारी हायस्कूल हें जरी केवळ राजाश्रय असल्यामुळेंच पुढें कांहीं वर्षें अस्तित्वांत राहिलें, तरी, चिपळूणकरांच्या भाकितानुसार, त्याचा रुबाब मात्र पार धुळीला मिळाला. तो इतका कीं, पूना हायस्कूलचे त्या वेळचे हंगामी हेडमास्तर वामन आबाजी मोडक यांनीं आपल्या वार्षिक अहवालांत, हायस्कुलांतील मुलांची संख्या कमी झाल्याबद्दल न्यू स्कूलला जबाबदार धरून, तें काढणाऱ्या 'हुच्च' ( vagabond ) तरुणांवर आग पाखडली. चिपळूणकरांनीं, आपल्या उन्हाळयाच्या सुटीच्या आरंभीं केलेल्या भाषणांत, 'निराश मत्सरग्रस्तांच्या क्षुद्र कारवाया' ( The mean devices of disappointed malice ) या शब्दांनीं केलेली त्यांच्या त्या अप्रशस्त टीकेची संभावना अगदीं समर्पक वाटते. वक्तृत्वावरील निबंधांत दयानंदप्रभृतींची कुचाळी केल्याबद्दल चिपळूणकरांचा कान धरावयाला धांवणाऱ्या मोडकांसारख्या प्रार्थनासमाजाच्या पोक्त महर्षींचा, न्यू इंग्लिश स्कूल सारख्या लोकोपयोगी संस्थेविषयीं लिहितांना, इतका विवेक सुटावा, याचें कोणाला नवल वाटणार नाहीं? एरवीं मोठा सात्त्विक भासणारा असाही मनुष्य, त्याच्या स्वतःच्या हितसंबंधांना ढका लागण्याची पाळी आली असतां, सारें तत्त्वज्ञान कसें गुंडाळून ठेवतो, याचा मोडकांची टीका हा एक इरसाल नमुना आहे. पण, त्या खोडसाळ टीकेमुळें न्यू इंग्लिश स्कूलची लोकप्रियता उलट वाढली मात्र. मंडलिक, वर्डस्वर्थ, मिचेल प्रभृति त्या वेळच्या पुढारी, अधिकारी किंवा मिशनरी गृहस्थांनीं या नव्या शाळेची मुक्त कंठानें प्रशंसा करून, स्वार्थत्यागाचें उदाहरण घालून दिल्याबद्दल तिच्या चालकांचा गौरव

केला. फार कशाला, ज्या चाटफील्डसाहेबांचा चिपळूणकरांच्या जहाल मतांमुळें त्यांच्यावर इतका राग झाला होता, त्यांनाही या त्यांच्या कर्तबगारीचें कौतुक केल्याशिवाय रहावलें नाहीं. शाळेच्या या साऱ्या उत्कर्षाचें श्रेय, तिला मागाहून सात महिन्यांनीं येऊन मिळालेले, संस्कृत पंडित वामन शिवराम आपटे यांच्या शिस्तशीरपणालाच बव्हंशीं दिलें पाहिजे. मनाजोगी सरकारी नोकरी मिळण्याच्या बाबतींत वारंवार हिरमोड झाल्यामुळेंच मुख्यतः आपटे हे अखेर न्यू स्कूलला येऊन मिळाले होते. संस्कृत विद्येच्या पांडित्यांत जरी ते चिपळूणकर, आगरकर आणि टिळक यांच्यापेक्षां सरस असले, तरी त्यागबुद्धीच्या बाबतींत मात्र त्यांची तुलना या तिघांपैकीं एकाशींही करितां येणार नाहीं. चिपळूणकर आणि टिळक यांनीं पहिल्या वर्षीं बहुतेक निर्वेतनच काम केलें. उलट, आपटे आले, ते इतरांपेक्षां पगार आणि अधिकार जास्त मागतच आले. त्यामुळें, ज्या स्वार्थत्यागाच्या कोनशिलेवर संस्थेची उभारणी झाली होती, तिला पहिल्याच वर्षीं तडा पडला. शिवाय, आपटे यांचा कटाक्ष, शिक्षण राष्ट्रीय दृष्टीनें देण्यापेक्षां, तें परीक्षेंतील यशाची कमान चढती राहील अशा दृष्टीनें देण्यावरच अधिक असल्यामुळें, इतर सरकारी शाळांवर जरी न्यू स्कूलनें लवकरच मात केली, तरी त्याला वैशिष्ट्य असें मात्र कांहींच उरलें नाहीं. परंतु, नवीन शाळा काढण्यांत चिपळूणकरांची जी विशिष्ट आकांक्षा होती, ती जरी पुढें अशा रीतीनें सर्वथैव निष्फळ झाली, तरी देशसेवेला सर्व आयुष्य वाहून घेण्याची प्रथा प्रथम त्यांच्या या उपक्रमानेंच सुरू केली, हें अगदीं निर्विवाद आहे.

चिपळूणकरांचा नोकरी सोडल्यानंतर केवळ शाळा चालविण्याचाच विचार होता, असें नाहीं. आपले सहकारी गांगल यांना पाठविलेल्या पत्रांत त्यांनीं असें स्पष्टच म्हटलें होतें कीं, "प्रभावी मुद्रणसंस्था आणि ओजस्वी लेखणी यांच्या जोरावर शक्य तितकें लोकहित करण्याचा माझा विचार आहे." आणि यांत फारसें आश्चर्यही नाहीं. किंबहुना

त्यांची अभिरुचि व आतांपर्यंतचा आयुष्यक्रम लक्षांत घेतला असतां, त्यांचें चित्त शाळेपेक्षांही, अज्ञानध्वंसनाच्या कामीं केवळ वज्रच अशा, मुद्रणसंस्थेवर केंद्रित व्हावें, हें अगदीं स्वाभाविकच होतें. मालेचे अंक मागसल्याबद्दल तक्रार करणाऱ्या आक्षेपकांना उत्तर देतांना त्यांनीं स्वतःविषयीं असे उद्गार काढले आहेत कीं, " गेल्या दशकांत कागदाला टांक लागल्याव्यतिरिक्त आमचे फारच थोडे दिवस गेले असतील." ज्यानें सतत दहा वर्षें, नोकरीच्या बंधनाची भीड फारशी न मानतां, दुर्मतदलनाचें कार्य मोठ्या धडाडीनें केलें, त्याच्या ज्ञानप्रसाराच्या आकांक्षेचें समाधान नुसती शाळा चालवून कसें व्हावें? लोकशिक्षणाच्या व्यापक कार्याला शाळेचा उपयोग झाला, तरी तो कितीसा होणार? मोटेच्या पाण्यानें फार तर दृष्टीचा पल्ला न पोंचे इतकीही जमीन कदाचित् भिजेल. पण, अनेक वर्षें पडीत राहिलेला वैराण प्रदेश लागवडीला आणावयाचा, म्हणजे नदीलाही आपल्या विस्तीर्ण जलौघानें लाजवील, असा प्रचंड कालवाच खरोखरी खणला पाहिजे. शाळेच्या आवारांत शिक्षक फार तर हजार मुलांशीं बोलूं शकेल,—त्यांचीं मनें उद्बोधित आणि उद्दीपित करील. पण, शाळेच्या बाहेर जे लक्षावधि लोक अज्ञान आणि तज्जन्य दुर्मतें यांनीं ग्रासलेले असतात, त्यांचें उद्बोधन यापेक्षां व्यापक साधनाचा अवलंब केल्याशिवाय कसें होणार? चिपळूणकरांना या गोष्टीची जाणीव असल्यामुळें त्यांनीं, राजीनामा दिल्याबरोबर स. १८७९ च्या आक्टोबरमध्यें, ' किरण ' छापखान्याचें सामान विकत घेतलें. तथापि, छापखाना घेण्यांत त्यांचा हेतु वर्तमानपत्रें काढण्याचा होता, असें मात्र वाटत नाहीं. कारण, मालेच्या पांचव्या वर्षाच्या समारोपांत, आपल्या वाचकांशीं हितगुज करितांना, त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

" इत उत्तर अध्ययन, अध्यापन व ग्रंथरचना या तीन उद्योगांत आम्हीं कालक्षेप करणार. आमच्या चार विद्यालयबंधूंनींही आपला

अशाच प्रकारचा संकेत दोन तीन महिन्यांपूर्वी आम्हांस कळविल्या-वरून ते व आम्हीं मिळून एक स्वतंत्र शाळा काढणार आहों. आमच्या एका मित्राच्या मेहरबानीनें एक मोठा छापखाना मोठ्या सोईवार रीतीनें आम्हांस मिळाला आहे. या साहित्याच्या योगानें वरील तिन्ही हेतु निर्बाधपणें चालण्यासारखे आहेत."

अर्थात् छापखाना घेतांना ग्रंथरचनेचाच उद्देश त्यांच्या डोळ्यांपुढें होता, असें दिसतें. त्यांच्या बंधूंनींही, निबंधमालेचें रूपांतर ग्रंथमालेंत करण्याचा विचार मृत्यूच्या वेळीं त्यांच्या मनांत घोळत होता, अशी माहिती दिली आहे. शिवाय, वर्तमानपत्रें वाचण्याचा त्यांना असलेला कंटाळा व प्रचलित घडामोडींविषयींचें त्यांचें औदासीन्य लक्षांत घेतलें असतां, समाजाची केवळ रोजकीर्दच असें वर्तमानपत्र काढण्याची कल्पना त्यांच्या मनांत उद्भूत झाली असेल, असें वाटत नाहीं. पण, शाळेच्या निमित्तानें ज्या नवीन व्यक्तींशीं त्यांचा संबंध आला होता, त्या व्यक्तींनीं आपल्याबरोबर त्यांनाही वृत्तपत्रांच्या व्यवसायांत ओढलें. त्यांच्या नव्या सहकाऱ्यांपैकीं नामजोशी हे वर्तमानपत्राच्या धंद्यांत वहिवाटलेले असून, त्यांनीं 'किरण' व 'डेक्कन स्टार' हीं मराठी—इंग्रजी पत्रें कांहीं दिवस मोठ्या हिमतीनें चालविलीं होतीं. आगरकरांना लिहिण्याची हौस चिप-ळूणकरांपेक्षांही कांकणभर अधिक होती म्हटलें तरी चालेल; व त्या उभयतांच्या लेखनाभिरुचींत फरक असा होता कीं, चिपळूणकरांना ज्या चिल्लर सामाजिक गोष्टींवर लिहिण्याचा मनस्वी कंटाळा होता, त्यांतही रमण्याची आगरकरांच्या बहुढंगी लेखणीची तयारी असे. आपटे यांना मतप्रसाराची तळमळ कितपत होती, हें सांगणें कठिण. किंबहुना नव्हतीच. कारण, कोल्हापूर-प्रकरणाची अद्दल घडल्यानंतर त्यांनीं, वर्त-मानपत्रांची जबाबदारी टिळक—आगरकरांवर सोंपवून, आपलें अंग जें एकदां त्यांतून काढून घेतलें, तें कायमचेंच. पण, अडवून धरलेलें पाणी जसें सांपडेल त्या भेगेंतून झिरपून बाहेर पडण्याचा प्रयत्न करित

असतें, त्याप्रमाणें बळेंच स्वार्थत्यागी बनविलेलें त्यांचें मन, उत्पन्न वाढविण्याची संधि जरा कुठें दिसतांच, तिचा फायदा घ्यावयाला नेहमीं आतुर असे. त्यामुळें, आगरकर आणि नामजोशी यांच्या वर्तमानपत्रें काढण्याच्या उठावणीला त्यांनीं उत्तेजनच दिलें; व त्यांच्या घरीं श्राद्धाच्या दिवशीं आगरकर प्रभृति मंडळी जेवावयाला आली असतां, ‘ केसरी ’ आणि ‘ मराठा ’ अशीं दोन मराठी–इंग्रजी पत्रें काढण्याचा बेत नक्की झाला. टिळकांना लिहिण्याची हौस मुळींच नसल्यामुळें ते चिपळूणकरांपेक्षांही या बाबतींत एका परीनें उदासीन होते. पण, चिपळूणकरांप्रमाणेंच ‘ अंगीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति ’ असा त्यांचाही बाणा असल्यामुळें, वर्तमानपत्रें काढण्याचें एकदां ठरल्यानंतर, चिपळूणकरांनीं, जसा ‘ किरण ’ छापखाना आपल्या सहकाऱ्यांच्या स्वाधीन करून, शिवाय ‘ केसरी ’ चालविण्याचीही जबाबदारी आगरकरांच्या बरोबरीनें उचलली, तसा टिळकांनींही ‘ केसरी’च्या संपादनाचा अंशतः आणि ‘ मराठ्या’च्या संपादनाचा भार मुख्यतः आपल्या शिरावर घेतला. या योजनेप्रमाणें, ‘ किरण ’ छापखान्याची पुनर्घटना ‘ आर्यभूषण ’ या नांवानें करण्यांत येऊन, त्यांतून ता. २ जानेवारी १८८१ रोजीं ‘ मराठ्या ’ चा व त्यानंतर दोन दिवसांनीं ‘ केसरी’चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. या पत्रांचें ध्येय ‘ देशस्थिति, देशभाषेंतील ग्रंथ व विलायतेंतील राज्यकारण ’ यांची चर्चा करण्याचें होतें. यांपैकीं पहिल्या दोन विषयांवरच बहुधा चिपळूणकरांची लेखणी चालत असे. तथापि, मालेंतील निबंधांतून त्यांच्या प्रतिभेच्या आत्मीय गुणांचें जें तेज प्रकट झालें आहे, त्याचा मात्र आढळ ‘ केसरीं’तील लेखांतून होत नाहीं. ते लेख वाचीत असतांना, वाङ्मयाच्या निरनिराळया शाखांना लीलेनें स्पर्श करित संचार करणारी त्यांची विशाल प्रतिभा, वर्तमानपत्राच्या निरुंद रकान्यांतून, पंख चोरून वाट काढीत आहे, असा भास होतो. पण त्यांत नवल

कसलें ? हिमगिरीवरून वेगानें कोसळत खालीं येणाऱ्या मंदाकिनीचा फेनधवल प्रवाह क्षेत्रांतील दुतर्फा बांधलेल्या घाटांतून वहातांना अवघड-ल्यासारखा वाटत नाहीं काय ?

या संस्था स्थापन करण्याचा उद्योग चालू असतांनाच 'लोकहित-वादी' व 'आमच्या देशाची स्थिति' हे मालेंतील शेवटले दोन निबंध चिपळूणकरांनीं लिहिले. या निबंधांचे विषय जरी दिसावयाला भिन्न असले, तरी ते एका अर्थानें परस्परांना पूरक असून, चिपळूण-करांच्या राजकीय विचारांची भूमिका त्यांत विशद झालेली आहे. मात्र, लोकहितवादींच्या मतांचें त्यांनीं केलेलें खंडन हें, पंतांच्या कवि-तेच्या मंडनाइतकेंच, एकांगी वाटतें. लोकहितवादी ऊर्फ रा. ब. गोपाळ हरि देशमुख यांचा जन्म स. १८२३ सालीं पुणें येथें झाला. सरकारी नोकरींतील आपल्या प्रतिष्ठेला ढळ न पोंचेल, अशा रीतीनें निरनिराळ्या लोकोपयोगी चळवळी करण्याची प्रथा प्रथम त्यांनींच पाडली म्हटलें तरी चालेल. पुण्याचा 'ज्ञानप्रकाश' आणि मुंबईचा 'इंदुप्रकाश' हीं पत्रें त्यांच्याच प्रेरणेनें निघालीं; व समाजसुधारणेचा मतप्रसार वाणीनें किंवा लेखणीनें जितका म्हणून करणें शक्य होतें, तितका त्यांनीं आमरण मोठ्या चिकाटीनें केला. त्यांनीं, 'प्रभाकर' पत्रांतून स. १८४८ सालीं, शेंकडों पत्रात्मक लेख लिहून, तत्कालीन सामाजिक रूढींवर खरम-रीत टीका केली होती. हीं शतपत्रें पुढें तीस वर्षांनीं त्यांनीं स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध केलीं. त्यांच्या या निबंधसंग्रहानें १०४९ पृष्ठें व्यापिलीं होतीं; व चिपळूणकरांनींही सतत वर्षभर त्याच्या खंडनार्थ आपली लेखणी शिणविली. वस्तुतः, मालेंतून जेव्हां त्यांची ही प्रचंड टीका आली, तेव्हां संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाचें युग सुरू झालेलें असल्यामुळें, लोकहितवादींच्या मतांना फारसें महत्त्व उरलेलें नव्हतें. अशा स्थितींत, चिपळूणकरांनीं त्यांच्यावर इतकी कडक टीक केली नसती, तरी चाललें असतें. शिवाय, लोकहितवादींनीं ज्या देश-

हिताच्या तळमळीनें शतपत्रें लिहिलीं, त्या तळमळींतली सद्भावनाही त्यांनीं लक्षांत घेतली नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात ज्या वेळीं महाराष्ट्रांतील सारे विद्वान् केवळ शालोपयोगी वाङ्मय निर्माण करण्यांत गुंतलेले होते, त्या वेळीं, समाजाला त्याची वास्तविक स्थिति कळून स्वतःची सुधारणा करून घेण्याची बुद्धि व्हावी, या उद्देशानें लोक-हितवादींनीं शतपत्रांची रचना केली. त्यांचा देशाभिमान हा चिपळूण-करांच्या देशाभिमानाइतकाच उत्कट होता. पण भिन्न परिस्थितीनें त्या दोघांच्या देशाभिमानाला अगदीं भिन्न वळण लावलें. अतिशय थंड प्रदेशांत पडलेल्या पावसाच्या पाण्याचें बर्फ होऊन वस्तुजाताला बधि-रता येते. पण तेंच पाणी उष्ण प्रदेशांत पडलें असतां ओढे खळखळूं लागून माळरानें हिरवीं गार होतात. लोकहितवादींच्या उपदेशाला प्रायः स्वजन-निंदेनें प्रारंभ होत असे. उलट चिपळूणकरांनीं स्वजनश्लाघेची संधि सहसा दवडली नाहीं. लोकहितवादींच्या उपदेशानें समाजाची अभिमानभावना गारठून गेली, तिचा जोम ओसरला. उलट चिपळूणकरांच्या उपदेशानें त्या वठलेल्या भावनेला पालवी फुटली, तिला बहर आला. लोकहितवादींच्या उपदेशानें जी खळबळ उडाली, तिच्या मुळाशीं प्रतिकारप्रवृत्ति होती. उलट चिपळूणकरांच्या उपदेशानें स्वाभिमान जागृत होऊन समाज कर्तव्यतत्पर झाला. त्यांच्या मतांत आणि कामगिरींत अशा प्रकारचें अंतर पडावयाला त्यांच्या भोंवतालची परिस्थितीच सर्वस्वीं कारण झाली. अव्वल इंग्रजी अमदानींतील बौद्धिक गुलामगिरीच्या वाता-वरणांत लोकहितवादींचा जन्म झाला, त्यांचें शिक्षण झालें, त्यांच्या विचारांची वाढ झाली. वयाच्या एकविसाव्या वर्षीं ते सरकारी नोक-रींत शिरले. तींत त्यांची इतकी बढती झाली कीं, पेशवाई गेल्यामुळें त्यांच्या घराण्याची पिढीजाद सरदारी जरी नष्ट झाली होती, तरी इंग्रज सरकारच्या मेहरबानीनें ते स्वतः अखेर सरदार होऊन नोकरींतून निवृत्त झाले! विशेषतः, इनाम कमिशनचा प्रमुख अधिकारी या

नात्यानें, केवळ सनदेचें चिठोरें पुराव्याला सांपडलें नाहीं म्हणून, शेंकडा लोकांचे सरंजाम बुडवावयाला ज्याची न्यायबुद्धि कारण झाली, त्याच्या त्या कर्तबगारीची संभावना वृद्धापकाळीं सरदारीचा बहुमान मिळून व्हावी, हा तरी दैवाच्या उपरोधप्रियतेचाच एक खेळ नव्हे काय ? अशा रीतीनें ज्या सरकारनें त्यांना प्रथम विद्यादान करून पुढें वैभवाला चढविलें, त्याचे पोवाडे गातांना त्यांच्या लेखणीला प्रेमाचें भरतें येणें किती स्वाभाविक होतें ? पण, केवळ वैयक्तिक लाभामुळेंच त्यांची इंग्रजी राज्यकर्त्यांवर इतकी भक्ति बसली होती, असें नव्हे. ब्रिटिश सत्तेबरोबर जी बौद्धिक आणि भौतिक सुधारणा या देशांत घडून आली, ती पाहून त्यांची दृष्टि दिपली, बुद्धि बावरली, आदर अनावर झाला. आपलें स्वातंत्र्य नाहींसें झालें, तें केवळ आपल्या लोकांच्या मूर्खपणामुळें, असें त्यांना वाटलें. आपल्या समाजांत जिज्ञासा नाहीं, त्यागबुद्धि नाहीं, मुत्सद्दीपणा नाहीं, देशाभिमान नाहीं त्यामुळें आपण स्वातंत्र्याला नालायक ठरलों आणि महाराष्ट्राच्या कपाळीं पारतंत्र्याचा भोग आला, अशी त्यांची भावना झाली. नाना फडणिसासारखा एवढा बुद्धीचा सागर म्हणून गाजलेला मुत्सद्दी !—पण त्यालाही हे इंग्रज आपल्या देशांत कशासाठीं आले आणि कोणत्या साधनांच्या जोरावर स्वतःला व्यापारी म्हणविणाऱ्या या मूठभर जळचरांनीं सारा मुलूख पादाक्रांत केला, याची चौकशी करण्याची बुद्धि झाली नाहीं, याचें त्यांना आश्चर्य वाटलें; व त्याच्या मनसोबीची तलवार इंग्रजांचें महाराष्ट्रांतून उन्मूलन करावयाला असमर्थ ठरल्याचें पाहून त्याच्याविषयींचा त्यांचा आदर आहाळून गेला. मोरोपंतांसारखा केवळ दुसरा वाल्मीकि म्हणून गणलेला महाकवि !—पण त्यानें आपल्या प्रतिभेचें शक्तिसर्वस्व अष्टोत्तरशत रामायणांचे तेच ते शुष्क शब्दबंध उभारण्यांत वेंचावें, याचा त्यांना आचंबा वाटला; व स्वदेशाला दास्यमुक्त करण्यासाठीं आत्मयज्ञ करणाऱ्या वीरांचीं चरित्रें वर्णन करण्याची स्फूर्ति त्याला न झाल्याचें

पाहून त्यांचें त्याच्याविषयींचें कौतुक करपून गेलें. त्यांना संशोधनाचा नाद असल्यामुळें पेशवाईतील अनेक व्यक्तींच्या आख्यायिकांचा संग्रह त्यांनीं केला होता. या संशोधनामुळें पेशवाईतील समाजस्थितिविषयीं त्यांचा ग्रह प्रतिकूल होऊन, तत्कालीन समाजाची बुद्धि आणि संस्कृति त्यांना हीणकस वाटली. त्यांतही, त्यांच्या डोळ्यापुढें त्या वेळीं, पेशवाई बुडवून महाराष्ट्रांत सत्ताधीश झालेल्या, इंग्रजांच्या प्रतापी आणि प्रगत राज्यनीतीचें उज्ज्वल दृश्य असल्यामुळें, त्यांचा त्या परकीयांविषयींचा आदर परमावधीला जाऊन, त्यांना स्वकीयांचा सर्वथैव वीट आला.

या मनःस्थितींत त्यांनीं शतपत्रें लिहिलीं. इंग्रजी विद्यावारुणीचा कैफ डोळ्यांवर चढून ते इतके बेहोष होऊन गेले होते कीं, पुण्याच्या ज्या संस्कृत पाठशाळेंतून कोल्हटकर, चिपळूणकर, राजवाडे, पंडित प्रभृति मराठी वाङ्मयाच्या उत्कर्षाचा पाया घालणारे कर्तबगार शास्त्री बाहेर पडले, ती पाठशाळा जेव्हां स. १८६० सालीं सरकारनें बंद केली, तेव्हां 'पुरंदरचें बंड' मोडल्याबद्दल त्यांना मोठाच हर्ष झाला. वस्तुतः जुनी संस्कृत विद्या व तिची निष्ठेनें जोपासना करणारा शास्त्रिवर्ग राजाश्रय तुटल्यामुळें आधींच हतप्रभ होऊन गेलेला होता. तेव्हां त्यांची अशा रीतीनें पायमल्ली करण्यांत रावबहाद्दुरांनीं कोणता पुरुषार्थ साधला? पण, त्यांच्या तरुण मनाची त्या वेळीं तरी अशी ठाम समजूत होऊन गेली होती कीं, जुनी विद्या, जुन्या चालीरिती, जुने आचार-विचार यांचा समूळ उच्छेद झाल्याविना लोकांची सुधारणा होणार नाहीं; व त्यामुळें, आपण काय बोलत आहों याचा विवेक न करितां, किंबहुना आपलें स्वतःचें वर्तन बोलण्याप्रमाणें घडत आहे किंवा नाहीं हेंही लक्षांत न घेतां, एक प्रकारच्या आततायीपणानें, ते स्वजनांची आणि स्वसंस्कृतीची निरर्गल निंदा करित सुटले. समाजाला परंपराप्राप्त विचारांचा त्याग एकदम करणें अशक्य असतें.

नदीचें पात्र एकदम सहसा बदलत नाहीं. थोडथोडें वळण घेत घेत तिचा प्रवाह पात्रापासून हळुहळू परावृत्त होतो आणि कालांतरानें तिचें पात्र पालटतें. नदीचें अफाट वाळवंट पाहून तिच्या पात्रांतराची कल्पना येते व समाजाचें अगाध वाङ्मय वाचून त्याच्या विचार-क्रांतीचा इतिहास दृष्टीपुढें उभा रहातो. ज्या 'ऋषींच्या कारकीर्दी'चे गोडवे लोकहितवादी नेहमीं इतके गात असत, तिच्यांतील निरनिराळ्या क्रांतिकारक प्रसंगांचें जर त्यांनीं शोधपूर्वक समालोचन केलें असतें, तर त्यांना स्वतःच्या आपद्ग्रस्त समाजाचा असा तेजोवध करण्याची बुद्धि खचित झाली नसती. पण सुधारणा घडवून आणण्याच्या घिसाड-घाईंत हें अवधान त्यांना उरलें नाहीं. इंग्रजी अंमल हा त्यांना सुधारणेचा जणुं पर्वकाळच वाटला. आदिलशाहींत, शिवशाहींत किंवा पेशवाईत जी सुबत्ता आणि शांतता देशांत कधीं नव्हती, ती या वेळीं त्याला लाभलेली त्यांना दिसली. त्यामुळें, त्यांना साहजिकच असें वाटलें कीं, इंग्रजांच्या कृपेनें ही स्वतःची सुधारणा करून घेण्याची सर्वथैव अपूर्व संधि महाराष्ट्राला लाधली असून, आतां त्यानें मनावर घेतलें, तर सहजासहजीं त्याचा उद्धार होऊन जाईल. आपल्या एका पत्रांत त्यांनीं असें स्पष्टच म्हटलें आहे कीं, "इंग्रज लोकांनीं इकडे राज्य संपादन केलें, त्याचें कारण काय? याचा विचार करितां दिसतें कीं, हिंदु लोकांमध्यें मूर्खपणा वाढला. तो दूर होण्याकरितांच हे गुरु दूर देशांतून ईश्वरानें इकडे पाठविले आहेत." त्यांच्या नंतरच्या पिढीं-तील सुधारकांचे पुढारी न्या. रानडे यांचेही विचार अशाच प्रकारचे होते. किंबहुना, न्या. रानडे ही लोकहितवादींची सुधारलेली आवृत्ति होती, असेंही म्हटलें तरी शोभून जाईल. त्यांच्यांतील मुख्य फरक एवढाच कीं, रावबहादुर हे प्रचारक, तर न्यायमूर्ति हे मुत्सद्दी होते. मन अधिक सुसंस्कृत, बुद्धि अधिक चतुरस्र, दृष्टि अधिक विशाल, वृत्ति अधिक गंभीर, मतें अधिक सौम्य, वाणी अधिक मधुर आणि या

सर्वांच्याहीपेक्षां बदलत्या काळाचा नूर ओळखून त्याच्याशीं जुळतें घेण्याचें चातुर्य या गुणांमुळें न्या. रानडे यांना समाजांतील साऱ्याच वर्गांची मान्यता थोडी बहुत संपादन करितां येऊन, एकदां आपल्याकडे आलेलें त्याचें नेतृत्व अखेरपर्यंत कायम ठेवतां आलें. लोकहितवादी जे विचार मनांत येतील तसे उघड्या वाघड्या शब्दांनीं बोलून टाकून मोकळे होत असत, ते न्यायमूर्ति सुंदर शब्दांच्या आभरणांनीं सजवून समाजाला मानवतील अशा रीतीनें त्याच्यापुढें मांडीत. पण, शब्दांचीं हीं आभरणें म्हणा किंवा आवरणें म्हणा, बाजूला सारून बघितलें असतां, दोघांही रावबहादुरांच्या राजकीय विचारांत—इंग्रजी राज्याकडे पहाण्याच्या दृष्टींत—कोणत्याच प्रकारचें अंतर आढळत नाहीं. इंग्रजांच्या गुरुपणाची जी कल्पना लोकहितवादींनीं, एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत, आपल्या शतपत्रांमध्यें साध्या तुटक शब्दांनीं सांगितली होती, तीच पुढें न्यायमूर्तींनीं, त्या शतकाच्या उत्तरार्धांत, आध्यात्मिक भाषेच्या अवडंबरामध्यें ग्रथित केली, एवढाच काय तो फरक! या कल्पनेंत आपल्या समाजाची जी केवळ राजकीयच नव्हे, तर सांस्कृतिकही हीनता ध्वनित केलेली होती, आणि कोणत्याही उदयोन्मुख राष्ट्राला सर्वथैव घातुक असलेला जो दैववाद तिच्या मुळाशीं होता, त्यांची चिपळूणकरांना अतोनात चीड आली; व म्हणून, एरवीं लोकहितवादींच्या ज्या प्रलापांची त्यांनीं कदाचित् उपेक्षा केली असती, त्यांचें त्यांनीं इतक्या त्वेषानें खंडन केलें. मानसोपचाराचें एक तत्त्व असें आहे कीं, व्याधिग्रस्त मनुष्याला त्याच्या ज्या चुकांमुळें दुखणें झालेलें असतें, त्यांच्याबद्दल जर त्याला वारंवार दोष देत राहिलें, तर त्याचें मन विषादानें ग्रासलें जाऊन, कालांतरानें रोग असाध्य होऊन बसतो. उलट, त्याच्या खिन्न मनावर, रोगपूर्व सुस्थितीची आठवण देऊन, जर उत्साहाचे किरण सतत पाडित राहिलें, तर त्याच्या स्वयंप्रेरणेच्या शक्तीला चालना मिळून, रोग कितीही दुर्धर असला, तरी मनाच्या

उमेदीच्या जोरावर तो त्याचा प्रतिकार करावयाला हळुहळू समर्थ होतो. पण, लोकहितवादींना ही साधी गोष्ट कळली नाहीं; व समाजाच्या उन्नतीसाठीं त्यांना लागलेली तळमळ उलट त्याच्या तेजोभंगाला मात्र पर्यायानें कारण झाली.

लोकहितवादींच्या नंतर चाळीस वर्षांनीं, कदाचित् त्यांच्याहीपेक्षां अधिक आवेशानें, आगरकरांनीं समाजाचें दोषाविष्करण केलें. पण त्यांच्या टीकेचें लोकांना तितकें वैषम्य वाटलें नाहीं. याचें कारण, एक तर, असें कीं, आगरकर हे स्वतः कर्ते सुधारक असून, त्यांनीं समाजाच्या उन्नतिसाठीं सर्वस्वाचा त्याग केलेला होता. शिवाय, दुसरी गोष्ट अशी कीं, लोकांत प्रचलित असलेल्या दुष्ट रूढींवर त्यांनीं कितीही कठोर टीका केलेली असली, तरी पारतंत्र्य हें ईश्वरी वरदान आहे, असें प्रतिपादण्यापर्यंत मात्र त्यांची मजल कधींही गेली नाहीं. किंबहुना, सामाजिक विषमतेचा त्यांना जितका तिटकारा होता, तितकीच राजकीय पारतंत्र्याचीही त्यांना चीड होती; व आपल्या समाजाच्या वैगुण्यांबद्दल त्यांना जितका विषाद वाटत असे, तितकाच आपल्या पूर्वजांच्या संस्कृतीचाही त्यांना अभिमान होता. त्यांची ही अभिमानभावना इतकी उत्कट आणि हळुवार होती कीं, ॲशबर्नर आणि वुइलर्ड यांच्यासारख्या दुर्विदग्ध इंग्रज कलमबहाद्दरांनीं, ज्या वेळीं हिंदु स्त्रियांच्या शीलावर शिंतोडे उडवून, पर्यायानें आर्य संस्कृतीचा उपहास करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां स्वसमाजांतील पुराणमताभिमानी दांभिकांचे वाभाडे काढण्यांत दंग असलेल्या आगरकरांच्या ओजस्वी लेखणींतून, परकीयांचा अचूक मर्मच्छेद करणाऱ्या, मराठ्यांच्या भाल्याची विदारक चमक उफाळून प्रकट झाली. परंतु, महाराष्ट्राला जणुं कांहीं स्वतःची संस्कृति नाहीं, परंपरा नाहीं, इतिहास नाहीं, अशा प्रकारच्या भावनेनें लोकहितवादींनीं इंग्रजांचें शिष्यत्व पत्करण्याचा उपदेश लोकांना केला. पण, आत्मनिंदेच्या ऊर्मींत ते ही गोष्ट विसरले

कीं, ज्या राष्ट्राच्या अंतःकरणांत आपल्या उज्ज्वल पूर्व कर्तृत्वाच्या अभिमानाची दीप्ति धगधगत असते, तें राष्ट्र आपल्या जेत्यांचें शिष्यत्व पत्करावयालाच काय, पण आपला पराभव कबूल करावयालाही तयार होत नाहीं. त्यांतून महाराष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट होऊन तर पुरतीं पन्नास वर्षेंही त्या वेळीं झालेलीं नव्हतीं. इंग्रज मुत्सद्दी रुमालानें हात बांधून आपल्या दरबारांत उभे राहिल्याचीं किंवा इंग्रज सेनानी समशेरी म्यान करून आपल्या फौजेला शरण आल्याचीं दृश्यें ज्यांच्या डोळ्यांपुढून अद्याप नाहींशीं झालेलीं नव्हतीं,—अवघ्या अर्ध शतकापूर्वी घडलेले ते प्रसंग ज्यांच्या अवमानित मनाला गतवैभवाचें स्मरण तीव्रतेनें करून देत होते, त्यांना हा उपदेश जर दुःखावर डागण्या देणारा वाटला असला, तर त्यांत नवल कोणतें ? फार कशाला, खुद्द लोकहितवादींचे वडील हरिपंत देशमुख यांची अशी गोष्ट सांगतात कीं, ज्या एल्फिन्स्टनच्या कारस्थानांमुळें पेशवाई बुडाली, तो पुढें गव्हर्नर झाल्यावर त्याची स्वारी पुण्यांतील देशमुखांच्या वाड्यावरून जेव्हां कधीं जाण्याचा योग येत असे, तेव्हां त्याचें तोंड दृष्टीस पडण्याचा प्रसंग आपल्यावर येऊं नये, म्हणून हरिपंत हे खिडकीकडे पाठ करून बसत असत ! ज्यांच्या वडिलांना पेशवाईचा इतका जाज्वल्य अभिमान होता आणि इंग्रजांनीं जप्त केलेली ज्यांची जहागीर केवळ रावबाजीच्या मध्यस्थीनें परत मिळाली, त्यांनीं हा सारा पूर्वेतिहास विसरून जाऊन परकीय राज्यकर्त्यांना दैवत मानण्याचा उपदेश लोकांना करीत सुटावें, हा केवढा बुद्धिभ्रंश ! परंतु, महाराष्ट्र जरी परतंत्र झाला होता, तरी परप्रत्ययनेय होण्याइतकी मात्र त्याच्या मनाची अवनति झालेली नव्हती. महाराष्ट्रानें शिकण्यासारख्या गोष्टी इंग्रज राज्यकर्त्यांजवळ पुष्कळ होत्या, यांत शंका नाहीं. पण स्वाभिमान न गमावतां दुसऱ्याचे गुण उचलणें निराळें आणि जेत्यांशीं सरूपता मिळविण्याच्या मोहानें स्वाभिमान गमावणें निराळें ! ज्या

राष्ट्राची संस्कृति अनेक युगांवर पसरलेली होती आणि ज्याचे पराक्रम अनेक शतकांनीं पाहिलेले होते, तें राष्ट्र स्वातंत्र्याला मुकलें म्हणून काय स्वत्वावर पाणी सोडावयालाही तयार होईल? आगरकरांना या गोष्टीची जाणीव असल्यामुळेंच त्यांनीं आपली प्राचीन संस्कृति किंवा सारस्वत यांचा कोणी अपमान केलेला कधीं चुकूनही सहन केला नाहीं. पण, इंग्रजी विद्येच्या प्रभावानें मूढ होऊन गेलेल्या लोकहितवादींनीं, संस्कृत विद्येची विटंबना करण्यांत, मेकॉलेवरही मात केली. आगरकरांचें सारें सामाजिक तत्त्वज्ञान त्यांच्या उद्दाम स्वातंत्र्यप्रियतेंतून उत्स्फूर्त झालेलें होतें. उलट लोकहितवादींच्या साऱ्या शतपत्रांचा जन्म त्यांच्या क्रियाहीन स्वत्वशून्यतेच्या पोटीं झालेला होता. दीपज्योतीवर आलेली काजळी काढून टाकतां टाकतां ती ज्योतच अजीबात हातून विझली जावी, तसा त्यांच्या टीकेचा प्रकार झाला. समाजाचे दोष दाखवितां दाखवितां ते इतके अतिरेकाला गेले कीं, त्याचा आत्मप्रत्यय नष्ट करण्याचा अविचार त्यांच्याकडून घडला. त्यांच्या निबंधसंग्रहावरील चिपळूणकरांच्या सबंध टीकेचा कटाक्ष जर कोणत्या गोष्टीवर असेल, तर तो फक्त एवढ्याच. लोकहितवादींच्या आत्मघातकी प्रलापांविषयीं त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

" तुम्ही मूर्ख, तुम्ही पाजी अशी आज सतत तीस वर्षें पुष्पवृष्टि करून लोकांचा तेजोभंग केल्यानें ते असे निस्सत्व होऊन गेले आहेत कीं, आमच्या हातून कांहीं होणें नाहीं, आम्ही जन्माचे रडेच, या कल्पना त्यांनीं उराशीं बाळगल्या आहेत; सरकारच मेहेरबानी करून जर आमचें कांहीं बरें करील तर होईल, एरव्हीं आम्ही लयाच्या पंथाला लागलोंच आहों, हें महत्तत्त्व सर्वांनीं गृहीत केल्यासारखें दिसत आहे. नाहीं म्हणायाला, यथेच्छ मुखपांडित्य तेवढें करावें पण क्रियाद्वारा त्यापैकीं एकही गोष्ट घडली नाहीं तरी चिंता नाहीं, एवढा मात्र उपदेश लोकहितवादी प्रभृतींच्या आचरणावरून पुष्कळांनीं उचललेला दिसतो. "

लोकहितवादींचें नोकरींत गेलेलें आयुष्य, त्यांचा खाजगी आचरणांतील कर्मठपणा, ग्रामण्याच्या वेळीं त्यांनीं घेतलेली माघार, त्यांच्या धर्ममतांतील विलक्षण धरसोड इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या असतां, चिपळूणकरांनीं हे त्यांच्या पांडित्याविषयीं काढलेले उद्गार अतिशयोक्त आहेत, असें कोण म्हणेल ?

याचा अर्थ असा नव्हे कीं, लोकहितवादींच्या मतांत कांहींच ग्राह्य नव्हतें. किंबहुना, त्यांच्या प्रतिपादनांतील अतिशयोक्तीचा भाग जर काढून टाकला, तर त्यांचे विचार काळाच्या कसोटीला बव्हंशीं उतरले आहेत, असेंच म्हणावें लागेल. 'नाना फडणिसाचें शहाणपण,' 'सांप्रतचें पंडितांचें ज्ञान' व 'भटांनीं लावून दिलेलें वेड' हे जे त्यांचे तीन लेख उद्धृत करून, चिपळूणकरांनीं त्यांवर आपल्या टीकेची उभारणी केली आहे, त्यांतील विधानांची जर शांत मनानें छाननी केली, तर लोकहितवादींवर टीका करण्याच्या भरांत स्वतः चिपळूणकरही दुसऱ्या टोंकाला गेले आहेत, असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. नाना फडणिसाविषयीं जीं मतें लोकहितवादींनीं आपल्या पत्रांत व्यक्त केलीं आहेत, त्यांचाच विस्तार 'मराठे व इंग्रज' या ग्रंथांत खरे आणि केळकर यांनीं केलेला आढळतो. लोकहितवादींनीं असें म्हटलें आहे कीं,—

"वास्तविक पाहिलें तर नाना फडणिस हा कांहीं विद्वान नव्हता व त्यास दूरदृष्टि नव्हती. जन्मापासून त्यानें कारभार केला याजमुळें त्याची बुद्धि बरीच होती; व मराठे दरबारचा बंदोबस्त त्याला चांगला करितां येत होता. परंतु मेंढक्यास मेंढ्या वळतां आल्या म्हणून तो कांहीं घोडेस्वार होत नाहीं. इंग्रज लोकांतील कारभारी यांची बुद्धि विशाल, मसलत खोल, अनेक देशींचे वृत्तांत त्यांस माहित व त्यांचें आपसांत एकमत असे. नाना फडणिसाचे ठायीं हें नव्हतें. तो जुन्या चालीचा

ब्राह्मण, त्याची माहिती कमी व आपसांत दुष्टपणा फार होता. त्यानें राज्यांत अधिकाऱ्यांची रचना व पदव्या हें ठरविलें नाहीं. इंग्रजींत एक मेला म्हणजे दुसरा तयार असतो. हा क्रम मराठी राज्यांत नव्हता. त्याचे समीप इंग्रज होते, त्यांचा शोध तरी त्यानें कांहीं करावा, तेंही कांहीं नाहीं. इंग्रजांनीं मात्र सर्व लोकांच्या डोक्यावरले केंस मोजून ठेवले होते."

नाना फडणिसाविषयींच्या लोकहितवादींच्या या अभिप्रायांत खरोखरी वावगें काय आहे? मुत्सद्दी म्हटला, म्हणजे त्याला परराष्ट्रीय घडामोडींचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे. निदान ज्या राष्ट्रांच्या महत्त्वाकांक्षांचा वेध आपल्या देशाला लागलेला त्याला दिसत असतो, त्यांच्या इतिहासाची आणि उद्योगांची तरी त्याला पूर्ण माहिती असणें जरूर आहे. पण नाना फडणिसाला हें ज्ञान नव्हतें. त्याला विश्वासांत घेऊन इंग्रजांनीं टिपूची सलतनत धुळीला मिळविली; व आपला दक्षिण-दिग्विजयाचा मार्ग निष्कंटक केला. टिपूचें मरण ज्या मराठ्यांनीं उघड्या डोळ्यांनीं पाहिलें, त्यांना आपलें मरण त्यामुळें किती जवळ येऊन ठेपलें आहे, याची कल्पना आली नाहीं. इंग्रजांनीं बंगाल आणि मद्रास हे प्रांत कशा रीतीनें काबीज केले, हें नाना फडणिसाला दिसत होतें. पण, स्वतःच्या सोईप्रमाणें राज्यें उभीं आणि उध्वस्त करणाऱ्या इंग्रजांच्या राजकारणाचें रहस्य काय आहे, याचा दूरवर विचार त्या मुत्सद्यानें केला नाहीं. सर्व हिंदुस्थान बुडवून महाराष्ट्रापर्यंत येऊन थडकलेली इंग्रजी सत्तेची सर्वंकष लाट त्यानें कांहीं काळ थोपवून धरली, हीच काय ती त्याची कर्तबगारी. पण, नानासाहेबासारख्या धुरंधर पेशव्याच्या हाताखालीं ज्याला राज्यकारभाराचें शिक्षण मिळालें व सदाशिवराव, रघुनाथराव आणि माधवराव या पेशवाईतील प्रतापी पुरुषांच्या हालचाली आणि उलाढाली ज्यानें जातीनें पाहिल्या होत्या, त्यानें इंग्रजांना मोठ्या शर्थीनें अडवून धरून आजचें मरण

फक्त उद्यांवर ढकलल्याबद्दल त्याच्याविषयीं वाटला तरी कितीसा आदर वाटणार ? अनेक व्यक्तींना ममतेंत घेऊन मसलत पार पाडण्याचें धोरण त्याला साधलें नाहीं. वस्तुतः सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत पानिपतानंतर ढांसळलेली महाराष्ट्राची दौलत पुन्हा सांवरल्यासारखी दिसत होती. अराजकाच्या आपत्तींतून शिवशाहीला उद्धरणाऱ्या त्या बालश्रीमंतांवर तत्कालीन सर्व मराठमंडळ लुब्ध झालेलें होतें. अशा वेळीं राज्यांतील सर्व कर्त्या व्यक्तींचीं मनोगतें आकळून त्यांना मसलतींत गोंवणारा दूरदर्शी, दिलदार आणि देशाभिमानी मुत्सद्दी जर महाराष्ट्रांत निर्माण झाला असता, तर कदाचित्, श्रीहर्षाच्या सेनासमुद्राप्रमाणें, इंग्रजांच्या विजिगीषेची लाटही विंध्याचल ओलांडून पुढें आली नसती. पण, नाना फडणिसाच्या ठिकाणीं हें संघटनाचातुर्य नसल्यामुळें, सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर, इंग्रजांच्या कारवाईचा सुरुंग लागून, त्यानें खूप युक्तीनें राखलेला मराठशाहीचा भव्य मनोरा एकदम ढांसळून पडला ! बापू, मोरोबा, रायरीकर, अहल्याबाई, पाटीलबावा, जिवबादादा बक्षी, परशुरामभाऊ पटवर्धन यांच्याशीं डावपेंच खेळण्यांत त्याची सारी हयात गेली. स्वतःच्या मुठींत राज्यसूत्रें ठेवण्याच्या त्याच्या हव्यासांतून हे अंतःकलह उपस्थित झाले; व त्याची मुत्सद्देगिरी या कलहाग्नींत होरपळून गेल्यामुळें तिचा प्रभाव परराष्ट्रीय राजकारणावर पडला नाहीं. पोर्तुगीज, डच, फ्रेंच आणि इंग्रज हे परदेशांतून आलेले व्यापारी आणि विजिगीषु समाज त्या वेळीं महाराष्ट्रांत सर्वत्र वावरत होते. पण, त्यांचे गुणावगुण, त्यांची संस्कृति आणि शास्त्रज्ञान, त्यांचें कलाकौशल्य आणि यंत्रसामग्री यांचा शोध घेऊन कोणताही नवा उपक्रम नानानें आपल्या राज्यांत केला नाहीं. त्याचा मुलखाचा बंदोबस्त ढिला होता; व, न्या. रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणें, नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दींत प्रजेला जें सुख होतें, तें नाना फडणिसाच्या कारकीर्दींत राहिलें नाहीं. महाराष्ट्राच्या इतिहासांत असा

चमत्कार दृष्टीस पडतो कीं, मराठ्यांचें राज्य सर्व हिंदुस्थानभर पसरत असतां, त्या राज्याला मूलभूत असलेली मध्यवर्ती सत्ता मात्र झपाट्यानें निस्सत्त्व होत चालली होती. कारण, मराठमंडळाचें एकंदर राज्यधोरण पुढें तिखट, मागें पोंचट अशा प्रकारचें होतें; व मराठ्यांचें राजकारण जरी फोंफावत होतें, तरी त्यांची राष्ट्रीय नीतिमत्ता खालावत चालली होती. मराठे सरदारांनीं राज्याच्या शत्रूंपासूनही जहागिरी संपादन केल्या. आणि, मोहिमांच्या पायीं झालेल्या कर्जांत पेशव्यांची दौलत बुडून गेली असतां, मुलूख मारून मातबर झालेल्या या त्यांच्या सरदारांचे खजिने मात्र तुडुंब भरलेले होते ! नाना फडणिसाच्या कारकीर्दींत या पोंचटपणाची परमावधि होऊन मराठशाही आंतून पोंखरल्यासारखी झाली. लोकहितवादींनीं झालें तरी त्याच्या याच दोषांचें वर्णन, आपल्या स्वभावानुसार थोड्या फटकळपणानें, केलें आहे, एवढेंच. अशा स्थितींत, चिपळूणकरांनीं केलेलें त्यांच्या लेखाचें खंडन कितीही आवेशपूर्ण असलें, तरी तें मनाला कसें पटावें ?

'सांप्रतचें पंडितांचें ज्ञान' व 'भटांनीं लावून दिलेलें वेड' या लेखांत लोकहितवादींनीं जुन्या विद्येवर, अध्ययनपद्धतीवर व धार्मिक समजुतींवर कोरडे उडविलेले आहेत. या त्यांच्या टीकेंत, कांहीं बाबतींत तरी, विवेका-पेक्षां विकाराचेंच प्राबल्य अधिक दिसतें. त्यांना मराठ्यांच्या इतिहासाचें जसें अंशतः तरी मार्मिक ज्ञान होतें, तसें प्राचीन इतिहासाचें आणि संस्कृत वाङ्मयाचें असेल, असें वाटत नाहीं. दयानंद सरस्वतींवर त्यांची बरीच भक्ति होती; व त्यामुळें त्यांच्या विक्षिप्त मतांचाही अनुवाद ते पुष्कळदां करित असत. 'ऋषींची कारकीर्द' हा त्यांच्या लिखाणांत आणि भाषणांत आढळणारा विलक्षण शब्दसमुच्चय या त्यांच्या प्रवृत्ती-चाच निदर्शक आहे. आपण वापरीत असलेल्या या शब्दसमुच्चयाच्या पोटीं काय गौडबंगाल भरलेलें आहे, याची जाणीव त्यांना होती कीं नाहीं कोण जाणे ! ऋषींच्या कारकीर्दीचें हें खूळ त्यांनीं अर्थातच

वेदैकपक्षपाती दयानंदांपासून उचललें होतें. पण, त्यांनीं चालविलेला हा आर्ष युगाचा बडेजाव किती निरर्थक होता, हें डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांनीं 'सणांत शिमगा आणि वेदांत पुराणें' व 'वेद आणि पुराणें' या आपल्या 'सुबोधपत्रिके'तील लेखांतून त्याच वेळीं सिद्ध केलें होतें. परंतु, लोकहितवादींचीं प्राचीन वाङ्मय आणि इतिहास यांच्यावरील मतें जरी आक्षेपार्ह असलीं, तरी त्यांचा जुन्या पंडितांवरील अभिप्राय मात्र फारसा अयोग्य वाटत नाहीं. जुन्या पद्धतीनें पढलेल्या शास्त्रिमंडळीचें त्या त्या विषयांतील प्रावीण्य एका परीनें आश्चर्यकारक असतें, हें खरें. पण त्यांच्या त्या ज्ञानाचा उपयोग समाजाला एकंदरींत थोडाच होतो. नवीन पद्धतीनें शिकलेल्या विद्वानांचें अध्ययन त्यांच्या पांडित्याइतकें गाढ कदाचित् नसेलही. पण, त्यांच्या उथळ बहुश्रुतपणाचा जितका उपयोग समाजाला होतो, तितका या विद्यावारिधींचा होत नाहीं, हें मात्र निस्संशय. शिवाय, एकाच विषयाच्या व्यासंगानें बुद्धीला जो कोतेपणा येतो, तोही नवीन सुशिक्षितांच्या ठिकाणीं दृष्टीस पडत नाहीं. त्यांच्या विद्येंत सतत भर पडत असते व त्यामुळें त्यांच्या बुद्धीचाही विकास सदैव होत असतो. अभ्यासजडता आणि तदुद्भूत बुद्धिमांद्य त्यांच्या ठिकाणीं प्रायः नसतें. सारांश, जमिनींत पुरून ठेवलेली संपत्ति व पेढींतील खेळतें भांडवल यांत जो फरक, तोच जुन्या व नव्या पंडितांच्या विद्येंतही. किंवा, अनेक नद्यांचें उदक जिच्या ओघांत एकवटलेलें आहे व अनेक प्रदेशांतून जी संचार करिते, अशा नदीप्रमाणें नवीन विद्वानांची बहुश्रुतता असून, एकाद्या शहराला पाणीपुरवठा करणाऱ्या प्रचंड तलावाप्रमाणें जुन्या शास्त्रिमंडळीचें पांडित्य असतें, असेंही म्हटलें तरी योग्य होईल. खुद्द चिपळूणकरांनाही जुन्या पंडितांच्या ज्ञानाचा निरुपयोग आणि त्यांच्या समजुतींचा कोतेपणा यांची जाणीव नव्हती, असें नाहीं. 'संस्कृत कविपंचका'ची प्रस्तावना व 'विद्वत्त्व आणि कवित्व' हा निबंध यांत जुन्या पंडितांचे हे दोष त्यांनीं

स्पष्ट शब्दांनीं दाखविलेले असून, त्यांच्या अभ्यासजडतेची थोडी कुचेष्टाही केली आहे. तेव्हां, लोकहितवादींनीं घेतलेल्या त्याच प्रकारच्या आक्षेपांचें त्यांनीं केलेलें खंडन त्यांच्या दुरभिमानाचें द्योतक आहे, असें कां म्हणूं नये ? हीच स्थिति 'भटांनीं लावून दिलेलें वेड' या लेखावरील टीकेची. भिक्षुकांच्या कल्पक बुद्धीनें उत्पन्न केलेले पूजाप्रकार, व्रतवैकल्यें, तीर्थक्षेत्रें इत्यादि धार्मिक खुळें व त्यांचा गतानुगतिक समाजाच्या सश्रद्ध मनावर झालेला अनिष्ट परिणाम लक्षांत घेतला, ह्मणजे स्वतःप्रमाणेंच लोकांच्याही अवनतीला कारण झालेल्या या धर्मपुत्रांचा अगदीं वीट येतो. डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांनीं आपल्या शैव आणि वैष्णव पंथांवरील ग्रंथांत कांहीं विचित्र पूजाविधींचें वर्णन केलें आहे. ते बीभत्स पूजाप्रकार म्हणजे धर्माच्या विडंबनाला कारण झालेलीं भिक्षुकांच्या विकृत कल्पकतेचीं केवळ प्रतीकेंच होत ! महाराष्ट्राचा शेवटचा स्वतंत्र नृपति रामदेवराव याचा करणाधिप हेमाद्रि यानें 'चतुर्वर्गचिंतामणि' हा ग्रंथ लिहिलेला असून, त्यांत सर्व धार्मिक विधिविधानांचें सविस्तर निरूपण केलें आहे. या ग्रंथाचे व्रतखंड, दानखंड, तीर्थखंड व मोक्षखंड असे चार भाग आहेत. आठव्या खंडाच्या प्रस्तावनेंत या ग्रंथाविषयीं इतिहासाचार्य राजवाडे यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

"हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि हा ग्रंथ तपासून पाहिला असतां वर्षाच्या ३६५ दिवसांत एकंदर दोन हजार व्रतें व जपजाप्य विधि सांगितले आहेत. कोणत्या देवाचीं कोणतीं व्रतें करावीं, त्या व्रताला कोणतीं पक्वान्नें घालावीं, किती ब्राह्मणांचें भोजन घालावें, इत्यादि बाबतींचा निर्णय शास्त्रांतील उतारे देऊन हेमाद्रीनें मोठ्या गंभीरपणानें केला आहे. अर्थात् लौकिकांत जे प्रचार होते, त्यांचाच संग्रह करून हेमाद्रीनें आपला ग्रंथ बनविला. इकडे भक्तीचा, जात्यैक्याचा, निष्काम कर्माचा उपदेश साधुसंत करीत होते, तर समाजांत पक्का-

न्नांचा व ब्राह्मणभोजनांचा सपाटा चालू होता. असे व्रतैकदृष्टि व सुखपरायण लोक ऐदी बनले असतां, त्यांस साहसी, निग्रही व काटक मुसलमानांनीं तेव्हांच जिंकिलें. ”

लोकहितवादींनीं तरी दुसरें काय म्हटलें आहे ? भिक्षुकांनीं निर्माण केलेल्या या धार्मिक गुलामगिरीचे परिणाम आजही आम्हांला भोंवत आहेत. पाश्चात्य देशांतील व विशेषतः इंग्लंडांतील भिक्षुकवर्गाकडे बोट दाखवून चिपळूणकरांनीं लोकहितवादींच्या लेखाचें खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. पण, पाश्चात्य राष्ट्रांत भिक्षुकशाहीचें प्रस्थ कितीही असलें, तरी तेवढ्यावरून हिंदुस्थानांतही तें चालू रहावें, असें म्हणणें कितपत योग्य ठरेल ? संस्कृत कवींच्या शृंगारलोलुपतेवर किंवा मोरोपंतांच्या पुराणकथनावर लोकहितवादींनीं केलेली टीकाही अगदीं समर्पक वाटते. त्यांच्याशिवाय दुसऱ्या एकाद्या देशाभिमानी लेखकानें जर अशा प्रकारची टीका जुने पंडित, भिक्षुक किंवा कवि यांच्यावर केली असती, तर चिपळूणकरांनीं तिचा इतका राग खाचित मानला नसता. पण, लोकहितवादींचें सारेंच विवेचन स्वाभिमानशून्यतेनें इतकें डागळलेलें होतें कीं, त्याचें खंडन करितांना चिपळूणकरांना दुरभिमानी होण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं !

लोकहितवादींवरील निबंधाची पूर्तता ‘ आमच्या देशाची स्थिति ’ या निबंधानें झाली. त्यांच्या निबंधसंग्रहावर टीका करण्याच्या मिषानें चिपळूणकरांनीं पर्यायानें तत्कालीन पुढाऱ्यांच्या प्रतिगामी मतांचें खंडन केलें होतें. त्यामुळें देशाच्या उन्नतीविषयींचे आपले विचार विशद करणें त्यांना एका परीनें अपरिहार्य होऊन बसलें. शिवाय, त्यांच्या निबंधांतून जें एक प्रकारचें मतवैचित्र्य किंबहुना मतविसंगतीही क्वचित् दिसून येत असे, तिचा समन्वय लावण्यासाठींही त्यांना आपल्या मतांची पद्धतशीर मांडणी करण्याची आवश्यकता वाटली.

आणि त्यांत आश्चर्य कसलें? मालेच्या रूपानें चालविलेल्या साप्ताब्दिक सत्रांत अनेक दुर्मतांचें हवन सत्यदेवतेच्या प्रीत्यर्थ केल्यानंतर, देशोद्धाराच्या ज्या अभिनव मंत्राचा साक्षात्कार त्यांच्या मनाला झाला होता, त्याची घोषणा अवभृथस्नानाच्या वेळीं करण्याची इच्छा त्यांना व्हावी, हें साहजिकच होतें. ते स्वतः जरी सुधारक होते, तरी त्या वेळच्या इतर सुधारकांप्रमाणें स्वसंस्कृतीवरील त्यांची श्रद्धा विचलित झालेली नसल्यामुळें, नावीन्याच्या अभिनिवेशानें तिची कोणी विटंबना केलेली त्यांना कधीं सहन झाली नाहीं. त्यामुळें त्यांच्या लेखांत जुन्याचा कडवा अभिमान दिसत नाहीं किंवा नव्याचा उतावळा पुरस्कारही पण असत नाहीं. त्यांची भूमिका ही परकीयांच्या विचारांतील, वाङ्मयांतील आणि वर्तनांतील सदंश तेवढा उचलणाऱ्या स्वाभिमानी सुधारकाची होती. अर्थात् त्या वेळीं समाजांत जुन्या किंवा नव्या मतांच्या ऐकांतिक अभिमान्यांचे जे दोन पक्ष पडलेले होते, त्यांपैकीं कोणत्याच पक्षांत गणले जाण्यासारखी त्यांची मनोवृत्ति नव्हती. म्हणून त्यांनीं या निबंधाच्या आरंभीं असे उद्गार काढले आहेत कीं,—

"सत्य हें एकाच राष्ट्राला, एकाच धर्माला, एकाच पक्षाला अनुसरून असतें असें नाहीं. तर अशोधित धातूंत जसे सुवर्णरज यदृच्छेनें मिसळलेले असतात, व रसायनव्यापारांनीं त्यांचें पृथक्करण करून ते वेगळे काढावे लागतात, त्याप्रमाणेंच सत्याचीही गोष्ट होय. त्याचे अंश ज्यांत मिश्रित झाले नाहींत असा प्रायः कोणताही पक्ष नाहीं. यास्तव एकाच पक्षाचा दृढ अभिमान धरणें हा दुरभिमान होय. तर लोकांत यथार्थ ज्ञानाचा प्रसार करण्याचें काम जो पतकरील त्यानें केवळ एका सत्याचीच ओळख ठेवली पाहिजे."

तथापि, स्वदेश हा त्यांना सत्यापेक्षांही प्रियतर असल्यामुळें, त्याच्याविषयीं विचार करितांना त्यांचें वस्तुस्थितीचें भान पुष्कळदां हरपून

जात असे. किंबहुना मातृभूमीवरील आत्यंतिक प्रेमामुळें त्यांच्या देशाभिमानाचें पर्यवसान दुरभिमानांत झालें होतें म्हटलें तरी शोभेल. त्यामुळें, या निबंधांत स्वदेशाच्या अधोगतीची मीमांसा करितांना, त्यांना तिच्या मूळाशीं स्वकीयांचें कोणतेंही वैगुण्य न दिसून, त्यांनीं केवळ दैवाच्या माथीं त्याच्या दुर्दशेचें खापर फोडलें आहे. पण, स्वजनांना नालायख ठरविणाऱ्या सुधारकांच्या मतांइतकीच चिपळूणकरांची ही देशस्थितीची मीमांसाही एकांगी वाटते. स्वतःच्या दुर्गतीबद्दल निव्वळ दैवाला जबाबदार धरणें, ही एक तऱ्हेची आत्मवंचनाच होय. व्यक्तीला काय किंवा राष्ट्राला काय, केवळ कालगतीनेंच जर विपदवस्था प्राप्त होत असेल, तर मग मानवी प्रयत्नांची मातब्बरी ती काय राहिली ? राष्ट्राच्या जीवनांत वैभवाची भरती ओहटी ही क्रमप्राप्त आहे असें मानलें, तरी तिच्याबद्दल केवळ दैवावर हवाला देऊन कसें चालेल ? कोणत्याही राष्ट्राच्या अपकर्षाचीं कारणें हीं त्याच्या स्वतःच्या वर्तनांतच शोधिलीं पाहिजेत. मराठ्यांच्या अधःपाताला इतर कोणत्याही कारणापेक्षां त्यांची देशाभिमानशून्यताच अधिक कारण झाली. महादजी शिंदे हा क्लाइव्हपेक्षां शूर असेल किंवा नाना फडणिस हा हेस्टिंग्जपेक्षां धूर्त असेल. पण, त्या दोघांच्या ठिकाणीं जी उत्कट देशभक्ति वसत होती, तिचा एक शतांशही महादजी किंवा नाना यांच्या ठिकाणीं नव्हता. महादजीला बादशहापासून किंवा नानाला निजामापासून स्वतःसाठीं वेगळे सरंजाम संपादन करितांना यत्किंचितही शंका वाटली नाहीं. उलट, क्लाइव्ह आणि हेस्टिंग्ज यांनीं जरी प्रसंगविशेषीं स्वतःची तुंबडी भरून घेतली असली, तरी स्वहितापेक्षां देशहित हें त्यांनीं सदैव श्रेष्ठ मानलें. त्यामुळें वखारी काढण्यासाठीं घेतलेल्या जमिनीच्या टीचभर तुकड्यांतून त्यांना राज्यें निर्माण करितां आलीं आणि वखारींच्या रक्षणासाठीं ठेवलेल्या हिंदी शिपायांच्या मूठभर शिबंदींतून फौजा उत्पन्न करितां आल्या. मराठ्यांप्रमाणें इंग्रजांच्याही राज्याचे कलकत्ता, मुंबई आणि मद्रास

असे तीन मोठाले सुभे होते; व त्यांच्या अधिपतींतील मतभेदही केव्हां केव्हां अगदीं विकोपाला जात असत. पण, मराठ्यांशीं किंवा मुसलमानांशीं लढण्याचा प्रसंग ज्या ज्या वेळीं आला, त्या त्या वेळीं त्यांनीं एकवटून शत्रूंशीं झुंज दिलें. उलट, इंग्रजांच्या वर्धिष्णु सत्तेविरुद्ध संघटित उठावणीचा जो प्रयत्न नाना फडणिसानें एकवार करून पाहिला, तो नागपूरचे भोसले हेस्टिंग्जला फितूर झाल्यामुळें फसून, मराठमंडळांत किती लीलेनें फूट पडूं शकते, ही गोष्ट मात्र इंग्रजांना कळून आली. इंग्रजांनीं आपल्या नेतृत्वाखालीं मराठा सैनिकांचीं पलटणें तयार करून त्यांच्या मर्दुमकीच्या जोरावर मराठशाही बुडविली. उलट, महादजीनें लक्षावधि रुपये खर्चून उभारलेल्या गोऱ्या सैनिकांच्या कवाइती कंपूंनीं, इंग्रजांशीं लढण्याची पाळी येतांच, वर्णाभिमानाला जागून दौलतरावाला बेलाशक दगा दिला. अशा स्थितींत, "आमच्या राष्ट्राला जी विपत्तीची स्थिति प्राप्त झाली आहे, ती कांहीं आमच्या अंगच्या अनिवार्य दोषांमुळें नव्हे," हें चिपळूणकरांचें विधान कोण ग्राह्य मानील?

खुद्द चिपळूणकरांनाही आपल्या लोकांच्या देशाभिमानशून्यतेची जाणीव नव्हती, असें नाहीं. कारण याच सुमारास लिहिलेल्या 'केसरी'-मधील आपल्या देशोन्नतीवरील लेखांत त्यांनीं अशी स्पष्ट कबुली दिली आहे कीं, "इकडील देशांतून देशाभिमान ही मनोवृत्तिच म्हणण्यासारखी लोकांस माहित नाहीं." देशाभिमानाच्या अभावाप्रमाणेंच बदलत्या कालमानानुसार स्वतःचें धोरण न बदलण्याची हिंदु समाजाची प्रवृत्ति आणि त्याच्या विघटनेला कारण झालेला जातिभेद यांनींही या देशाची कांहीं कमी हानि केली आहे, असें नाहीं. परंतु, यांपैकीं कोणतेंही कारण चिपळूणकरांना न दिसून, आपला देश केवळ यदृच्छेमुळें परतंत्र झाला असें त्यांनीं म्हणावें, हा तरी दुरभिमानाचाच एक प्रकार नव्हे काय? त्या दृष्टीनें जरी या निबंधांतील विवेचन एकांगी असलें, तरी इंग्रजांच्या साहचर्यामुळें झालेले हिंदुस्थानाचे फायदे,

इंग्रजी राज्यपद्धतीचे गुणविशेष व इंग्रजी विद्येचें स्वातंत्र्याची स्फूर्ति देण्याचें सामर्थ्य यांचें त्यांनीं केलेलें वर्णन अत्यंत मार्मिक आहे. विशेषतः, इंग्रजी विद्येला एकदां वज्राची तर एकदां वाघिणीच्या दुधाची उपमा देऊन त्यांनीं या निबंधांत तिचा इतका गौरव केला आहे कीं, तो पाहून इंग्रजी शिक्षण अट्टाहासानें हिंदुस्थानांत सुरू करणाऱ्या मेकॉलेच्या अंगावर कृतकृत्यताबुद्धीनें खचित रोमांच उठले असते ! इंग्रजी अमदानींत झालेल्या भौतिक सुधारणांचें त्यांनीं केलेलें वर्णन जितकें उज्ज्वल आहे, तितकेंच लोकांच्या तेजोवधाचें त्यांनीं केलेलें विवेचन भीषण आहे. पारतंत्र्यामुळें झालेला हिंदी संस्थानिकांच्या कर्तृत्वाचा कोंडमारा व त्यांना आलेलें विलक्षण दैन्य यांचें त्यांनीं रेखाटलेलें शब्दचित्र इतकें उपरोधपूर्ण आहे कीं, तें वाचून कोणाच्याही हृदयाला पीळ पडल्याशिवाय रहाणार नाहीं. इंग्रजी राज्याच्या वास्तविक स्वरूपाची ही जी विदारक चिकित्सा त्यांनीं या निबंधांत केली आहे, ती त्या काळांत तरी लोकांना अपूर्वच वाटली असेल. कारण, इंग्रजी राज्य हें केवळ ईश्वरी वरदान आहे, हाच महामंत्र त्या वेळीं, व्यासपीठांवरून आणि वर्तमानपत्रांतून, बहुजनसमाजाच्या कानांवर सतत पडत होता. तेव्हां, स्वातंत्र्यनाशाच्या अघोर दुष्परिणामांचें सोपपत्तिक विवेचन करून, या देशावर सत्ता गाजविण्यांत इंग्रजांचा स्वार्थसाधनाशिवाय अन्य कोणताही उद्देश नाहीं, असें ज्या वेळीं चिपळूणकरांनीं जाहिर केलें, त्या वेळीं स्वतःला त्या सत्तेचे आधारस्तंभ समजणाऱ्या तत्कालीन पुढाऱ्यांच्या मनाची अवस्था काय झाली असेल ! ब्रिटिश राज्यनीतीचें खरें स्वरूप लोकांच्या निदर्शनाला आणून पारतंत्र्याची दारुण अनिष्टता जर त्यांच्या मनावर प्रथम कोणी बिंबविली असेल, तर ती चिपळूणकरांच्या या निबंधानेंच; व म्हणूनच महाराष्ट्राच्या राजकीय विचारांत क्रांति घडवून आणल्याचें श्रेय त्यांना देण्यांत येतें. त्या दृष्टीनें या निबंधाचें महत्त्व अनन्य आहे. हिंदुस्थानाची भावी राज्यघटना

कोणत्या प्रकारची असावी, याबद्दल चिपळूणकरांनीं त्यांत कांहींच मत व्यक्त केलेलें नाहीं. पण, त्यांचे सहकारी आगरकर यांनीं, ‘ केसरीं ’त त्यांच्यावर लिहिलेल्या मृत्युलेखांत, असे उद्गार काढले आहेत कीं,—

“ एकाद्या वेळेस त्यांचा कल्पनाविहंग पूर्ण पंख पसरून भराऱ्या मारूं लागला, म्हणजे त्याला हिंदुस्थान देश स्वतंत्र होऊन प्रजासत्ताक राज्याखालीं सुखानें नांदत आहे, असें दिसे.”

चिपळूणकरांच्या प्रतिभेची भरारी प्रसंगीं कोठपर्यंत जात असे, हें या उद्गारांवरून कळून येतें. परंतु, त्यांचा कल्पनाविहंग एरवीं कितीही उद्दाम असला, तरी अस्मानांत मंडळें घेणारा गरुड हा ज्याप्रमाणें घरटें बांधण्यासाठीं डोंगराच्या कड्याचा आश्रय घेतो, त्याप्रमाणें स्वातंत्र्यप्राप्तीकरितां त्यांनीं सुचविलेले उपाय मात्र अतिशय व्यवहार्य असेच आहेत. रणांगणावर प्रत्यक्ष सामना देऊन स्वातंत्र्य परत मिळविण्याची शक्यता त्यांना कधींही वाटली नाहीं; व फडके यांच्या बंडखोरीच्या उद्योगाचा त्यांनीं मालेंतून उघड उघड उपहास केलेला आढळतो. परंतु, त्याबरोबरच त्यांच्या मनाची अशी पक्की खात्री होऊन चुकली होती कीं, जगाच्या राजकारणाला नवीन वळण लावित असलेलीं स्वातंत्र्य आणि लोकप्रभुत्व यांचीं क्रांतिकारक तत्वें अखेर हिंदुस्थानाच्याही दास्यमोचनाला कारण झाल्याशिवाय रहाणार नाहींत. लोकहितवादींना ज्याप्रमाणें इंग्रजांचा अंमल हा हिंदुस्थानाच्या उन्नतीचा पर्वकाळ वाटला, त्याप्रमाणें चिपळूणकरांना लोकसत्तेचा प्रसार हें त्याच्या अभ्युदयाचें प्रसादचिन्ह वाटलें. म्हणून, देशाच्या उन्नतिसाठीं जो उपाय त्यांनीं या निबंधाच्या समारोपांत सुचविला, तोही लोकसत्तेच्या विकासाला पोषक असाच होता. हा उपाय म्हणजे, शाळा, व्याख्यानें, ग्रंथमाला, वर्तमानपत्रें इत्यादि साधनें उपयोगांत आणून, लोकांना आत्मस्थितीचें ज्ञान करून देणें. त्यांनीं सुचविलेला हा देशोन्नतीचा उपाय वाचून दादाभाई नौरोजी यांनीं स. १९०६ सालीं

राष्ट्रीय सभेला केलेल्या ज्ञानप्रसाराच्या आदेशाची आठवण झाल्याविना रहात नाहीं. किंबहुना, गेल्या अर्ध शतकाचा हिंदी राजकीय चळवळीचा इतिहास लक्षांत घेतला असतां, चिपळूणकरांनीं जगांत जारीनें पसरत चाललेल्या लोकप्रभुत्वाच्या तत्त्वावर आणि ज्ञानप्रसाराच्या साधनावर दिलेला भर किती योग्य होता, याची उत्तम कल्पना येते. हा निबंध म्हणजे चिपळूणकरांचें एका परीनें राजकीय मृत्युपत्रच असून, त्यांतील बहुतेक विवेचन मोठें समतोल आणि सयुक्तिक आहे. पण, १९०७-८ सालच्या दडपशाहीच्या काळांत सरकारची वक्र दृष्टि या निबंधावर पडून, ता. ११ एप्रिल १९१० रोजीं तो, त्या वेळीं नुकत्याच अमलांत आलेल्या वर्तमानपत्रांच्या कायद्यानुसार, जप्त करण्यांत आला.

तथापि, हा निबंध त्यांच्या जॉनसन किंवा लोकहितवादी यांच्यावरील निबंधांइतका सर्वस्पर्शी नसून, त्याचा उपसंहार तर अगदीं घाईनें केल्यासारखा दिसतो. कदाचित् तो लिहित असतांनाच त्यांना एकाएकीं आजारानें गांठल्यामुळें त्यांनीं त्याचा शेवटचा भाग कसा तरी हातावेगळा केला असावा. कारण त्याचे अखेरचे दोन हप्ते प्रसिद्ध होण्यापूर्वींच त्यांचें देहावसान झालें. वस्तुतः, त्यांची प्रकृति अशक्त किंवा रहाणी अनियमित होती, असें नाहीं; व त्यांचे वडील कृष्णशास्त्री यांना लाभलेली चौपन वर्षांची आयुर्मर्यादा लक्षांत घेतां, त्यांच्यावर काळाचा घाला वयाच्या अवघ्या बत्तिसाव्या वर्षीं पडावा, याबद्दल विस्मय वाटल्याशिवाय रहात नाहीं. पण, वयाच्या अठराव्या वर्षापासून मराठी भाषेच्या ऊर्जितासाठीं जे अतिरिक्त श्रम त्यांनीं सतत चौदा वर्षें केले, त्यामुळेंच बहुधा त्यांच्यावर ऐन तारुण्यांत मृत्युमुखीं पडण्याचा प्रसंग आला. या अवधींत त्यांनीं चार वर्षें शालापत्रकाचें संपादन केलें, निबंधमाला सात वर्षें चालविली, चित्रशाळा, किताबखाना, न्यू इंग्लिश स्कूल वगैरे नवीन संस्था स्थापन केल्या व महाराष्ट्राला आत्मस्थितीचें

ज्ञान करून देऊन निस्स्वार्थ देशसेवेची नवीन परंपरा सुरू केली. आकाशगंगेचा ओघ जसा अनेक एकाहून एक तेजस्वी तारकापुंजांनीं संपन्न झालेला असतो, तसें त्यांचें आयुष्य अनेक एकाहून एक उज्ज्वल प्रसंगांनीं समृद्ध झालेलें आहे. पण या उज्ज्वलतेनेंच अखेर त्यांची आहुति घेतली. नुसतें निबंधमालेच्या संपादनाचें कार्य जरी घेतलें, तरी तेंही इतकें बिकट होतें कीं, त्यांनीं केवळ एकट्याच्या जोरावर तें इतक्या यशस्वितेनें कसें पार पाडलें, याचें आश्चर्य वाटतें. आणि मालेच्या शेवटच्या अंकांत त्यांनीं स्वतःविषयीं काढलेले धन्योद्गार आपल्याही अंतःकरणांत आपोआप प्रतिध्वनित होतात. मालेचा उपसंहार करितांना त्यांनीं असें म्हटलें आहे कीं,—

" गेल्या आठ वर्षांत सदरील पुस्तकाचा जो आम्ही अव्याहत उद्योग केला, त्याला आमच्याच देशांत काय, पण पाश्चात्य देशांतही तोड सांपडणार नाहीं, असें म्हटलें असतां गर्वोक्ति केल्याचा दोष माथीं येईल, असें आम्हांस वाटत नाहीं. मासिक किंवा त्रैमासिक पुस्तकाची स्थिति पाहिली, तरी येवढा डोलारा कोणी एकट्यानेंच शिरीं वागवला आहे, असें आम्हांस तर अद्याप कोठें आढळलें नाहीं. केवळ भाषांतररूप किंवा प्रकाशनरूप पुस्तक असलें, तर वरील गोष्ट सुसंभाव्य आहे. पण, स्वतंत्र निबंधरचनेचा विचार केला असतां ती पद्धति वरच्याहून किती भिन्न आहे, हें कोणाच्याही सहजगत्या लक्षांत येणारें आहे. असलें काम म्हटलें म्हणजे चार चौघांचे जेव्हां हात लागतील तेव्हां तें उठायाचें ! तर हें बहुजनसाध्य कार्य आम्ही स्वतःच अंगीकारलें असतां,.......कोणापाशीं एक छदाम किंवा एक ओळही न मागतां,... हें महासत्र संपवून आज अवभृथस्नानाला मोकळे होणार, हीच विशेष गोष्ट. "

ही त्यांची गर्वोक्ति यथार्थ नाहीं, असें कोण म्हणेल ? विद्येला जसा विनय तसा पराक्रमाला गर्व शोभाच देतो. उन्मत्त क्षत्रियांचा निःपात

करणाऱ्या एकाकी परशुरामाप्रमाणें ज्यानें दुर्मतांचा उच्छेद इतक्या धडाडीनें केला, त्याच्या तोंडून, हातांतील शस्त्र खालीं ठेवतांना स्वतःच्या श्रमांचें सार्थक झाल्याबद्दल कौतुकाचे शब्द बाहेर पडावे हें स्वाभाविक नाहीं काय? पण, निबंधमाला चालविण्यासाठीं हे जे विलक्षण कष्ट त्यांनीं घेतले, त्यामुळें त्यांना एक प्रकारचा थकवा आल्यासारखा झाला; व रत्नागिरीला बदली झाल्यापासून तर त्यांना मालाग्रथनाचें काम उत्तरोत्तर अधिक दुर्धर वाटूं लागलें. आपली शक्ति क्षीण होत असल्याची व शरीर सुटत चालल्याची जाणी वही त्यांना प्रथम रत्नागिरीलाच झाली. आणि, नोकरी सोडल्या नंतर शेवटच्या दोन वर्षांत त्यांच्या मागचे व्याप आणि संताप हे दोनीही बेसुमार वाढत जाऊन, अखेर माला बंद करण्याचा निश्चय त्यांना करावा लागला. परंतु, त्यांनीं हा निश्चय करावयाला व त्यांना मरण यावयाला एकच गांठ पडली. जणुं कांहीं निबंधमालेबरोबरच त्यांचें अवतारकार्यही संपलें. आणि तो निश्चय मालेंतून जाहिर होण्यापूर्वींच त्यांचा अंत झाला. ता. १६ जानेवारी रोजीं ते लष्करांत फोटो काढावयाला गेले असतां, त्यांना कॅमेऱ्या समोर उन्हांत बराच वेळ उभें रहावें लागल्याचें निमित्त होऊन, ते घरी येऊन एकदम खालीं पडले. तेव्हांपासून ते सारखे थोडेबहुत आजारीच होते तथापि त्यांचा लेखनाचा व्यवसाय मात्र नेहमींप्रमाणें चालू होता 'मुद्रणस्वातंत्र्य' आणि 'देशोन्नति' या विषयांवरील त्यांचे 'केसरीं'त प्रसिद्ध झालेले लेख त्यांनीं या आजाराच्या दिवसांतच लिहिलेले असून 'आमच्या देशाची स्थिति' या निबंधाचा उत्तरार्धही त्यांनीं बहुधा या वेळीं लिहिला असावा. अशा रीतीनें शारीरिक व्याधीनें त्यांचें मन आधीं अस्वस्थ असतांना, कोल्हापूरचे दिवाण रा. ब. माधवराव बर्वे यांच्या केसरी–मराठा पत्रांवरील फिर्यादीच्या रूपानें, त्याला अधिकच अस्वस्थ करणारी आपत्ति अचानक ओढवली. परंतु, आपली प्रकृति झपाट्या

खालावत चाललेली दिसत असतांना सुद्धां, त्यांनीं कोणत्याही प्रकारचे वैद्यकीय उपचार केले नाहींत. अखेर, अंगांत ताप असतांना खाल्लेला कलिंगडाचा तुकडा बाधून, ता. १७ मार्च १८८२ रोजीं पहाटे ५॥ वाजतां त्यांना देवाज्ञा झाली. ता. १४ मार्चच्या 'केसरीं'त त्यांचा देशोन्नतीवरील अग्रलेख आला होता; व ता. २१ मार्चच्या 'केसरीं'त त्यांचा मृत्युलेख प्रसिद्ध झाला! मरणाच्या आधीं दोन दिवसपर्यंत त्यांचे बहुतेक उद्योग नेहमींप्रमाणें चाललेले असल्याकारणानें हा प्रसंग लोकांना इतका अनपेक्षित वाटला कीं, कोल्हापूर प्रकरणामुळें हाय खाऊन चिपळूणकरांनीं आत्महत्या केली, अशी कंडी शहरांत उठली. पण ती अर्थातच निराधार होती. त्यांच्या या अकालिक निधनाबद्दल सारा महाराष्ट्र हळहळला. न्या. रानडे हे या वेळीं मुंबईस होते. त्यांच्या कानांवर ही दुष्ट वार्ता जातांच, त्यांचे डोळे अश्रूंनीं भरून येऊन, ते उद्गारले, "हातीं घेतलेलीं कामें तशींच अर्धवट टाकून देऊन त्यांनीं इतक्या लवकर इहलोक सोडावयाला नको होता! (He had no business to die so soon.)" न्यायमूर्तींच्या नेत्रांतून पडलेल्या या अश्रूंत आणि मुखांतून निघालेल्या या उद्गारांत साऱ्या महाराष्ट्राचें दुःख व्यक्त झालेलें होतें, असें कोण म्हणणार नाहीं?

चिपळूणकरांनीं इहलोक सोडल्याला आतां अर्धशतक होऊन गेलें आहे. पन्नास वर्षांच्या या अवधींत महाराष्ट्राच्या एकंदर मनोरचनेंत इतकें विलक्षण स्थित्यंतर घडून आलें आहे कीं, लोकहितवादी हे जर कांहीं यौगिक चमत्कारानें आज कालनिद्रेंतून जागे झाले, तर त्यांना आपल्या भोंवतालची ही सारी बदललेली सृष्टि पाहून खचित वेड्यासारखें होऊन जाईल! महाराष्ट्रांत घडून आलेल्या या मन्वंतराला चिपळूणकरांचें कर्तृत्व बव्हंशीं कारण झालें आहे. त्यांनीं मराठी भाषेविषयींचें सुशिक्षितांतलें अप्रेम नाहींसें केलें, मिशनरींच्या धर्मध्वंसनाच्या वळवळीला आळा घातला, ब्रिटिश राज्यनीतीच्या विदारक स्वरूपाचें आविष्करण केलें, समाजांत आत्मप्रत्ययाची स्फूर्ति उत्पन्न केली व

देशसेवेला सर्वस्वानें वाहून घेण्याचा गुरुमंत्र महाराष्ट्राला दिला. शनिवार वाड्यावर तांबडा बावटा चढल्यापासून बौद्धिक गुलामगिरीचें जें तमोयुग महाराष्ट्रांत सुरू झालें, त्याचा प्रतिषेध जर यशस्वी रीतीनें प्रथम कोणी केला असेल, तर तो चिपळूणकरांनींच होय. अर्थात् त्यांच्या या प्रतिकाराच्या उद्योगाला प्रारंभ झाल्या क्षणापासूनच त्यांचे टीकाकार किंबहुना शत्रु चोंहों बाजूंनीं उभे राहिले. आणि हे शत्रु कांहीं सामान्य नव्हते. राज्यकर्त्यांच्या सत्तेशीं किंवा संस्कृतीशीं समरस झालेला असा जो एक लब्धप्रतिष्ठांचा वर्ग एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत उत्पन्न झाला होता, व ज्या वर्गानें त्यांच्या आश्रयानें जवळ जवळ पन्नास वर्षें महाराष्ट्रांत राज्य भोगलें, तो वर्ग साराच्या साराच चिपळूणकरांवर तुटून पडला. राजदरबारीं असलेल्या वजनामुळें समाजाचें नेतृत्व या वर्गाकडे अनायासेंच आलें होतें; व तें टिकविण्यासाठीं प्रेषिताच्या दिमाखानें बिचाऱ्या अज्ञ जनसमाजाला नुसते संदेश सांगण्यापलिकडे त्यांना अधिक कांहीं करावें लागत नसे. त्यांच्या या क्रियाशून्यतेचा परिस्फोट करून, त्यांचें प्रेषितपणाचें अवसान किती पोकळ आहे, ही गोष्ट जेव्हां चिपळूणकरांनीं लोकांच्या प्रत्ययाला आणून दिली, तेव्हां समाजाचे हे स्वयंभू पुढारी त्यांच्याविरुद्ध चवताळून उठले. त्यांना साहजिकच असें वाटलें कीं, आपल्यासारख्या प्रेषितांना आव्हान देणारा, आपल्या नेतृत्वाचा अधिक्षेप करणारा हा बेजबाबदार तरुण कोण ? 'निबंधमालाहितेच्छु' या सहीनें मालेंत प्रसिद्ध झालेलीं वामन आबाजी मोडक यांचीं दोन पत्रें या मनोवृत्तीचीं द्योतक आहेत. चिपळूणकरांचें कार्य विध्वंसक असल्याचा प्रवाद याच मंडळीनीं उठविला; व त्याचा अनुवाद वर्षानुवर्ष त्यांचे अनुयायी करीत आलेले आहेत. चिपळूणकरांच्या कार्याचें महत्त्व जितक्या दृष्टींनीं म्हणून नाकारतां येईल, तितक्या दृष्टींनीं तें नाकारण्याचा पद्धतशीर प्रयत्न गेलीं पन्नास वर्षें या आक्षेप-

कांनीं केला आहे. कोणी त्यांच्या विद्वत्तेची कुत्सा केली, कोणी त्यांच्या लेखनशैलीचा उपहास केला, कोणी त्यांच्या मालेला तुच्छ म्हटलें, कोणी त्यांचा स्वार्थत्याग लटका ठरविला, तर कोणी त्यांच्या विचारांत नावीन्य नसल्याचें भासविलें. पण, या साऱ्या टीकेच्या पोटांतलें खरें दुःख जर कोणतें असेल, तर तें हेंच कीं, चिपळूणकरांच्या कर्तृत्वानें या आक्षेपकांनीं श्रेष्ठ मानलेल्या व्यक्तींचें समाजांतील माहात्म्य कमी झालें व त्यांची विचारप्रणाली कायमची मागें पडली. त्या दृष्टीनें चिपळूणकरांच्या कार्यावर त्यांनीं केलेला विध्वंसकपणाचा आरोप खरोखरीच यथार्थ आहे. पण, लोकांत नवीन विचारांचा प्रसार ज्याला करावयाचा असतो, त्याला जुन्या विचारांचा विध्वंस केल्याशिवाय गत्यंतरच नसतें. खुद्द पहिल्या पिढींतील सुधारकांनीं तरी काय केलें होतें ? त्यांनींही समाजांत शतकानुशतकें प्रचलित असलेल्या मतांचा विध्वंस आणि त्यांच्या पुरस्कर्त्यांची विटंबना करण्याचा प्रयत्न केला नाहीं काय ? पण, कालांतरानें तोच प्रसंग त्यांच्यावर येऊन त्यांच्या स्वतःच्या विचारांतली तर्कच्युति आणि वर्तनांतली विसंगति जेव्हां चिपळूणकरांनीं समाजाच्या निदर्शनाला आणून दिली, तेव्हां मात्र त्यांच्या अंगाचा तडफडाट होऊन त्यांनीं चिपळूणकरांना विध्वंसक म्हणून निंदावयाला प्रारंभ केला. पण विध्वंसाशिवाय जगांत कोणती क्रांति आजवर घडून आली आहे ? क्रांतिदेवता ही कांहीं हंसावर आरूढ झालेली शारदा नव्हे कीं, जिच्या वीणावादनानें गुंगून जाऊन समाजानें नवीन विचारांचा स्वीकार करावा. असंतोषाच्या यज्ञकुंडांतून ती अवतीर्ण होते; तिच्या रथावर गृध्रध्वज फडकत असतो; व अग्निज्वालेसारखें लखलखीत खड्ग हातांत धारण करून दुर्मतांचें निर्दलन करित ती उन्नतीच्या नव्या मंत्राचा आदेश दलितांना देत असते. चिपळूणकरांचे लेख अतिशय कडक आहेत, किंबहुना प्रतिपक्षाच्या मतांचें खंडन करितांना त्याची यत्किंचितही गय ते करित नाहींत, हीं गोष्ट खरी.

पण, आपल्या मतांचा पुरस्कार जर त्यांनीं सौम्य भाषेंत केला असता, तर लोकांच्या विचारांना नवीन वळण लावण्याच्या कार्यांत त्यांना कितीसें यश आलें असतें? लोकहितवादींवरील आपल्या प्रखर टीकेचें समर्थन करितांना त्यांनीं असें स्पष्टच म्हटलें आहे कीं, "अस्थानीं मृदुत्व हें गुणांत मोडत नाहीं हें तर काय, पण तें अत्यंत तीव्रत्वाहूनही अतिशयित अनर्थकारक होय, अशी आमची पक्की खात्री आहे." जगांतील साऱ्या क्रांतिकारक लेखकांच्या वाणींतून जलाल विचारांचें तेजाब ओतप्रोत भरलेलें आढळतें. तेव्हां एकट्या चिपळूणकरांनाच कडक भाषा वापरल्याबद्दल दोष देण्यांत काय अर्थ आहे? त्या दृष्टीनें त्यांच्या लेखणीच्या प्रभावाचें वर्णन करितांना आगरकरांनीं त्यांना दिलेली व्हॉल्टेअरची उपमा अगदीं समर्पक वाटते. रावसाहेब, रावबहादुर, रेव्हरंडें, सरस्वती—केवढीं एकापेक्षां एक जबरदस्त धेंडें हीं! समाजाचा तेजोवध करावयाला प्रवृत्त झालेल्या या प्रतिष्ठितांचा पाडाव सौम्य शब्दांनीं कसा झाला असता? पर्वतांचें पक्षच्छेदन जसें देवेंद्रानें वज्राच्या अमोघ प्रहारानें केलें, तसा या शिष्टांचा तेजोभंग चिपळूणकरांनीं आपल्या तीक्ष्ण टीकास्त्रानें केला; व त्यांच्या प्रतिष्ठेची समाजाला बसलेली दहशत नाहींशी करून, महाराष्ट्राला बौद्धिक गुलामगिरीच्या पाशांतून मुक्त केलें.

परंतु त्यांची भूमिका कांहीं केवळ विध्वंसकाचीच नाहीं. जुन्या पिढींतील क्रियाशून्य पुढाऱ्यांचा केवळ दंभस्फोट करूनच न थांबतां, त्यांनीं स्वार्थत्यागाच्या नव्या संप्रदायाची प्राणप्रतिष्ठाही पण केली. नोकरी सोडण्यापूर्वीं त्यांनीं निर्माण केलेल्या निर्वाहाच्या साधनांकडे बोट दाखवून त्यांच्या त्यागाची किंमत कमी ठरविणारे, किंबहुना त्यांनीं मुळीं स्वार्थत्यागच केला नाहीं असें म्हणणारे, कांहीं टीकाकार आढळतात. पण, या दुर्विदग्धांचें समाधान चिपळूणकर दारिद्र्यांत तडफडून मेल्यानेंही झालें असतें कीं नाहीं, याची वानवाच आहे.

कारण हे बोलून चालून नालस्ती करावयाला बसलेले. फडके यांच्या त्यागाला विवेकाची जोड नव्हती म्हणून ते त्यांना मूर्ख म्हणणार आणि चिपळूणकरांच्या त्यागाला व्यवहाराची जोड होती म्हणून ते त्यांना धूर्त म्हणणार: एकूण या दुर्जनांच्या दृष्टीनें दोघेही सारखेच निंदनीय. पण, हे पिशुन म्हणतात त्याप्रमाणें चिपळूणकर जर खरोखरीच द्रव्यदृष्टि असते, तर निबंधमाला एका विशिष्ट दृष्टीनें चालविण्याचा हट्ट त्यांनीं कशाला धरिला असता ? चाटफील्ड-साहेबांनीं त्यांना समक्ष दिलेल्या सौम्य इशाऱ्याप्रमाणें किंवा शास्त्री-बुवांनीं त्यांना वारंवार केलेल्या पोक्त सूचनेप्रमाणें निबंधमालेचें धोरण बदलून त्यांना सरकारची कृपा संपादन करितां आली नसती काय ? मे. जेकब यांनीं ज्या वेळीं मालेच्या तिसाव्या अंकांतील उतारे, सुशिक्षितांच्या राजद्रोहाचे नमुने म्हणून, खुद्द प्रांताधिपतीला सादर केले, ती वेळ खरोखरीच मोठी आणीबाणीची होती. चिपळूणकरांचा देशाभिमान थोडा जरी ठिसूळ असता, तरी त्यांनीं त्या विधानांबद्दल खेद व्यक्त करून सरकारची मर्जी सुप्रसन्न केली असती; व तत्कालीन इतर ग्रंथकारांप्रमाणें शाळाखात्याच्या आश्रयानें आपला लेखनसंसार साजरा केला असता. त्यांचे वडील कृष्णशास्त्री चिपळूणकर किंवा त्यांचे समकालीन विनायक कोंडदेव ओक यांचीं या प्रकारचीं उदाहरणें त्यांच्या डोळ्यांपुढें होतींच कीं नाहीं ? तेव्हां, त्यांनीं जर 'एलिफास'च्या टीकेला उत्तर देण्याच्या फंदांत न पडतां, मालेचें स्वरूप बदलून टाकलें असतें, तर त्याबद्दल त्यांना दोष देण्याची कोणाची प्राज्ञा झाली असती ? कारण तें युगच मुळीं सरकारची मर्जी सांभाळून सार्वजनिक कामें करण्याचें होतें. पण चिपळूणकरांचा देशाभिमान त्या कसोटीला पुरेपूर उतरला. किंबहुना, त्यांच्या आयुष्यांत ज्या ज्या वेळीं देशाभिमान आणि स्वार्थ यांच्यामध्यें लढा उत्पन्न होण्याचा प्रसंग आला, त्या त्या वेळीं ते स्वार्थाला लाथाडून देशाभिमानाला

जागलेले आहेत. शाळाखात्याची शिस्त सांभाळून शालापत्रक चाल-विणें दुष्कर आहे असें दिसून येतांच त्यांनीं निबंधमाला काढली; व राजसेवेचें बंधन वागवून निबंधमाला चालविणें अशक्य आहे असें अनुभवाला येतांच त्यांनीं तें बंधनच मुळीं झुगारून दिलें. लोकहित-वादींवरील निबंधांत त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं, " खरा लोककल्याणेच्छु व देशाभिमानी पुरुष म्हटला म्हणजे त्याचे ठायीं पराकाष्ठेची निःस्पृहता वागत असली पाहिजे, तो वचनाचा धड असला पाहिजे व कसलींही संकटें आलीं, किंबहुना जीवितसंशयाचा जरी प्रसंग येऊन ठेपला, तरी त्यानें डगमगतां उपयोगी नाहीं. " या उद्गारांना अनुरूप असेंच त्यांचें वर्तन होतें. त्यांच्या लेखांतील तडफ पाहून स्तिमित झालेल्या एका वाचकानें त्यांना असा प्रश्न विचारला कीं, " अशा प्रकारचे कडक लेख लिहावयाला तुम्ही धजतां तरी कसे ? " त्यावर चिपळूणकरांनीं त्याला असें उत्तर दिलें कीं, " अगोदर एक पाय तुरुंगांत ठेवून मग आम्ही देशोन्नतीसाठीं लेखणी हातांत घेतली आहे. " मृत्युपूर्वी ' केसरीं ' त लिहिलेल्या देशोन्नतीवरील लेखांत कोल्हापूर प्रकरणाविषयीं त्यांनीं प्रकट केलेली बेपर्वाई त्यांच्या या निर्भयतेचीच निदर्शक आहे. निर्वाहाचें साधन म्हणून जे नवीन उद्योग त्यांनीं हातीं घेतले, त्यांतही त्यांची स्वहितापेक्षां देशहिताचीच बुद्धि अधिक दृष्टीस पडते. त्यांपैकीं कोणताच उद्योग अशा स्वरूपाचा नव्हता कीं, जो सुरू केल्याबरोबर, रघूनें द्रव्यार्जनार्थ रथ बाहेर काढ-तांच त्याच्या कोशागारावर जशी सुवर्णवृष्टि झाली, त्याप्रमाणें चिपळू-णकरांवर चोंहों बाजूंनीं पैशाचा पाऊस पडावा. चित्रशाळेची योजना म्हणजे बोलून चालून अंधारांतली उडी होती. ' काव्येतिहाससंग्रहा–' साठीं ऐतिहासिक पुरुषांच्या तसबिरा काढाव्या व एका नव्या कलेला उत्तेजन द्यावें, एवढ्याच उद्देशानें चिपळूणकरांनीं हत्ती बाळग-ण्याचा खर्च या योजनेच्या सिद्धतेसाठीं केला. निर्वाहाच्या निमित्तानें

त्यांनीं काढलेल्या या निरनिराळ्या संस्थांविषयीं आगरकरांनीं असें म्हटलें आहे कीं, “या कारखान्यांपासून स्वतःचा फायदा करून घेण्याची इच्छा त्यांनीं कधीं धरली नाहीं. त्यांचें असें म्हणणें असे कीं, बुद्धिवान् आणि चतुर लोकांनीं मोठमोठे धंदे अंगावर चालू करावे आणि मग ते साधारण लोकांच्या हातांत देऊन आपण त्यांपासून अलग रहावें.” चित्रशाळेच्या व्यवस्थेबद्दल त्यांनीं स्वतः बाळकृष्णपंतांना घातलेलें पत्र किंवा त्यांच्या थोर सहकाऱ्याचे हे त्यांच्याविषयींचे उद्गार त्यांची निरपेक्षता सिद्ध करावयाला पुरेसे नाहींत काय? त्यांनीं हातीं घेतलेल्या हरएक कार्यांत त्यांना अपेक्षेपेक्षां लवकर आणि तेंही लोकोत्तर यश आलें, हा केवळ त्यांच्या भाग्याचा प्रभाव. पण त्यामुळें त्यांचा स्वार्थत्याग कसा कमी ठरतो? स्वास्थ्याचा आमरण लाभ करून देणारी बहुमानास्पद राजसेवा कोणीकडे आणि अहर्निश काळजी वहावयाला लावणारी नव्या उद्योगांची यातायात कोणीकडे! त्या वेळच्या इतर पुढाऱ्यांप्रमाणें चिपळूणकरांची देशसेवेची कल्पना जर केवळ परोपदेशांतच सांठविलेली असती, तर स्वतःच्या राज्याधिकाराला ढका लागूं न देतां, त्यांनाही यथाशक्ति देशकार्य करितां आलें असतें. पण, त्यांना स्वास्थ्यापेक्षां स्वातंत्र्याची आणि स्वहितापेक्षां स्वदेशहिताची चाड अधिक असल्याकारणानें, त्यांनीं, राजसेवेमुळें प्राप्त होणाऱ्या प्रतिष्ठेवर पाणी सोडून, स्वावलंबनाचा खडतर मार्ग स्वीकारला; व देशसेवेला सर्वस्वानें वाहून घेण्याची नवीन प्रथा महाराष्ट्रांत पाडली. चिपळूणकरांची थोरवी, त्यांनीं माला काढली, केसरी चालविला किंवा न्यू इंग्लिश स्कूल स्थापन केलें, या गोष्टींत नाहीं. शाळा, मासिकें अगर वृत्तपत्रें काढणारे पुष्कळ कर्तबगार पुरुष त्यांच्या पूर्वीं गाजून गेलेले होते. त्यांची अनन्य श्रेष्ठता या गोष्टींत आहे कीं, स्वातंत्र्यसिद्धीसाठीं जी त्यागाची तपस्या प्रत्येक पतित राष्ट्राला आचरावी लागते, तिची दीक्षा त्यांनीं महाराष्ट्राला अनुष्ठानपूर्वक दिली.

म्हणून, क्रांतिकारक पुरुषाचा क्रांतिकारक ग्रंथ, असेंच निबंधमालेचें वर्णन महाराष्ट्राचे भावी इतिहासकार करितील. मालेपेक्षां सरस किंवा सुंदर ग्रंथ मराठी भाषेंत पूर्वीं किंवा नंतर झालेले नाहींत, असें नव्हे. पण, ज्याच्या प्रत्येक शब्दांत अन्यायाचें निर्मूलन करणारी पवित्र वज्रशक्ति संचरलेली असते, असा दलितांचें परित्राण करणारा ग्रंथ मात्र युगायुगांत एकाद्दाच अवतीर्ण होत असतो. निबंधमालेचें कोणतेंही पान उघडून पहा, त्यांतील प्रत्येक ओळींतून देशाभिमानाची दीप्ति आणि स्वातंत्र्याची स्फूर्ति झळाळतांना दृष्टीस पडेल. चिपळूणकरांचें विभूतिमत्वच जणुं मालेच्या रूपानें वाङ्मय स्वरूप धारण करून आविर्भूत झालें. अशा या अपूर्व ग्रंथानें जर पूर्वसूरींचें वाङ्मय स्मृतिशेष करून टाकलें असलें व त्याच्या निर्मात्याला जर 'आधुनिक गद्याचा जनक' अशी पदवी लोकांनीं दिली असली, तर त्यांत काय आश्चर्य ? त्या पदवीचा अर्थ असा खचित नव्हे कीं, चिपळूणकरांच्या पूर्वीं महाराष्ट्रांत गद्य लेखक होऊन गेलेले नव्हते. किंबहुना, रा. ब. दादोबा पांडुरग यांनीं आपल्या आत्मचरित्रांत म्हटल्याप्रमाणें, सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं आधुनिक गद्याला आरंभ केला, यांत शंका नाहीं. पण अजाण अर्भकांची करमणूक करणारा त्यांचा तो बाळमित्र कुठें आणि दुर्मतध्वंसनासाठीं अवतरलेली चिपळूणकरांची निबंधमाला कुठें ! लक्षावधि तारकांचीं नीरांजनें जरी आकाशांत तेवत असलीं, तरी त्यांच्या तेजानें रजनीचें मुख उजळलें, असें कोणीही म्हणत नाहीं; तर अजराजाचें वर्णन करितांना कविकुलगुरूनें म्हटल्याप्रमाणें—

**नक्षत्रताराग्रहसंकुलाऽपि ज्योतिष्मती चंद्रमसैव रात्रिः ।**

आपल्या सुषमेनें स्थिरच्चरांना सुधास्नान घालणारा चंद्र हाच रजनीचा पति समजला जातो. आगरकरांनीं 'महाराष्ट्रवाणीचा पति' या शब्दांनीं चिप-

ळूणकरांचा जो गौरव आहे, तो तरी याच अर्थानें. शककर्ता सम्राट् हा ज्या युगांत दिग्विजय करून जातो, त्या कालावधींत दुसरे राजे झालेले नसतात, असें नाहीं. पण, त्या सम्राटाच्या कर्तृत्वाचा ठसा त्याच्या काळा-वर इतक्या जोरकसपणानें उमटलेला असतो कीं, तत्कालीन इतर नृपतींचें स्मरण निःशेष होऊन, तें युग पुढें त्याच्याच नांवानें ओळखलें जातें. ज्याच्या प्रभावशाली लेखणीनें मराठी भाषेला स्वतंत्रतेचें वैभव प्राप्त करून दिलें आणि पराक्रमी लेखकांची उज्ज्वल परंपरा महाराष्ट्रांत उत्पन्न केली, त्याला जनतेनें गद्य वाङ्मयाचा जनक किंवा महाराष्ट्रवाणीचा पति मानावें, हें किती स्वाभाविक आहे ? चिपळूणकरांच्या नंतर गेल्या अर्धशतकांत जे अनेक नामांकित लेखक उदयास आले, त्यांपैकीं बहुतेकांना निबंधमालेनेंच साहित्य-सेवेची स्फूर्ति दिली आहे. हरि नारायण आपटे, शिवराम महादेव परांजपे, विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, नरसिंह चिंतामण केळकर, विनायक लक्ष्मण भावे, लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बाळकृष्ण अनंत भिडे, वामन मल्हार जोशी प्रभृति महाराष्ट्रांतील धुरंधर ग्रंथकारांना चिपळूणकरांपासूनच मातृभाषेच्या सेवेची स्फूर्ति मिळाली; व आपल्यासारखा कर्तृत्ववान् लेखक पुढें होणार नाहीं असे उद्गार जरी त्या महापुरुषानें अभिमानाच्या क्षणिक ऊर्मींत काढलेले असले, तरी ‘ शिष्यादिच्छेत्पराजयम् ’ या न्यायानें यांपैकीं बहुतेक लेखकांनीं साहित्याच्या क्षेत्रांत त्यांचा पराभव केला आहे. शिवछत्रपतींच्या तोलाचा एकही मुत्सद्दी त्याच्या मरणानंतर निर्माण न झाल्यामुळें मराठशाहीचा नाश झाला. परंतु, चिपळूणकरांच्या निधनानंतर त्यांच्या-पेक्षां प्रतिभाशाली लेखक महाराष्ट्रांत उदयाला आल्यामुळें मराठी भाषेचें वैभव आज वृद्धिंगत होत असून, तिचा ऱ्हास किंवा नाश होण्याची जी भीति मालेच्या पहिल्या अंकांत त्यांनीं व्यक्त केलेली होती, ती आतां नष्ट झाली आहे. हें सारें चिपळूणकरांच्या विधायक कामगिरीचें फळ !

त्यांच्या वाङ्मयांत जरी कदाचित् असावी तितकी ऋजुता नसली किंवा समकालीनांना जरी त्यांच्या हातून क्वचित् अन्याय घडलेला असला, तरी महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासांत त्यांचें स्थान अढळ आणि अत्युच्च आहे. कालचक्राला कलाटणी देणारें वाङ्मयच काळाच्या विनाशक शक्तीवर मात करीत असतें. जेत्यांचें बुद्धि-सामर्थ्य पाहून स्तिमित झालेल्या महाराष्ट्राच्या विचारशक्तीला निबंध-मालेनें चालना दिली; व त्याच्या इतिहासांत नवा मनु निर्माण केला. अशा युगप्रवर्तक ग्रंथकाराला मराठी भाषेच्या उपासकांनीं गुणगौरवाचा करभार वर्षानुवर्ष कृतज्ञतेनें देत रहावें, यांत काय नवल ?



# लेखनकाल

या निबंधाच्या प्रथमलेखनाला ता. २७ नोव्हेंबर १९२१ रोजीं मुंबई येथें प्रारंभ होऊन, ता. १६ मे १९२२ रोजीं तो पूर्ण झाला. तो लिहिला जात असतांनाच मुंबईच्या ' विविधज्ञानविस्तार ' मासिकाच्या १९२१-२२ सालच्या अंकांतून क्रमशः प्रसिद्ध होत होता. त्याची स्वतंत्र आवृत्ति पुण्याच्या आर्यभूषण संस्थेनें १९२३ च्या जूनमध्यें प्रकाशित केली.

प्रस्तुत दुसऱ्या आवृत्तीच्या पुनर्लेखनाला ता. ५ जून १९३३ रोजीं नागपूर येथें प्रारंभ होऊन, ता. १० जानेवारी १९३४ रोजीं ती पूर्ण झाली.



# १

# पूर्वपीठिका

**तप्तं तप्तं पुनरपि पुनः कान्तवर्णं सुवर्णम्**
**घृष्टं घृष्टं पुनरपि पुनश्चन्दनं चारुगन्धि ।**

चिपळूणकरांच्या नश्वर देहाचें इहलोकांतील वास्तव्य संपून त्यांना दिवंगत झाल्याला बरोबर बावन्न वर्षें पूर्ण झालीं. राष्ट्राच्या इतिहासांत एखाद्या व्यक्तीचें स्थान कोणतें, हें आजमावण्यास येवढा कालावधि साधारणतः पुरेसा होतो. विशेषेंकरून चिपळूणकरांच्या कामगिरीविषयीं गेल्या बावन्न वर्षांत पुष्कळच साधक बाधक चर्चा झाली असून, त्यांच्याविषयीं जेवढें कांहीं चांगलें अगर वाईट म्हणतां येईल, तेवढें कोणत्या ना कोणत्या तरी व्यक्तीकडून म्हटलें गेलें आहे, असें आजवर झालेल्या चर्चेचें अवलोकन केल्यास दृष्टोत्पत्तीस येईल. आजवर झालेल्या चर्चेचा एकंदर निष्कर्ष काय आणि चिपळूणकरांना कांहीं विशिष्ट पक्षाच्या अगर मनोवृत्तीच्या लेखकांकडून जीं दूषणें देण्यांत येतात त्यांतील ग्राह्यांश किती, याचें अकलुषित मनानें परीक्षण करण्याचा समय आतां प्राप्त झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रस्तुत लेख हा अशाच स्वरूपाचा व अशाच धोरणानें केलेला एक प्रयत्न आहे. फार जुन्या आक्षेपांवर उत्तरें प्रत्युत्तरें पूर्वीच होऊन चुकलेलीं आहेत. परंतु अलीकडे दहा बारा वर्षांत उत्पन्न झालेले जे चिपळूणकरांचे दूषक व टीकाकार त्यांनीं काढिलेल्या आक्षेपांचा व्यवस्थित परामर्श कोठें घेतला गेला आहे, असें दिसत नाहीं. तेव्हां त्यांच्या आक्षेपांचा सांगोपांग विचार करावा आणि त्याबरोबरच चिपळूणकरांच्या कामगिरीचेंही पर्यालोचन करून महा-

राष्ट्रीयांस त्यांच्या आद्य लोकनायकाच्या यथार्थ योग्यतेची जाणीव करून द्यावी, असा प्रस्तुत लेख लिहिण्यांतील प्रमुख हेतु आहे.

चिपळूणकरांच्याही यशोनिधीवर टपलेले लोक असावे, त्यांनीं आपल्या अल्पकालिक आयुष्यांत केलेल्या अचाट कामगिरीवर त्यांच्या मरणोत्तर शिंतोडा उडविणारे सर्षपद्दष्टि निंदक उत्पन्न व्हावे, यांत आश्चर्य करण्याजोगें कांहीं नाहीं. त्यांच्या आयुष्यांतील कर्तबगारीचा काळ इतका अल्प होता कीं, त्यांच्या कामगिरीचें महत्त्व डोळयांत भरण्याच्या अगर डोळयांवर येण्याच्या अगोदरच त्यांचें अवतारकृत्य आटपलें. कांहीं अंशीं त्यांच्या लेखणीच्या दराऱ्यामुळेंही त्यांचे आक्षेपक त्यांच्या हयातींत मूग गिळून बसले असावे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. ते दिवंगत झाल्यावर त्यांच्या कर्तृत्वाचें रहस्य हळूहळू जनसमाजाच्या, विशेषतः तत्कालीन तरुणांच्या, मनांत जसजसें बिंबूं लागलें आणि समाजांत त्यांच्या कृत्यांविषयीं व उद्गारांविषयीं प्रेम जसजसें वृद्धिंगत होऊं लागलें, तसतसे त्यांच्या आक्षेपकांचे विसंवादी स्वरही हळूहळू कोठें कोठें निघूं लागले. अशा रीतीनें चिपळूणकरांच्या मरणोत्तर आक्षेपकांच्या जिव्हेनें व लेखणीनें प्रसंगोपात्त बरीच कामगिरी बजावली असून, आजलाही त्यांची कर्तबगारी शिथिल झाली आहे, असें दिसत नाहीं. त्यांत सुदैवाची गोष्ट एवढीच कीं, निंदाद्वेषव्रताचें पुरश्चरण करणाऱ्या जिव्हा व लेखण्या उत्तरोत्तर विरळ निपजूं लागतील, अशीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं आहेत. चिपळूणकरांच्या कर्तृत्वाबद्दल कधीं तुच्छताव्यंजक असा मूकभाव तर कधीं तिऱ्हाईत लेखकांच्या द्वारें प्रकट केलेला प्रत्यक्ष विरोधीभाव यांचें चाळीस वर्षें प्रदर्शन केल्यानंतर, त्यांच्या कर्तृत्वाचें ज्यांत आदरपूर्वक स्तोत्र गाइलें आहे अशा माडखोलकरांसारख्या प्रांजळ लेखकाच्या लेखास मराठींतील ज्येष्ठ मासिकानें जागा द्यावी, त्याचप्रमाणें मराठींतील ज्येष्ठ वृत्तपत्रानेंही आजपर्यंत प्रकट केलेली अहिनकुलवृत्ति सोडून देऊन

त्यांच्या पुतळ्याच्या अनावरणसमयीं त्यांचें मुक्तकंठानें स्तुति-स्तोत्र गावें, या गोष्टी खचित आशाजनक आहेत. पक्षभेद विसरून जाऊन गत पुरुषांच्या चरित्रांकडे निवळलेल्या दृष्टीनें पाहण्याची ही प्रवृत्ति उत्तरोत्तर वाढत जाईल तर आपला भाग्योदय पुष्कळच समीप येईल, यांत संशय नाहीं.

चिपळूणकरांच्या हयातींत त्यांच्यावर निंदेचे प्रहार करण्याची उठा-ठेव फारशी कोणी केली नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. निबंधमालेंत केलेल्या विषयांच्या प्रतिपादनावरून कांहीं लहानसहान वादविवाद झाले. मराठी कवितेसंबंधानें वामन दाजी ओक व मालाकार यांची झटापट झाली; किंवा विनायक कोंडदेव ओक यांच्या 'शिपायांच्या बंडा' वर व 'हिंदुस्थानकथारसा' वर प्रतिकूल अभिप्राय प्रकट केल्याबद्दल ओकांच्या स्नेह्यानें इंदुप्रकाशांतून चिपळूणकरांवर टीका केली; हे व असेच टीकेचे अनेक प्रसंग आलेले व चिपळूणकरांनीं त्यांस मालेंत उत्तरें दिलेलीं मालेच्या वाचकांस विदित आहेतच. पण हे सर्व प्रसंग म्हणजे विषयाच्या प्रतिपादनांत कोणास पसंत न पडण्याजोगा एखादा मुद्दा निघाला म्हणजे त्यावरून होणारे वादप्रसंग होत. चिपळूण-करांनीं निरंतर आपलें टीकास्त्र ज्यांच्यावर जारी ठेवलें होतें असे 'आमचे नवीन विद्वान् लोक', 'त्यांनीं उपस्थित केलेले सुधारणेचे मार्ग,' 'ख्रिस्ती धर्माभिमानी पाद्रीमंडळ' आणि 'आमचे राज्यकर्ते' या चौकडीशीं होणाऱ्या सामन्यांच्या जोडीस असले वादप्रसंग बस-वितां येत नाहींत. वामनराव ओकांनीं प्रसंगवशात् विषयाच्या संबंधानें मालाकारांवर टीका केली असली तरी तेही मोरोपंतांचे मालाकारांच्या इतकेच अभिमानी होते आणि इतरही सर्व व्यापक प्रश्नासंबंधीं त्यांची मनोवृत्ति मालाकारांशीं विरोधी होती असें मानण्यास आधार नाहीं. परंतु वर ज्या चौकडीचा उल्लेख केला आहे ती 'येषां च विरोधः शाश्वतिकः' या कोटींत अंतर्भूत होणारी होय. निदान चिपळूणकरांची

त्यांच्याविषयींची वृत्ति अशाच तऱ्हेची होती, असें त्यांच्या उद्गारांवरून दिसतें. तेव्हां चिपळूणकरांच्या हयातींत किंवा त्यांच्या मरणोत्तर या शाश्वत विरोधी मंडळीपैकींच कोणी काय काय आक्षेप घेतले व कोणी कसकशी निंदा केली हें आपणांस पाहावयाचें आहे.

या चौकडीपैकीं ख्रिस्तधर्माभिमानी मिशनरी मंडळींनीं मालाकारांविरुद्ध बरीच धडपड केली; परंतु तिचा फारसा उपयोग झाला नाहीं. कांहीं अंशीं मालाकारांच्या टोल्यानें व कांहीं अंशीं सर्वत्र झालेल्या प्रतिक्रियारूप जागृतीमुळें मिशनरींची चळवळ थंडावून जी एकदा निपाचित पडली ती कायमचीच. तिनें पुनः विशेष जोमानें डोकें वर काढलें नाहीं. दुसरा मालाकारांचा टीकाविषय जे 'आमचे प्रस्तुतचे राज्यकर्ते' त्यांनींही आपल्या विरोधाची जाणीव मालाकारांना करून देण्यास कमी केलें नाहीं. सरकारी विरोधाचा पहिला मासला म्हणजे सरकारच्या छायेंतल्या गृहस्थानें लिहिलेलें प्रसिद्ध 'एलिफास' नामक सहीचें पत्र होय. या लेखी समजीनें मालाकार ताळ्यावर आले नाहींत. तेव्हां पुनः एकदा या नाठाळ गृहस्थास चांगलीच समज देण्याकरितांच बहुधा रत्नागिरीसारख्या अत्यंत गैरसोयीच्या ठिकाणीं त्यांची बदली करण्यांत आली. परंतु सर्वसमर्थ सरकारच्या विरोधाचा हा तडाखा बसल्यानंतरही 'विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते' असाच या महापुरुषाविषयीं सर्वांस अनुभव आला. पुढें चिपळूणकरांनीं सरकारी नोकरीस रामराम ठोकला व सरकारनेंही पुढें त्यांच्या हयातींत कांहीं हालचाल केली नाहीं. यानंतर तीस वर्षेपर्यंत मूग गिळून बसून १९१० च्या प्रेस ॲक्टमुळें पेटलेल्या अग्निकुंडांत सरकारनें निबंधमालेंतील 'आमच्या देशाची स्थिति' या शेखरीभूत लेखाची आहुति घेतली. सरकारच्या गैरमर्जीचें हें फळ अकल्पित रीतीनें मालेला भोगावें लागलें !

पाद्रीमंडळ व सरकार या दुकलीचें वर्तन याप्रमाणें झालें; चिपळूणकरांनीं केलेली प्रखर टीका सहन करून ते परमहंस वृत्तीनें

स्वस्थ बसले नाहींत. परंतु यांच्या जवळ जवळ उलट स्थिति ‘ आमचे नवीन विद्वान् लोक ’ व ‘ त्यांनीं उपस्थित केलेले सुधारणेचे मार्ग ’ यांची झाली. सुधारणापक्षीय नवीन मंडळी व त्यांचीं अनेकविध कृत्यें यांवर चिपळूणकरांनीं प्रखर टीका केली असतां सुधारणापक्षांतील एकही वीर पुढें सरसावून त्यांच्यासमोर दंड थोपटून उभा राहिला नाहीं. नाहीं म्हणावयास ‘ निबंधमालाहितेच्छु ’ हें नांव धारण करून वामन आबाजी मोडक यांनीं मालाकारांशीं एकदा पोक्त बुद्धिवाद करण्याचा यत्न केला होता व डॉ० रामकृष्णपंत भांडारकर यांनीं, केसरींत ‘ अनुकरण ’ नामक लेखांत प्रार्थनासमाजाविषयीं विष्णुशास्त्री यांनीं जीं विधानें केलीं होतीं, त्यांना उत्तरादाखल सुबोधपत्रिकेंत लेख लिहिले होते. चिपळूणकरांच्या हयातींत सुधारणापक्षानें त्यांच्यावर केलेल्या टीकेचीं एवढीं दोनच उदाहरणें आढळतात. परंतु चिपळूणकरांनीं सामाजिकांवर व एकंदर सुधारणापक्षीय नवीन विद्वानांवर जी एकसारखी शिस्त धरली होती तिच्या मानानें सुधारणापक्षाकडून त्यांना मिळालेलीं हीं उत्तरें कांहींच नव्हेत; व या उत्तरांवरही चिपळूणकरांनीं लगेच प्रत्युत्तरें देऊन ठेवलीं असल्यामुळें त्यांच्यावर चांगलेंच विरजण पडल्यासारखें झालें आहे. तेव्हां ख्रिस्ती मिशनरींची कांहींशी अप्रयोजक टीका बाजूस ठेवली असतां चिपळूणकरांच्या वर त्यांच्या हयातींत टीका करण्याचा हिय्या फारसा कोणीं केला नाहीं असेंच एकंदरीनें म्हणणें भाग पडतें.

नवीन विद्वान् लोक व त्यांच्या प्रार्थनासमाजादिक सुधारणेच्या चळवळी यांवर चिपळूणकरांनीं एवढें शस्त्र धरलें असतांही ही सर्व मंडळी थंडच राहिली, यावरून सुधारणापक्षांतील लोक अत्यंत सहनशील, अपकार केला असतांही उपकार करणारे, फार झालें तर सौम्यपणानें बुद्धिवाद करतील पण हमरीतुमरीवर कधीं येणार नाहींत, अशा सोज्ज्वल मनःप्रवृत्तीचे असावे असें कोणासही वाटेल. परंतु प्रत्यक्ष अनुभव पाहतां तींही इतरांसारखींच

विकारक्षम, किंबहुना विकारवश, माणसें होतीं असें आपणास दिसून येतें. मालाकार दिवंगत झाल्यावर कित्येक गृहस्थांनीं आपल्या मनांतील किल्मिष ओकून टाकण्याचा हिय्या केला; त्यांपैकीं कांहीं जणांनी आपल्या अनुदार वृत्तींचें जें प्रदर्शन केलें तें पाहिलें असतां कोणालाही सोज्ज्वलपणाचीं सर्टिफिकिटें सुधारणापक्षाला देतांना मोठा विचारच पडेल यांत शंका नाहीं. अगोदर कोणाही व्यक्तीबद्दल तिच्या पश्चात् उद्गार काढावयाचे व तेही ती व्यक्ति जीवमान असतांना मूग गिळून गुपचुप बसलेल्या लोकांनीं काढावयाचे, म्हणजे ते कांहींएक आदर व मर्यादा राखून काढले पाहिजेत! परंतु ही मर्यादा चिपळूणकरांच्या टीकाकारांनी फारकरून पाळली असल्याचें दिसून येत नाहीं.

तेव्हां मालाकार दिवंगत झाल्यावर कांहीं मंडळींनीं मालाकारांच्या चरित्रावर, त्यांच्या कृत्यांवर व विशेषतः त्यांच्या निबंधमालेवर आक्षेप घेण्यास सुरवात केली. या बाबतींत पहिली सलामी बहुधा नामदार न्यायमूर्ति काशीनाथ त्र्यंबक तेलंग यांनीं दिलेली दिसते. तेलंगांनीं आपल्या आयुष्यांत निरनिराळ्या वेळीं तीनदां विष्णुशास्त्र्यांच्या कृत्यांविषयीं अभिप्राय प्रकट केले असल्याचा दाखला मिळतो. पैकीं पहिला प्रसंग १८७४ सालचा होय. निबंधमाला नुकतीच सुरू झाली होती, त्या वेळेस तेलंग डॉ० भांडारकरांना वारंवार म्हणत असत, “पंडित, अलीकडे पुण्यास एक नवीन मासिक निघूं लागलें आहे; आपल्या पहाण्यांत आलें आहे काय? नसल्यास अवश्य पहावें; चांगलें आहे.” (किरकोळ लेखांचा संग्रह, भाग २; खं. भि. बेलसरेकृत उपोद्घात, पान ७९). यानंतर १८८१ सालीं, ‘न्यू इंग्लिश स्कूल’ विषयींही असेच प्रशंसापर उद्गार काढून त्याला जाऊन मिळण्याचीही इच्छा त्यांनी प्रदर्शित केली होती, अशी हकीकत लक्ष्मणराव चिपळूणकरांनी लिहिलेल्या विष्णुशास्त्र्यांच्या चरित्रांत दिली आहे, ती प्रसिद्धच आहे.

तेलंगांनीं विष्णुशास्त्र्यांच्या बाबतींत अनुकूल मत व्यक्त केल्याच्या

या दोन हकीकती ऐकीव माहितीवरून वर्णिलेल्या दिसतात; त्या खऱ्या असोत वा नसोत, त्यांनीं विष्णुशास्त्र्यांच्या वर प्रतिकूल प्रहार केल्याचा जो वृत्तांत प्रसिद्ध आहे तो अनेक 'चक्षुर्वै सत्यम्' साक्षीदारांच्या साक्षीनें सिद्ध झालेला असल्यामुळें त्याच्या सत्यतेविषयीं संशय घेण्यास जागाच नाहीं. डिसेंबर १८९१ मधली गोष्ट. एल्फिन्स्टन कॉलेजच्या होस्टेल युनियनतर्फे आक्वर्थसाहेब—ऐतिहासिक पोवाड्यांचे संग्राहक—यांचें 'मराठी कविता' या विषयावर व्याख्यान होतें. अध्यक्षस्थानीं न्या० तेलंगांची योजना झाली होती. प्रथम व्याख्याते आक्वर्थसाहेब यांनीं कारण नसतांना विषयांतर करून गद्यग्रंथकारांवर बोलण्यास सुरुवात केली व त्यांत बिचाऱ्या विष्णुशास्त्र्यानां खेंचून आणून, "टीकारूप शस्त्रानें त्याला असे कांहीं घाय केले कीं, तो जर जिवंत राहता तर तोंडाला काळें फांसून व दाढी वाढवून एकाद्या अंधारकोठडींत दडून बसता!" व्याख्यात्यानंतर अध्यक्ष न्यायमूर्ति तेलंग बोलावयास उठले, त्यांनींही "बापड्या शास्त्रीबोवांकडे मोर्चा फिरविला व 'वाचकांचीं मनें त्यानें दूषित केलीं (He has spoilt the character of its readers), बाष्कळ लिहिण्याकडे त्यांची प्रवृत्ति केली (He encouraged flippant writing);' इत्यादि वज्रप्राय वाग्बाणांनीं त्याचें शरीर छिन्नविच्छिन्न करून सोडलें. मोठ्या शास्त्रीबोवांना मागें सारून लोकांनीं मि. 'विष्णू'ला (विष्णुशास्त्री नव्हे हो) उच्चस्थान कसें दिलें याबद्दल नामदारांना फारच आश्चर्य वाटलें व लोकांची रुचि बिघडवून टाकणाऱ्या मि. विष्णूचा धिक्कार करून व त्याजकडे नवीन होतकरू मंडळीनें ढुंकूनही पाहूं नये म्हणून हुकूम फर्मावून न्यायमूर्ति रागाच्या आवेशांतच खालीं बसले." तेलंगांनीं याप्रमाणें चिपळूणकरांवर तोंडसुख घेतल्याचें निदर्शनास येतांच चिपळूणकरांवरील आक्षेपांचें निवारण करून तेलंगांचा जरा खरपूस समाचार घेणें केसरीकारांस प्राप्त झालें व तें कर्तव्य

त्यांनीं ‘ विष्णु आणि तेलंग ’ हा अग्रलेख लिहून उत्कृष्टपणें बजावलें. ( केसरी, ता. २२–१२–१८९१ ).

समतोल मनानें विचार करूं जातां तेलंगांचा चिपळूणकरांवरील हा हल्ला अनेक दृष्टींनीं अप्रशस्त ठरतो. व्याख्यानाचा विषय मुळीं ‘ मराठी कविता ’ हा असल्यामुळें गद्यग्रंथकारांवर बोलणें हें त्या प्रसंगीं अगदीं अप्रस्तुत व अनुचित होतें. व्याख्याते आक्वर्थसाहेब यांनीं विनाकारण ह्या अप्रस्तुत विषयावर बोलून चिपळूणकरांवर ताशेरा झाडण्याचा अप्रयोजकपणा केला असला, तरी तेलंगांनीं त्यांची साथ करण्याची कांहीं एक जरूरी नव्हती. परंतु दोघांनींही ‘ येन केन प्रकारेण ’ तो विषय उकरून काढून दिवंगत चिपळूणकरांच्या कीर्तीवर प्रहार करण्याची संधि साधून घेतल्याचें स्वरूप जें त्या प्रसंगाला आलें तें फारच वाईट होतें. मालाकार जिवंत असतांना तेलंगांस निबंधमालेवरचा आपला अभिप्राय प्रकट करण्यास भरपूर अवकाश होता. शिवाय खरोखर पाहिलें असतां मराठी वाङ्मय हा तेलंगांचा विषय नव्हे. अशा विषयासंबंधीं बोलावयाचा प्रसंगच आला तर बेतानें, तोलून जपून बोलणेंच त्यांस योग्य दिसलें असतें. सबळ पुराव्यानिशीं आपलीं विधानें त्यांनीं सिद्ध करावयास पाहिजे होतीं. तसें कांहींएक न करितां, शास्त्रीबोवांनीं बाष्कळपणा कसा काय केला व लोकांचीं मनें कोठें, कशीं बिघडविलीं हें दाखवून न देतां, त्यांनीं त्यांच्या लिखाणावर प्रतिकूल शेऱ्यांचा नुसता मारा केला. न्यायमूर्तींच्या न्यायित्वास हें कसें शोभून दिसलें असेल तें असो !

यापुढें कांहींना कांहीं तरी खुसपट काढून चिपळूणकरांना नांवें ठेवण्याची कामगिरी ‘ सुधारक ’ पत्रानें हातीं घेतली. आगरकरांनंतरच सुधारकाचें हें स्वरूप विशेष व्यक्त झालें. दिवंगत झालेल्या इतर व्यक्तींचा मरणदिवस साजरा केला जाऊं नये व चिपळूणकरांची

मृत्युतिथि मात्र उत्साही तरुण मंडळीनें दरसाल सभा भरवून पार पाडावी याचें त्या पत्रास मोठें वैषम्य वाटत असे. सद्वर्तनप्रवर्तक मंडळीतर्फे भरविल्या जाणाऱ्या 'या मेळ्यांतल्या भाषणांसंबंधानें कांहींतरी खुसपट काढून, अनर्गलपणें शास्त्रीबोवांची निंदा करण्याचा परिपाठ' सुधारक पत्रानें चालू ठेवला होता. 'शास्त्रीबोवांच्या लेखांनीं विद्यार्थ्यांस मोठ्या लोकांचा अनादर व उपमर्द करण्यास शिकविलें, शास्त्रीबुवांनीं सत्याशीं व सदसद्विवेकबुद्धीशीं प्रतारणा केली, त्यांनीं सवंग लोकप्रियतेच्या मागें लागून सुधारणेचा पक्ष बुडविला,' वगैरे हरतऱ्हेचे प्रलाप निंदाव्यवसायी पत्रें करीत असत व अजूनही त्यांचें अनुकरण मुळींच होत नाहीं असें नाहीं. सुधारककर्त्यांनीं 'टाईमटेबलें फेंकून देऊन, घड्याळ फोडून टाकून शिक्षण देणाऱ्या' चिपळूणकरांची कुत्सितपणानें कुचेष्टा करावी; इकडे जिनसीवाल्यांसारख्यांनीं उलट सुधारकपक्षांतील व्यक्तींस लागेल असा शब्द बोलावा. याप्रमाणें आघातप्रत्याघातरूपी हा सामना चालूच असे.

'सुधारका'प्रमाणें केवळ निंदा-द्वेष-व्रत चालविणारें नव्हे; परंतु चिपळूणकरांच्या कर्तबगारीकडे किंचित् उपेक्षाबुद्धीनें पाहणारें पत्र 'ज्ञानप्रकाश' हें होय. मुंबईच्या 'इंदुप्रकाशा'ची तऱ्हा साधारण अशाचपैकीं म्हणतां येईल. परंतु मराठींतील ज्येष्ठ व भारदस्त मासिक जें 'विविधज्ञानविस्तार' त्याची गोष्ट थोडी निराळी होती. निबंधमालेंत सारस्वत ब्राह्मणज्ञातीविषयीं कांहीं उल्लेख येऊन गेल्या-मुळें 'विस्तारा'च्या चालकांची मति थोडी रुष्ट झालेली असणें संभवनीय होतें. शिवाय त्या थंड्या प्रकृतीच्या मासिकास मालेंतील धीरोद्धत विचारसरणी व प्रतिपादन रुचणें फारसें शक्य नव्हतें. तथापि प्रत्यक्षपणें मालाकारांच्या कृत्यांवर आक्षेप घेण्याचें धाडस त्यानें केलें नाहीं. एकदां कै० वा. गो. आपटे यांनीं 'टीका व टीकाकार' या विषयावर लिहितांना, मालाकारांनीं टीकाकार या नात्यानें नवे नवे दोष काढण्याचें

वाईट वळण पुढील पिढीस लावून दिलें, असा आरोप केला होता. त्याचप्रमाणें कांहीं वर्षांपूर्वी ( आगष्ट १९२३ ) प्रो. केळकर यांच्या 'लोकहितवादी' या पुस्तकावर अभिप्राय देतांना या भारदस्त मासिकानें मालाकारांवर शेलक्या वाक्सुमनांचा वर्षाव करून आपला भारदस्तपणा व्यक्त केला होता. मालाकारांचे दोघे पट्टीचे विरोधक कै० बा. ना. देव व श्री. न. र. फाटक या दोघांच्या लेखांसही विस्तारामध्येंच आदरानें स्थान मिळालेलें आहे. अशाच कांहीं प्रसंगांस अनुसरून विस्ताराचा मनोदय क्वचित् काळीं प्रकट होत असला तरी एकंदरींत त्यानें कूर्मवृत्तीचाच आश्रय केला होता.

मालाकारांच्या सर्व आक्षेपकांमध्यें इंदूरचे कै. बाळकृष्ण नारायण देव यांना अग्रपूजेचा मान देणें रास्त होय. लक्ष्मणराव चिपळूणकर यांनीं लिहिलेलें विष्णुशास्त्र्यांचें चरित्र १८९४ सालीं प्रसिद्ध झालें. त्या चरित्राचें परीक्षण करण्याच्या मिषानें कै. देव यांनीं 'ग्रंथमालें'त जून १९०० मध्यें आपला टकात्मक लेख प्रसिद्ध केला. त्यानंतर १७ वर्षांनीं निबंधमालेची चित्रशाळा आवृत्ति प्रसिद्ध झाल्याची संधि साधून पुनः एक टीकालेख १९१७ डिसेंबरच्या विविधज्ञानविस्तारांत त्यांनीं लिहिला आहे. मालाकारांविषयीं कै. देव यांची मनोभावना कांहीं चमत्कारिक दिसते. " मालाकारांच्या हयातींत माझ्या ठायीं त्यांबद्दल परम पूज्यभाव जागृत होता...तेव्हां त्यांच्या पश्चात् हा भाव बदलण्याचें कांहींच कारण नाहीं हें कोणीही कबूल करील व हें परीक्षण मी पूज्याभावानें ( ! ) प्रेरित होऊन केलें नाहीं हें कोणीही कबूल करील; " त्याचप्रमाणें " प्रस्तुत लेखकाच्या ( देवांच्या ) मनांत मराठी वाङ्मयविषयक प्रेम मूळ मालालेखांनींच उत्पन्न केलें; " असे उद्गार काढून मालाकारांविषयीं स्वतःच्या मनांतील पूज्यभावाचा त्यांनीं दोन्ही लेखांत निर्वाळा दिला आहे. कै. देव हायस्कुलांत विद्यार्थी असतां त्यांचे लेख मालेंत छापून त्यांच्या 'बालिश मतांचे दोष' मालाकार थोर

मनानें दाखवीत असत, हीही हकीकत निवेदन करून देवांनीं माला-कारांचें उपकारस्मरण केलें आहे. असें असतां दुराग्रह, अनुदारता, धर्माचारांत दांभिकपणा, लोकप्रियतेची अनिवार तृष्णा, विकारवशता, खोटा देशाभिमान, सत्कार्यास विघातक अशी टीका करणें, वगैरे अनेक भयंकर दोषांचा आरोप याच देवांनीं विष्णुशास्त्र्यांवर मोठ्या उल्लासानें केला आहे. इतकेंच नव्हे, तर सुधारणेचा निषेध केल्यानेंच विष्णुशास्त्री 'अल्पायु झाले, त्यांचा निर्वंश झाला आणि त्यांस पाणी देण्यास देखील कोणी राहिला नाहीं!' अशा अर्थाचें सद्-भिरुचीच्या मनुष्यास केवळ उद्वेग येईल असें विधानही त्यांनीं आपल्या 'ग्रंथमालें'तील लेखांत केलें आहे. एकंदरींत आपल्या उपकार-कर्त्या महात्म्याच्या ऋणाची फेड करण्याची ही पद्धति देव यांनीं मोठी चांगली काढली असें म्हणावें लागतें! अशा तऱ्हेचा निरर्गल लेख प्रसिद्ध झाल्यावर त्याजवर चोहोंकडून टीकांचा वर्षाव व्हावा यांत नवल नाहीं. 'ग्रंथमालें'तच देवांच्या सबंध लेखावर श्री. वासुदेव दामोदर मुंडले यांची सविस्तर टीका प्रसिद्ध झाली व कै. मोरो केशव दामले यांनीं 'हेतु कीं परिणाम' या नांवाचा लेख लिहून लोकप्रियता हा मालाकारांच्या लेखांचा परिणाम होय, उद्देश नव्हे, असें सिद्ध केलें. १९०१ सालीं चिपळूणकरांच्या श्राद्धतिथीनिमित्त लोकमान्य बळवंत-राव टिळक यांनीं निबंध वाचला, त्यांतही देवांचे कित्येक आक्षेप खोडून काढले. खंडेराव भिकाजी बेलसरे यांनींही आपल्या उपोद्घातांत त्यांचा त्रोटक समाचार घेतला. परंतु देव हे देखील मोठे चिकाटीचे गृहस्थ होते असें दिसतें. त्यांनीं मुंडल्यांच्या टीकेला 'ग्रंथमाले'च्या डिसेंबर १९०१ च्या अंकांत लांबलचक उत्तर दिलें असून दामल्यांच्या लेखाचाही त्याच अंकांत समाचार घेतला आहे. मुंडल्यांना त्यांनीं दिलेल्या उत्तरानें भरगच्च ७८ पानें व्यापिलीं आहेत. यावरून मालाकारां-च्या निंदेविषयींचा देवांचा हव्यास व्यक्त होतो.

आक्षेपकांच्या परंपरेचें किंचित् दिग्दर्शन केलें, त्याचप्रमाणें चिपळूणकरांची स्मृति जागृत ठेवून त्यांचा चारित्र्यदर्पण उज्ज्वल राखण्याचें कर्तव्य ज्यांनीं केलें त्यांचाही थोडासा उल्लेख करणें अप्रशस्त होणार नाहीं. या संबंधांत पहिलें नांव केसरीचें. आपल्या उत्पादकाच्या कीर्तीच्या ठेव्याचें संरक्षण करून त्याच्या निंदकांचें यथास्थित उसनें फेडण्याचें काम सत्पुत्रास साजेशा उल्लासानें व भक्तीनें त्यानें पार पाडलें आहे. तेलंगांच्या आक्षेपांस उत्तर केसरीनेंच दिलें. सुधारकादि पत्रांच्या ओरडीस उत्तर देण्यास केसरी नेहमीं सज्ज असे व उत्तर देण्याजोगा मुद्दा त्यांत कांहीं असल्यास त्यानें उत्तर देण्याची कधींही बाकी ठेवली नाहीं. सद्वर्तनप्रवर्तक मंडळीतर्फे झालेलीं व्याख्यानें व वाचलेले निबंध हे पुष्कळ वेळां केसरींत विस्तृतरूपानें प्रसिद्ध होत असत व पुण्यतिथीच्या सभेची त्रोटक हकीकत तर दरवर्षी यावयाची हें ठरलेलेंच आहे.

ही चिपळूणकरांच्या पुण्यतिथीची सभा दरसाल आस्थेनें भरविणाऱ्या सद्वर्तनप्रवर्तक मंडळीचाही चिपळूणकरांचें स्मरण जागृत करून त्यांच्या चारित्र्याचा निरनिराळ्या दृष्टीनें ऊहापोह करण्याचे कामीं आजपर्यंत फार उपयोग झालेला आहे. ही मंडळी न्यू इंग्लिश स्कूलमधील व फर्ग्युसन कॉलेजमधील चिपळूणकरांचे निस्सीम भक्त असे जे विद्यार्थी होते त्यांनीं १८८७ सालच्या सुमारास स्थापन केली. या संस्थापकांत रा. भाऊसाहेब लवाटे, अनंत वामन बर्वे, भिकाजीपंत हर्डीकर वगैरे त्या वेळची उत्साही तरुण मंडळी होती. दरसाल चिपळूणकरांच्या श्राद्ध-तिथीस सभा भरवून कोणाचें तरी भाषण अगर निबंधवाचन करविण्याचा या मंडळीचा प्रघात होता आणि तो १८९७–९८ हीं प्लेगचीं वर्षें खेरीज-करून आजपर्यंत अव्याहत चालत आला आहे. या श्राद्धतिथिपालनाच्या प्रसंगानें निबंधलेखक, व्याख्याते अगर अध्यक्ष यांपैकीं कोणत्याना कोणत्या तरी निमित्तानें महाराष्ट्रांतील अनेक कर्त्या व प्रसिद्ध पुरुषांना चिपळूणकरांचें वाङ्मयपूजन करण्याची सुसंधि प्राप्त झालेली आहे व त्यां-

पैकीं प्रत्येकानें मोठ्या भक्तीनें फूल नाहीं फुलाची पाकळी त्या महाविभूतीस अर्पण करून तिच्या ऋणांतून अंशतः तरी मुक्त होण्याचा यत्न केला आहे. कै० काशीनाथ बापू पाठक यांच्यासारखे राजमान्य तर जिनसीवाले, टिळक यांच्यासारखे लोकमान्य, त्याचप्रमाणें प्रो. चांदोरकर, शिवरामपंत परांजपे, पांगारकर, न. चिं. केळकर, वामन मल्हार जोशी, ल. ब. भोपटकर, सी. के. दामले इत्यादि अनेक सन्मान्य व्यक्ति, यांचीं आजपर्यंत या समारंभांतून भाषणें झालीं आहेत. यांपैकीं लो० टिळक यांनीं १९०१ सालीं विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या वेळच्या स्थितीवर लिहून वाचलेला निबंध फार मार्मिक व मुद्देसूद असून त्यांत चिपळूणकरांच्या कर्तृत्वाची भूमिका सुरेख रीतीनें विशद केली आहे व चिपळूणकरांवर केल्या जात असलेल्या अनेक आक्षेपांचेंही निराकरण केलें आहे.

याप्रमाणें सद्वर्तनप्रवर्तक मंडळींच्या कार्याची रूपरेषा आहे. हिच्या मार्फत १८९१ सालीं चिपळूणकरांच्या पुण्यतिथीनिमित्त जो मेळा भरला होता त्यांत श्री० वासूकाका जोशी यांनीं चिपळूणकरांचें चरित्र लिहिणारास २०० रुपयांचें बक्षीस जाहीर केलें. या बक्षिसाच्या पुकाऱ्यामुळेंच अखेर विष्णुशास्त्र्यांचा त्यांच्या बंधूंनीं लिहिलेला चरित्रग्रंथ बाहेर आला. शिवाय कांहीं वर्षांपूर्वीं वासूकाकांनीं चिपळूणकरांचा अर्धपुतळा करवून तो म्युनिसिपालिटीमार्फत रे मार्केटांत स्थापन केला आहे, हें प्रसिद्धच आहे. शास्त्रीबुवांच्या एका कर्तृत्ववान् शिष्यानें आपल्या गुरूची ही केलेली सेवा स्मरणीय आहे यांत शंका नाहीं. चिपळूणकरांचे चरित्रकार त्यांचे बंधु लक्ष्मणराव चिपळूणकर व खंडेराव भिकाजी बेलसरे या दोघांचाही येथें उल्लेख करणें आवश्यक आहे. लक्ष्मणरावांचा सुंदर चरित्रग्रंथ प्रसिद्धच आहे; त्याविषयीं जास्त लिहावयास नको. बेलसरे यांनीं १८९१ सालीं 'निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या चरित्राचें व लेखांचें साधारण स्वरूप' या नांवानें एक लहानसें

विवेचनात्मक चरित्र लिहिलें होतें. चिपळूणकरांचें म्हणण्यासारखें असें हेंच पहिलें चरित्र होय. यांतील चिपळूणकरांच्या कर्तृत्वाचें विवेचन फार सुंदर असून आजमितीलाही तें वाचण्यालायक आहे. पुढें त्यांनीं चिपळूणकरांचे मालेखेरीज इतरत्र, म्हणजे शाळापत्रक, केसरी यांत आलेले लेख एकत्र करून ते दोन भागांत छापून काढले. पहिला भाग १८९६ सालीं व दुसरा १९०२ सालीं छापून प्रसिद्ध केला. या दुसऱ्या भागांत चिपळूणकरांचे इंग्रजी लेख व त्यांचा कांहीं पत्रव्यवहार यांचाही समावेश केला आहे; व बेलसरे यांनींच लिहिलेला ८४ पानांचा उपोद्घातही त्यास प्रारंभीं जोडला आहे. बेलसरे हे मालाकारांच्या अनन्यभक्तांपैकीं एक होते. त्यांनीं लिहिलेला हा उपोद्घात अतिशय मार्मिक व सुंदर असून त्यांत मालाकारांच्या मुत्सद्दीपणा, योजकता, वगैरे कांहीं गुणांचें फार चांगल्या रीतीनें उद्घाटन केलेलें आहे. बेलसऱ्यांनीं आपली भाषाही निबंधमालेच्या नमुन्यावर घटविली असून ती भारदस्त परंतु चटकदार अशी वठली आहे. 'शास्त्रीबोवांच्या ग्रंथांतील रम्य स्थळें' एकत्र काढून त्यांचें पुस्तक छापण्याचाही बेलसरे यांचा विचार होता असें त्यांच्या इतर पुस्तकांतील जाहिरातीवरून कळतें. परंतु असें वेंच्यांचें पुस्तक तयार झालें असल्याचें कोठें पाहण्यांत नाहीं. पूर्वीच्या पिढींतील ज्या संस्मरणीय साहित्यसेवकांना आजची पिढी विसरून गेली आहे त्यांपैकीं बेलसरे हे एक होत. चिपळूणकरांची स्मृति उज्ज्वल राखून त्यांच्या खऱ्या योग्यतेची महाराष्ट्रास जाणीव करून देण्याचें महनीय कार्य तर त्यांनीं केलेंच, परंतु इतर रीतींनीं त्यांनीं केलेली वाङ्मयसेवाही कमी महत्त्वाची आहे असें नाहीं. त्यांनीं स्वतः कांहीं कथा लिहिल्या असून गुजरातींतून कांहीं नवलकथांचीं मराठींत भाषांतरें केलीं आहेत. परंतु सर्वांत अधिक संस्मरणीय व अवाढव्य असा त्यांचा उद्योग म्हणजे शेक्सपियरच्या सर्व नाटकांचें मराठींत यथातथ्य भाषांतर करण्याचा होय. हा उद्योग अर्थात् पूर्णतया

तडीस गेला नाहीं हें सांगणें नकोच. फक्त पांचसहा नाटकांचींच भाषांतरें त्यांच्या हातून झालीं व पुढें ते कालवश झाले.

याशिवाय श्री. पांगारकरांचा 'निबंधमालेचें स्वरूप व कार्य' हा चिपळूणकरांच्या श्राद्धतिथीस वाचलेला निबंध, त्याचप्रमाणें केसरींत प्रसिद्ध झालेले अनंत वामन बर्वे, तळवलकर वकील वगैरेंचे निबंध व सालोसालचीं व्याख्यानें हींही वाचण्याजोगीं आहेत. ग्रंथमालेंत कै० राजवाडे यांनीं स्वतःच्या विद्यालयीन अनुभवावर लिहिलेला निबंधही विष्णुशास्त्री यांच्या कामगिरीचें मर्म उत्कृष्ट रीतीनें समजावून देणारा आहे. श्री. न. चिं. केळकर यांनीं 'Indian Worthies' नामक लेखमालिकेकरितां इंग्रजींत लिहिलेलें व पुढें मद्रासच्या नटेसन कंपनीनें स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध केलेलें त्रोटक चरित्र चिपळूणकरांच्या कामगिरीची महाराष्ट्राबाहेरील लोकांना कल्पना आणून देण्याच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त आहे.

चिपळूणकरांच्या अकालिक निधनानें कित्येक कवींची प्रतिभा प्रस्फुरित होऊन कांहीं शोकपर काव्येंही निर्माण झालीं, त्यांचा येथें उल्लेख करणें अप्रासंगिक होणार नाहीं. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचें म्हणजे हरिभाऊ आपटे यांचें 'शिष्यजनविलाप' हें काव्य होय. चिपळूणकरां-विषयींच्या नितान्त भक्तीनें प्रेरित होऊन हरिभाऊंनीं अंतःकरणाच्या उचंबळलेल्या स्थितींत हें शोकगीत रचलें व चिपळूणकरांच्या तेराव्या दिवशीं तें सर्वत्र वाटण्यांत येऊन त्या दिवशीं न्यू इंग्लिश स्कूलमध्यें भर-लेल्या सभेंत त्यांतील कांहीं भाग आगरकरांनीं वाचून दाखविले, इत्यादि वृत्तांत कुमारी वेणूबाई पानसे यांनीं आपल्या हरिभाऊंच्या चरित्रांत सरस रीतीनें वर्णन केला आहे. हरिभाऊ आपट्यांना निरपेक्ष वाङ्मयसेवेची दिव्य स्फूर्ति चिपळूणकरांपासूनच प्राप्त झाली. प्रारंभीं प्रारंभीं त्यांच्या मनावर व लिखाणावर मालेची छाप पुष्कळच पडलेली होती हें मार्मिक

आलोचकांस तेव्हांच दिसून येणारें आहे. कै. विठ्ठल भगवंत लेंभे व दामोदर एकनाथ पाटसकर या दोघांनीं मिळून लिहिलेलें ' विष्णुनिधन ' काव्य व गंगाधर रामचंद्र मोगरे यांचें चिपळूणकरांवरील शोकगीत हींही उल्लेखनीय आहेत.

चिपळूणकरांची पन्नासावी पुण्यतिथि १९३२ सालीं प्राप्त झाली, त्यावेळीं ' केसरी ' पत्रानें त्यांच्या कामगिरीचें अनेकशः वर्णन करणारा एक विशेषांक काढिला होता त्याचाही येथें उल्लेख केला पाहिजे. त्या पुण्यतिथीनिमित्त मोठी सभा तर पुणें येथें झालीच, परंतु चिपळूणकरांच्या एका उचित व सुंदर स्मारकाचीही योजना सिद्ध झाली ही विशेष गोष्ट होय. ' केसरी–मराठा, ' ' चित्रशाळा, ' ' आर्यभूषण, ' ' न्यू इंग्लिश स्कूल ( डे. ए. सोसायटी ), ' ' किताबखाना ' या चिपळूणकरांनीं स्थापिलेल्या संस्थांनीं दिलेल्या वर्गणीच्या व्याजांतून एम्. ए. परीक्षेंत मराठी विषय घेऊन पहिला आलेल्या विद्यार्थ्यास चिपळूणकरांच्या नांवानें पारितोषक द्यावयाची योजना मुक्रर होऊन त्याप्रमाणें १९३३ सालीं पारितोषक देण्यांतही आलें.

प्राक्कालीन आक्षेपक-समर्थकांचें येथवर पर्यालोचन केलें. त्यावरून चिपळूणकरांना निंदकांची त्याचप्रमाणें स्तुतिपाठकांची आजवर वाण पडलेली नाहीं असें दिसून येईल. अर्थात् चिपळूणकरांच्या कृत्यांच्या व उद्गारांच्या बरेवाईटपणाबद्दलचा वाद बहुधा पक्षाभिमानाच्या दृष्टीनें आजपर्यंत चालत आला आहे. सुधारकपक्षांतील मंडळी हटकून त्यांच्या दोषदर्शनाविषयीं तत्पर असलेली आढळावयाची. याच्या उलट धर्माभिमानी व राष्ट्रीय पक्षांतील मंडळी नुसते त्यांचे उघड उघड दिसणारे गुण वर्णूनच तृप्त राहावयाची. अशा स्थितींतही मार्मिक व रहस्योद्ग्राही विवेचन मुळींच होत नसे असें नाहीं. तथापि त्यांत समतोलपणाचा अंश कमी असल्यामुळें त्याला एकांगीपणाचें स्वरूप

येत असे. अजूनही ही स्थिति बदललेली आहे असें नाहीं. वस्तुतः पाहतां आतां ही स्थिति बदलून निःपक्षपाती दृष्टीनें चिपळूणकरांच्या कर्तृत्वाविषयीं विचार व्हावयास लागावा. ज्या व्यक्तीला मरून आजामितीस पन्नासांवर वर्षें झालीं तिच्या सर्व तऱ्हेच्या कृत्यांविषयीं समतोल विवेचन होऊन तिचें राष्ट्राच्या इतिहासांतलें स्थान व तिच्या गुणदोषांविषयींचा निर्णय सर्वानुमतें कायम होऊन जाण्यास वास्तविक कांहीं हरकत नाहीं. इतर देशांकडे पाहिलें तर त्यांच्या समाजांत अशाच रीतीनें एखाद्या व्यक्तीच्या कर्तृत्वाविषयीं सर्वसामान्य अशीं मतें बनत जाऊन तीं तीस चाळीस वर्षांच्या अवकाशांत इतिहासरूपानें स्थिर होतात. अशा रीतीनें बिनबोभाट इतिहासाचे थरावर थर बसत जातात. इतरत्र अशी स्थिति दिसत असून आमच्या या देशांत मात्र चाळिसांवर वर्षें होऊन गेलीं तरी मृत मनुष्याच्या कृत्यांसंबंधानें मतभेदाचीं रणें माजतात व बिचाऱ्या मृतव्यक्तीस उद्देशून गलिच्छ, निंदापर आणि सद्भिरुचीस न शोभणारीं अशीं विधानें करण्यांत येतात. अलीकडे युनिव्हर्सिटींत मराठीचा प्रवेश झाला आहे, तेव्हां खरोखर समतोल दृष्टीनें वाङ्मयाचें विवेचन होऊं लागावें. परंतु मृतांबद्दल सुद्धां उखाळ्यापाखाळ्या काढण्याची संवय लागलेल्या आम्हांस तें कसें जुळावें ? उलट वाङ्मयविवेचनाच्या उदात्त व पवित्र प्रदेशांत सुद्धां पक्षाभिमानाचीं दुकानें उघडून निंदेचें व मतद्वेषाचें घातुक मद्य जर आम्ही सर्वांस न चारूं तर आमची बहादुरी ती काय? असो. तेव्हां कांहीं वाङ्मयविवेचनाच्या अगर दुसऱ्या कसल्या तरी मिषानें व कांहीं खऱ्या प्रामाणिकभावानें असे जे बरेचसे आक्षेप चिपळूणकरांच्या कृत्यांवर व लेखांवर अलीकडे घेण्यांत आले आहेत त्यांना उत्तर देणें जरूर झालें आहे. अशा उत्तराचे अभावीं त्यांच्या चरित्राविषयीं कित्येकांचे—विशेषतः तरुण मंडळीचे—गैरसमज होत असल्याचें प्रत्ययास येतें. शिवाय चिपळूणकरांची स्वतःची वृत्ति ‘ उसनें

फेडूं नयेचि सोसावें ' अशा तऱ्हेची मुळींच नसून, ते आपल्यावरील प्रत्येक आक्षेपाचें यथास्थित खंडन करीत असत. आतां

**प्रहर नमतु चापं प्राक्प्रहारप्रियोऽहं**
**मयि तु कृतनिघाते किं विदध्याः परेण ।**

अशी धीरोद्धत गर्जना करणारे चिपळूणकर तर निघून गेलेच आहेत. तेव्हां त्यांच्यामागून येऊन त्यांचें ऋण डोक्यावर वागविणारांनाच आक्षेपकांचा परामर्श घेऊन विष्णुशास्त्र्यांच्या कामगिरीचें यथार्थ स्वरूप उघड करून दाखविणें प्राप्त आहे.

प्रस्तुत लेखमालिकेंत मुख्यत्वेंकरून ज्या आक्षेपकांचा परामर्श घेतला आहे त्यांचे लेख सुमारें दहा बारा वर्षांपूर्वीं म्हणजे १९२१ ते १९२४ पर्यंतच्या अवकाशांत लिहिले गेलेले आहेत. त्यांवर ही लेख-माला १९२५ मध्यें लिहिली व १९२६ सालीं पुण्यास नुकत्याच सुरू झालेल्या 'रत्नाकर' मासिकांत ती क्रमशः प्रसिद्ध झाली. अर्थात् त्यावेळीं आक्षेपकांचे लेख ताजे होते व त्यांतील विषयांपेक्षां ते लिहिणाऱ्या व्यक्तींकडेच अधिक प्रमाणांत लोकांचें लक्ष लागणें स्वाभाविक होतें. प्रस्तुत लेखकानेंही त्यांच्या आक्षेपांचा विचार करितांना प्रत्येक आक्षे-पकाच्या आक्षेपार्ह वा प्रशंसार्ह मनोवृत्तीचें उद्घाटन करण्याकडेच विशेष लक्ष दिलें होतें. शिवाय तात्कालिक अभिनिवेशही थोडासा होताच. या कारणसमुच्चयामुळें पूर्वीं या लेखमालिकेमधील प्रत्येक भाग एकेका आक्षेपकास वाहिलेला असून त्या भागास आक्षेपकाच्या नांवाचाच मथळा दिलेला होता. अशा रीतीनें आक्षेपकांच्या नांवांचे निदर्शक असे, प्रास्ताविक भागाखेरीज, पुढील तीन भाग प्रस्तुत लेखमालेचे झाले होते.—

१. श्री. नरहर रघुनाथ फाटक
२. श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर

३. श्री. रामचंद्र भिकाजी जोशी.

ही रचना त्या वेळीं झाली ती युक्तच होती. परंतु हे लेख आतां ग्रंथ-निविष्ट करण्याचा समय प्राप्त झाला असतां, पूर्वीची मांडणी तशीच कायम ठेवणें इष्ट होणार नाहीं असें वाटून ती बऱ्याच अंशानें बदलून टाकण्यांत आली आहे. व्यक्तींचे निदर्शक असे मथळे काढून टाकून लेखांची अंतर्गत रचनाही बरीच फिरवून टाकली आहे. पूर्वीं एका व्यक्तीच्या सर्व आक्षेपांचा विचार एकाच लेखांकांत एकत्र केला होता, तो प्रकार बदलून आतां प्रतिपाद्य विषयांस अनुसरून निरनिराळे लेखांक कल्पिले आहेत व त्या विषयांत अंतर्भूत होणारे सर्व व्यक्तींचे आक्षेप तेथें एकत्रित करून त्यांचा विचार केला आहे. अर्थात् प्रत्येक लेखांकास त्यांतील मुख्य प्रतिपाद्य विषयाचाच मथळा दिला आहे. अशा रीतीनें पूर्वींच्या रचनेंत विशिष्ट व्यक्तींवरच रोख असल्याचा भास होऊन त्यांचा बुद्धिपुरस्सर अधिक्षेप केल्याचा जो आरोप प्रस्तुत लेखकावर येण्याजोगा होता, त्या आरोपास यत्किंचित्ही अवकाश मिळूं नये व विषयाच्या प्रतिपादनाकडेच वाचकांचें लक्ष सर्वस्वीं वेधावें अशी योजना केली आहे. आणि या नवीन योजनेच्या हेतूस अनुसरून अंतर्गत मजकुरांतही योग्य तो बदल केला आहे. व्यक्ति ह्या केवळ निमित्तमात्र होत. मुख्य प्रश्न मतांचा व विचारसरणीचा आहे. व्यक्तीबद्दल कोणताही किंतु मनांत न बाळगतां मतांचें व त्या मतांच्या पाठीमागें असलेल्या पक्षपाती मनोवृत्तीचें अनिष्टत्व प्रतिपादन करावें हाच लेखकाचा हेतु आज आहे व तोच सात आठ वर्षांपूर्वीं प्रथम लेख लिहितांनाही होता. तो हेतु अधिक स्पष्ट व्हावा व एकेका मुद्याचें एके ठिकाणीं साकल्यानें विवेचन करितां यावें, यासाठींच लेखांच्या योजनेमध्यें वर सांगितलेला फेरफार केला आहे. आक्षेपकांच्या रोषाला अगर त्यांच्या टीकेला भिऊन हा बदल केला आहे असें कोणासही वाटण्याचें कारण नाहीं. कारण, व्यक्तिनामांचे मथळे तेवढे काढून टाकले असले तरी

अंतर्गत मजकुरांत आक्षेपकांच्या नांवांचा उल्लेख करण्याचें प्रस्तुत लेखकानें कोठेंही टाळलेलें नाहीं. नामनिर्देश न करितां आडून हल्ला करण्याचा मार्ग प्रस्तुत लेखकानें कधींच अवलंबिलेला नाहीं. तो मार्ग आपाततः सुरक्षिततेचा व संभावितपणाचा भासला तरी वैरभावाचीं शल्यें परस्परांच्या अंतःकरणांत कायमचीं खुपत ठेवण्यास कारणीभूत होतो. याच्या उलट नामनिर्देश करून सरळपणानें केलेल्या टीकेमुळें कांहीं काळ गैरसमजाचा धुरळा खूप उडत असला, तरी कालांतरानें धूळ खालीं बसल्यावर परस्परांचीं मनें साफ होण्याचा मार्ग मोकळा होतो. प्रस्तुत लेखकाचा प्रत्यक्ष अनुभवही उपर्युक्त सिद्धान्ताचा पाठपुरावा करील असाच आहे. ज्या ज्या व्यक्तींच्या मतांवर प्रस्तुत लेखकानें सात आठ वर्षांपूर्वीं प्रखर व निर्भीड टीका केली, त्यांतून आज विद्यमान असलेल्या सर्व व्यक्तींच्या स्नेहाचें भाजन होण्याचें सुयश प्रस्तुत लेखकास लाधलेलें आहे. त्यांपैकींच एकाच्या लेखांबरोबर ही खंडनपर लेखमाला प्रसिद्ध होण्याचा सुयोग यावा हें वर उल्लेखिलेल्या दिलजमाईचें उत्कृष्ट प्रतीक होय हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. आणि असें होणें हेंच स्वाभाविक आहे. व्यक्तिविषयक दुजाभाव अगर हेवे दावे यांचा या वादांत दुरूनही संबंध येत नाहीं. या वादांतील पक्ष व तट व्यक्तींचे नसून मतांचे आहेत; अभिनिवेश वैयक्तिक स्वार्थाचा नसून व्यक्तिनिरपेक्ष विचारसरणीचा आहे. चिपळूणकर हे सर्वोच्च महात्मे ठरले किंवा नीचतम अल्पात्मे ठरले तरी त्याचें सोयरसुतक वाद खेळणाऱ्यांपैकीं एकासही नाहीं. कोणाच्याही कसल्याही लाभालाभाचे धागेदोरे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें या वादांत गुंतलेले नाहींत. अशा निरपेक्ष व व्यापक भूमिकेवरून वाद खेळण्यांतच खरी मौज आहे असें प्रस्तुत लेखकास वाटतें. आणि या भूमिकेपर्यंत पोंचूं न शकणाऱ्यांचा कितीही कटु अनुभव आलेला असला तरी प्रस्तुत लेखकास ही उच्च भूमिका कदापि सोडावीशी वाटणार नाहीं हें निश्चित होय.

वर सांगितलेंच आहे कीं, हा लढा दुसऱ्या कशाचा नसून दोन भिन्न विचारसरणींचा आहे. या दोन विचारसरणी तरी कां उत्पन्न व्हाव्या व पन्नास वर्षांचा दीर्घ काल लोटला तरी कां टिकून राहाव्या, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. हे भिन्न विचारप्रवाह व्यक्तिविषयक राग-द्वेषामुळें उत्पन्न झालेले नाहींत; त्याचप्रमाणें जात्यभिमानाची भावनाही यांच्या बुडाशीं नाहीं. चिपळूणकरांविषयींच्या भांडणांत जातिनिष्ठांचा प्रवेश मुळींच झालेला नाहीं, असें नाहीं. परंतु ती मंडळी निराळी; त्यांचा संबंध या लेखांत फारकरून आणलेला नाहीं. तर मग या विचारसरणींची व त्यांच्यामध्यें चाललेल्या कलहाची कारणमीमांसा कशी करावयाची? प्रश्नाचें उत्तर देणें फारसें कठीण नाहीं. हा भिन्न मतांचा कलह कांहीं अंशीं पक्षाभिमानामुळें व कांहीं अंशीं मनोवृत्तींतील फरकामुळें सुरू झाला आहे व आजपर्यंत चालत आला आहे, हें थोडासा विचार केल्यास कोणाच्याही लक्षांत येण्या-जोगें आहे. यांतील पक्षभेद झाले तरी मनोवृत्तींतील भेदामुळेंच बऱ्याच अंशीं निर्माण झाले आहेत असें सिद्ध करून देतां येईल. या पक्षभेदांचें खरें स्वरूप काय व ते कोणत्या भिन्न मनोवृत्तींमुळें उत्पन्न होऊन आजवर पुष्ट झाले आहेत याचें विवेचन प्रसंगोपात्त पुढील लेखमालेंत येणारच आहे. परंतु येथें येवढें सांगून ठेवण्यास हरकत नाहीं कीं, प्रस्तुत कलहाच्या मुळाशीं असलेल्या दोन्ही पक्षांचा व दोन्ही मनो-वृत्तींचा राष्ट्रास उपयोग आहे. रानडे पक्षाच्या अभिमान्यांनीं चिपळूण-करांचा अधिक्षेप करावा व उलट चिपळूणकर पक्षाच्या अभिमान्यांनीं रानडेपक्षीयांची हेटाळणी करावी, हें सामान्य मानवी मनोविकारांस अनुसरूनच होय असें म्हणणें कांहीं एका कालमर्यादेपर्यंत शोभलें असतें. परंतु आज, दोन तीन पिढ्या उलटून गेल्यानंतर, पक्षोपपक्षांची व राष्ट्रीय प्रश्नांकडे पाहण्याच्या दृष्टींची इतकी गल्लत झालेली आहे कीं, तेच पूर्वींचे पक्ष व तीच पूर्वींची कलुषित मनोवृत्ति सध्याच्या काळीं जागृत ठेवणें

अस्वाभाविक व घातकीपणाचें ठरेल. आज ज्या आक्षेपकांचा आपणाला येथें विचार करावयाचा आहे, त्यांपैकीं कित्येकांचा कल पूर्वीचे पक्ष व पूर्वीचे रागद्वेष जागृत ठेवण्याकडे विशेष दिसतो. ही प्रवृत्ति अत्यंत अनिष्ट व सध्यांच्या काळास न साजणारी होय. पूर्वींच्या काळाकडे सत्यान्वेषी व गुणग्रहणपर दृष्टीनें पाहून सर्व व्यक्तींच्या व पक्षांच्या कार्याचें आपापल्या परीनें महत्त्व व उपयुक्तत्व मान्य करणें आणि पूर्वींच्या द्वैताचा निरास करून तत्कालीन भिन्न पक्षांचा व त्यांच्या बुडाशीं असलेल्या मनोवृत्तींचा समन्वय घडवून आणणें, हें आजच्या देशहितचिंतकाचें प्रमुख कर्तव्य होय. पूर्वींच्या पक्षद्वैताचें व तदंतर्गत मनोवृत्तींचें स्वरूप कसें होतें व त्यांचा समन्वय आजच्या घटकेस कसा करतां येईल याचें विवरण प्रस्तुत लेखमालेच्या शेवटीं करण्यांत यावयाचें आहे, तेथें या सर्वच गोष्टी स्पष्टपणें सोदाहरण मांडण्यांत येतील. तिकडे वाचकांचें अनुसंधान लागावें यासाठीं हा किंचित्सा प्रस्ताव केला आहे. यावरून वाचकांच्या लक्षांत हें येऊन चुकलेंच असेल कीं, प्रस्तुत लेखक हा पूर्ण समन्वयवादी आहे. तो चिपळूणकरांचा भक्त असला तरी रानडे पक्षाच्या कार्याची थोरवी पूर्णपणें जाणतो. अर्थात् हे खंडनपर लेख लिहिण्यांत आक्षेपकांच्या कलुषित व एकांगी दृष्टीचेंच निरसन करण्याचा त्याचा हेतु आहे. लोकहितवादी, रानडे आदिकरून ज्या ज्या देशसेवकांचा अभिमान धरून हे आक्षेपक चिपळूणकरांवर प्रहार करण्यास सज्ज झाले आहेत, त्यांच्यावर उलट प्रहार करण्याची बुद्धि प्रस्तुत लेखकास होणें शक्य नाहीं. उलट चिपळूणकरांबरोबरच त्या सर्वांच्या कार्याचेंही ऐतिहासिक दृष्टीनें पर्यालोचन करून प्रत्येकाच्या कर्तृत्वाचें वैशिष्ट्य व रहस्य उघड करून दाखविण्याकडेच प्रस्तुत लेखकाचें लक्ष राहील.

---

२

# तत्कालीन लोकस्थिति व चिपळूणकरांच्या कर्तृत्वाचें रहस्य

कृशानु—अरे सकलभुवनसंशोषकारिणं तपनमपि किं नमनकर्मीकरोषि ?

विश्वावसु—किमरे भगवन्तमरविन्दबान्धवमपि विनिन्दसि ? पुरोभागिन्, भगवद्गुणेषु दोषमनीषया भवानेव दुष्यति ।

—विश्वगुणादर्श

मागील लेखांत वर्णिल्याप्रमाणें सर्व व्यक्तींच्या कर्तृत्वाचा समन्वय राष्ट्रीय इतिहासांत करून प्रत्येकाला त्याच्या कामगिरीनुसार श्रेय देणें हें ज्यांस रुचत नाहीं, अशा एकांगी विवेचकांमध्यें श्री. नरहर रघुनाथ फाटक यांची प्रमुखत्वेंकरून गणना करावी लागेल. त्यांचा व्यासंग दांडगा आहे. वृत्तपत्राच्या व्यवसायांत असल्यामुळें त्यांस वृत्तपत्रांच्या जुन्या फायली व मासिकादिकांचे जुने अंक धुंडाळण्याची जी संधि मिळाली, तिचा त्यांनीं फार चांगला उपयोग करून घेतला असल्याकारणानें पूर्वकालीन माहितीचा ते एक चालता बोलता कोशच बनले आहेत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. परंतु ते समन्वयवादी नाहींत. इतिहासजमा झालेल्या प्रश्नांकडे व व्यक्तींकडे व्यापक व सारग्राही दृष्टीनें त्यांस पाहतां येत नाहीं, असें त्यांचें लिखाण वाचून म्हणणें भाग पडतें. तथापि त्यांची विद्वत्ता, त्यांचा व्यासंग, विशेषतः त्यांना असलेली जुन्या काळाची माहिती व ती, सूक्तासूक्त रीतीनें कां होईना, आपल्या लिहिण्यांत गोवून देण्याची त्यांची पद्धत, यामुळें त्यांच्या लिहिण्याची वाचकांच्या

मनावर एक प्रकारची छाप सहज बसते. यासाठींच त्यांच्या लिहि-ण्यांतील मुद्यांचा पूर्ण विचार करून त्यांचें यथार्थ स्वरूप लोकनिदर्शनास आणणें केवळ क्रमप्राप्तच नव्हे तर अपरिहार्य झालें आहे.

श्री. फाटक यांनीं १९२३–२४ सालीं न्या. रानडे यांचें चरित्र लिहिलें. त्यांत चिपळूणकरांस उद्देशून बराच मजकूर लिहिला आहे. त्याचा परामर्श योग्य स्थलीं घेण्यांत येईलच. परंतु त्यांनीं विविधज्ञान-विस्तारांत १९३० सालच्या प्रारंभीं 'विष्णु कृष्ण चिपळूणकर' या नांवाची एक लेखमाला लिहून चिपळूणकरांच्या कामगिरीविषयींचे आपले विचार प्रकट केले आहेत. या लेखमालेचे तीन लेखांक १९३० सालीं प्रसिद्ध झालेले दिसतात, परंतु त्यांत कित्येक ठिकाणीं ज्या पुढील प्रतिपादनाचा हवाला दिलेला आहे तें पुढें कोठेंच आलेलें दिसत नाहीं, यावरून ही लेखमाला अपुरीच राहिली आहे असें दिसतें. ती पूर्ण झाली असती म्हणजे चिपळूणकरांविषयीं फाटकांचें एकंदरीनें काय म्हणणें आहे तें साकल्यानें समजण्यास मार्ग झाला असता. असो. सध्यां त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या तीन लेखांकांचाच आपण येथें विचार करूं.

## चिपळूणकरांची लोकप्रियता

तीन्ही लेखांकांत मिळून कोणता एक मुद्दा फाटकांनीं प्रतिपादन केला असेल तर तो हा कीं, चिपळूणकरांनीं जन्मास येऊन कामगिरी अशी कांहीं केलीच नाहीं. निरनिराळ्या व्यक्तींकडून नाना तऱ्हांनीं त्यांची जी महती गायिली जाते ते केवळ 'कल्पनांचे अलंकार' होत. सर्व तऱ्हेच्या देशोद्धाराच्या चळवळी चिपळूणकरांची निबंधमाला निघण्याच्या पूर्वींपासूनच महाराष्ट्राच्या केंद्रस्थानीं, म्हणजे पुण्यास व मुंबईस चालू होत्या. त्या चळवळींतील लोकांच्या कल्पनांची व कर्तबगारीची धाव पाहिली म्हणजे त्यांच्यापुढें निबंधमालेंतील प्रतिपादन कोतें व साप म्हणून भुई धोपटण्यासारखें असें वाटतें. इतर लोक जें

सांगत होते, तेंच थोड्या डौलदार भाषाशैलीनें व सत्याभास उत्पन्न कर-णाऱ्या प्रतिपादनशैलीनें चिपळूणकरांनीं सांगितलें येवढेंच. याप्रमाणें फाटकांच्या लिहिण्यांतील मथितार्थ आहे.

आतां असें जर आहे, तर आजपर्यंत महाराष्ट्रांतल्या इतक्या धुरंधर व्यक्तींनीं परोपरीनें चिपळूणकरांची त्यांच्या देशोद्धाराच्या व भाषा-संवर्धनाच्या कार्याबद्दल स्तुति कशी केली, असा साहजिक प्रश्न कोणा-च्याही मनांत येईल. हे सर्व 'कल्पनांचे अलंकार' व 'गुणानुवादाची चढती तार' दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीच्या वाटणीस न येतां एका चिपळूणकरांच्याच वाटणीस कशी आली? कारण येवढी एक गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे, कीं चिपळूणकरांना निंदकांची जरी वाण भासलेली नसली तरी 'स्तुतिपाठकांची परंपरा' येवढी जबरदस्त लागलेली आहे, कीं त्यांनीं अर्पिलेल्या स्तुतिसुमनांचे अलंकार निंद-कांनीं हिरावून घेण्याचा कितीही प्रयत्न केला, तरी तो विफल होऊन चिपळूणकरांची मूर्ति उत्तरोत्तर अधिकाधिक उज्ज्वल अलंकारांनीं नटल्याचेंच अनुभवास येत आहे. परंतु ही अडचण फाटकांनीं शिता-फीनें दूर केली आहे. बाजारबुणग्यांची सेना कितीही अफाट असली तरी काय झालें? कवाईतबाज कंपू आपल्या तोफखान्याच्या जोरा-वर अशा हजारों हजार फौजेस उधळून लावतोच कीं नाहीं? तशीच स्थिति फाटकांच्या दृष्टीनें या स्तुतिपाठकांची होय. ते बिचारे अज्ञ; तत्कालीन परिस्थिति त्यांना जर माहीतच नव्हती आणि 'मालेंतील लोक-स्थितींचीं वर्णनें अक्षरशः खरीं' मानण्याचा आत्मघातकी भोळेपणा करून जर त्यांनीं आपल्या स्तुतिपर वक्तृत्वाचा भडिमार केला तर तो भडिमार म्हणजे केवळ वायबार ठरावा यांत काय आश्चर्य? या स्तुतिपाठकांनीं माजी 'ज्ञानप्रसारक,' 'प्रभाकर,' यांच्या फायली व सार्वजनिक सभेचे जुने पुराणे रिपोर्ट यांचीं पारायणें कोठें केलीं होतीं? आणि जर केलीं नव्हतीं तर या जबरदस्त तोफा ज्यांच्याजवळ सज्ज

आहेत त्या फाटकांसमोर या बाजारबुणग्यांनीं पळच काढावा हें योग्य नव्हे काय ? तेव्हां त्या वेळच्या परिस्थितीची ज्यांना मुदलींच जाणीव नव्हती अशा शेंकडो लोकांनीं भ्रामक कल्पनांच्या आधारावर चिपळूणकरांची भरमसाट स्तुति केली तर ती वायफळ नव्हे काय ?

ही अर्थात् श्री. फाटकांची दृष्टि झाली. आतां कै. हरिभाऊ आपटे, खंडेराव भिकाजी बेलसरे, मोरो केशव दामले, शिवरामपंत परांजपे, वि. का. राजवाडे, सी. के. दामले, श्री. लक्ष्मणराव पांगारकर, न. चिं. केळकर, ना. गो. चाफेकर, वा. दा. मुंडले, ल. ब. भोपटकर—ही चिपळूणकरांचे गुणानुवाद गाणारी नाना मतांची, निरनिराळ्या व्यवसायांची व आपल्या कर्तृत्वानें ख्यातीस चढलेली मंडळी सर्व खोटी आणि 'ज्ञानप्रसारका'च्या फायलींच्या आधारावर गर्जना करणारे फाटक तेवढे खरे, असेंच महाराष्ट्रीय वाचकवर्ग समजेल कीं काय, हा मात्र प्रश्न आहे ! या वाचकवर्गापैकीं अफाट बहुमतानें पूर्वींच आपला निर्णय चिपळूणकरांच्या बाजूनें दिला आहे व पुढेंही तो देईल यांत संशय नाहीं. परंतु त्याची फाटकांस विशेषशी क्षिति नाहीं. त्यांचें म्हणणें असें कीं, या सर्व वाचकवर्गाला आणि त्याला आवेशपूर्ण वक्तृत्वानें झुलविणाऱ्या या स्तुतिपाठकांना त्या काळांतील घडामोडींची माहितीच जर नव्हती, तर चिपळूणकरांच्या कार्याचें महत्त्वमापन हे करणार कसे ? आतां वर उल्लेखिलेले सर्व 'स्तुतिपाठक' बऱ्याच पुढच्या काळांतील असल्याकारणानें चिपळूणकरांनीं ज्या परिस्थितींत कार्य केलें तिची माहिती त्यांना नव्हती हें घटकाभर वादाकरितां मान्य करितां येईल. परंतु जवळ जवळ चिपळूणकरांच्याच वयाचे व त्या वेळच्या वातावरणांत वाढलेले कै. महाजनि, जिनसीवाले, टिळक, आगरकर व श्री. वासूकाका जोशी हेही त्यांचे स्तुतिपाठकच बनलेले होते व आहेत, याची वाट काय? चिपळूणकरांनीं जर कांहीं कामगिरी केली नसेल व देशस्थितीवर

त्यांच्या कृत्यांचा व उद्गारांचा म्हणण्यासारखा परिणाम झाला नसेल तर हे सर्वजण जाणूनबुजून मतलबीपणानें असत्य बोलत होते, किंवा स्वतःच्या भोंवतालच्या परिस्थितीचें यथार्थ आकलन करण्याचीही त्यांस अक्कल नव्हती, असें म्हणावें लागेल. हा पेचही फाटकांच्या लक्षांत आला नाहीं असें नाहीं. तो दूर करण्याकरितां त्यांनीं वरच्या पैकीं पहिला विकल्प पतकरून वरील मंडळींवर अप्रत्यक्षपणें मतलबीपणाचाच आरोप केला आहे. या आरोपाची मांडणी त्यांनीं मोठ्या चतुराईनें केली आहे. त्यांच्या प्रतिपादनाचा इत्यर्थ असा दिसतो कीं, चिपळूणकर मरून गेल्यानंतर त्यांची कोणाला फारशी आठवणही राहिली नसतांना मुद्दाम कांहीं एका प्रसंगानिमित्त त्यांची आठवण उकरून काढण्यांत येऊन त्यांचें स्तोम माजविण्यांत आलें. गंजत पडलेल्या चिपळूणकरांच्या 'कीर्तीला नवी झिलई' देण्यास कारणीभूत होणारा हा प्रसंग म्हणजे संमतिवयाचा वाद होय. 'संमतिवयाच्या वादाला तोंड लागल्यावर डेक्कन एजुकेशन सोसायटीचे बरेच प्रोफेसर संमतिवयाच्या कायद्याला अनुकूल आहेत असें दिसून आल्यावर पुराणमतांच्या संरक्षणार्थ अवतरलेल्या शास्त्रीबोवांच्या संस्थेंतील माणसें स्वधर्मघातास तयार आहेत, अशी हाकाटी माजली व तिच्याच प्रेरणेनें शास्त्रीबुवांची निधनतिथि सार्वजनिक रीत्या पाळण्याच्या प्रघाताचा पाया घातला.' या फाटकांच्या वाक्याचा अर्थ असा दिसतो कीं, संमतिवयाच्या कायद्यास विरुद्ध असणाऱ्या लोकांनीं, डे. ए. सोसायटीचे मूळ संस्थापक जे चिपळूणकर त्यांच्या मताविरुद्ध हल्लींचे सभासद वागत आहेत असा आरोप करण्यास उपयोगी पडावें, म्हणून चिपळूणकरांचें नांव पुढें आणलें. आणि या निमित्तानें त्यांचें नांव पुढें आणलें गेल्याकारणानें त्यांच्या विषयींची स्मृति जागृत होऊन त्या हुल्लडींत त्यांची पुण्यतिथि पाळण्याचा प्रघात पडला! विष्णुशास्त्र्यांचें नांव यानंतर कसकसें पुढें आलें हें सांगतांना फाटक

आणखी पुढें म्हणतातः—‘ संमतिवयाच्या वादाला जोर चढण्यापूर्वी कै. न्या. तेलंग यांनीं एका व्याख्यानांत शास्त्रीबुवांना ‘मि. विष्णु’ अशा रीतीनें संबोधून त्यांच्या विषयीं न्यायबुद्धीला न शोभणारे उद्गार काढले यावरून तत्कालीन केसरीकारांनीं आपली शास्त्रीबोवांबद्दलची खरी खोटी अगर मतलबी भक्ति उजळून दाखविण्याची संधि घेतली. संमतिवयाच्या वादानें शास्त्रीबुवांच्या कीर्तीला जी नवी झिलई मिळाली तिचाच एक परिणाम त्या वादानंतर थोड्याच अवकाशांत बाहेर पडलेल्या निबंधमालेच्या आवृत्त्यांच्या योगानें दिसून येतो.’

संमतिवयाच्या वादाच्या निमित्तानें ( व तेलंगांस नांवें ठेवण्याच्या निमित्तानें ) चिपळूणकरांच्या स्मृतीला मतलबी लोकांकडून उजळा देण्यांत आला ( अर्थात् त्यापूर्वी त्यांचें नांव लोक विसरून गेले होते ), अशी जी विलक्षण कल्पना फाटकांनीं काढली आहे तिचें यथार्थत्व आपण तपासून पाहूंच. परंतु वरील मजकुरांत आपाततः खोटेपणा किती भरला आहे तें पाहण्यासारखें आहे. संमतिवयाच्या वादामुळें निबंधमालेच्य आवृत्त्या निघाल्या हें म्हणणें नुसतें कालानुक्रमाच्या दृष्टीनें पाहिल्यास खोटें ठरतें. संमतिवयाच्या वादाचा मूळ उगम जरी पाहिला तरी तो आगष्ट १८९० च्या पलीकडे जाऊं शकत नाहीं. या वादाचा विशेष जोर आक्टोबर १८९० पासून मार्च १८९१ पर्यंत होता हें त्या वेळचीं वर्तमानपत्रें चाळून पाहिल्यास कोणाच्याही लक्षांत येईल. आणि निबंधमालेची आवृत्ति प्रसिद्ध होण्याचें साल १८८९ हें आहे ! ( वाङ्मयसूचि पृ. ९३ ) यावरून फाटकांच्या विधानांत धडधडीत कालक्रमविपर्यास कसा झाला आहे हें लक्षांत येईल. इतकेंच नव्हे, तर निबंधमाला पुनः छापण्यासंबंधींची मागणी १८८६ पासूनच सुरू झाली होती हें लक्ष्मणराव चिपळूणकरांच्या चरित्रांतील पुढील उल्लेखावरून दिसून येईल.–‘ १८८६ च्या सुमारास प्रथम गवगवा ऐकूं येऊं लागला कीं विष्णुशास्त्री यांची निबंधमाला त्यांचे बंधु

किंवा इतर स्नेही तशीच कां कोमेजूं देतात? पुनरावृत्ति काढून तीस ताजें तवानें कां करीत नाहींत? कांहींकांनीं तर सही देऊन वर्तमानपत्रांत त्याबद्दल लक्ष्मणरावांस पृच्छाही केली. कोणी कालेजांतील विद्यार्थ्यांनीं त्यांस निरोप पाठविला कीं, तुम्ही निबंधमाला जर छापीत नसाल तर तुमचा हक्क गुंडाळून ठेवून आम्हीच ती छापून घेऊं!' याचा संमतिवयाशीं कसा संबंध लावावयाचा तें फाटकांनीं दाखवून द्यावें.

तेलंगांवरील टीकेसंबंधाची गोष्ट अशीच आहे. तेलंगांचें भाषण व त्यावरील केसरीची टीका डिसेंबर १८९१ मध्यें झाली. त्या वेळीं संमतिवयाचें बिल पास होऊन व त्यावरील वादसंगर समाप्त होऊन कित्येक महिने लोटले होते. आणि फाटक म्हणत आहेत कीं, ही गोष्ट संमतिवयाच्या वादाला जोर येण्यापूर्वीं घडली!

हीं फाटकांचीं खोटीं विधानें बाद केलीं म्हणजे त्यांच्या प्रतिपादनाचा निम्मा आधार कोसळून पडतो. आतां संमतिवयाच्या वादामुळें विष्णुशास्त्र्यांचें नांव पुढें आलें व त्यानंतर त्यांचा उदो उदो करण्यास धर्माभिमानी पक्षानें सुरवात केली, हा जो फाटकांचा सिद्धान्त त्यांत कितपत तथ्य आहे हें स्वतंत्र रीतीनें तपासून पाहूं.

या बाबतींत पुण्यतिथीचा जो पुरावा फाटकांनीं दाखल केला आहे तो कालानुक्रम पाहतां संशय उत्पन्न करणारा दिसतो. कारण चिपळूणकरांची पुण्यतिथि १८९१ सालीं साजरी झाल्याचा प्रथम दाखला मिळतो. आणि संमतिवयाचा वाद त्या वेळीं नुकताच होऊन गेला होता. परंतु हा केवळ काकतालीयन्यायाचा प्रकार होता, दोन्ही गोष्टींचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध नव्हता, हें उघड आहे. आगरकरांच्या मृत्यूला २० वर्षें झाल्यानंतर १९१५ सालीं त्यांची पुण्यतिथि पाळण्याचा उपक्रम ज्याप्रमाणें त्यांच्या भक्तगणांनीं सुरू केला, त्याप्रमाणें १८९१ सालीं

चिपळूणकरांची दहावी निधनतिथि पडत असल्यामुळें त्यांचे भक्त व अनुयायी यांनीं त्या वर्षीं पुण्यतिथिपालनाचा उपक्रम केला असावा, हें अनुमान सयुक्तिक दिसतें. संमतिवयाच्या कायद्याला अनुकूल असलेल्या पक्षाविरुद्ध हाकाटी करण्याच्या प्रेरणेनें शास्त्रीबुवांची पुण्यतिथि पाळण्याचा उपक्रम केला गेला असें जसें फाटक म्हणतात, त्याचप्रमाणें आदल्याच वर्षीं कैदेंतून सुटून आलेल्या टिळकांविरुद्ध हाकाटी करण्यास चांगलें निमित्त मिळावें म्हणून आगरकरांची पुण्यतिथि नेमकी १९१५ सालीं साजरी करण्यांत आली असें कोणी म्हटलें तर तें योग्य ठरेल काय ? हें विधान जसें कुत्सित व अनुदार आहे असें फाटकांस—व इतरांसही—वाटेल तसेंच त्यांचें विधानही अकलुषित दृष्टीच्या माणसास वाटेल यांत शंका नाहीं. त्यांतून टिळक—आगरकरांचा कट्टा विरोध विख्यात तरी होता. परंतु संमतिवयाचा वाद व विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा अर्थाअर्थी संबंध तरी काय ? त्याचप्रमाणें डे. ए. सोसायटीच्या सभासदांविरुद्ध हाकाटी करण्यासाठीं चिपळूणकरांच्या नांवाचा आधार घेण्याची जरूरी विरोधी पक्षाला वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. त्यांना नांवें ठेवण्यास उपयोगी पडण्याजोगे इतर मुद्दे काय थोडे होते कीं त्यासाठींच दिवंगत संस्थापकाची स्मृति उकरून काढण्याची जरूर निंदकांस वाटावी ? आणि जर अशा प्रसंगीं चिपळूणकरांच्या नांवाचा आधार खरोखर घेण्यांत येत असेल, तर त्याचा अर्थ असा होतो कीं, त्यांचें नांव अगोदरच विख्यात असून त्यांच्या नांवाचा आधार घेतल्यानें आपल्या पक्षास बळकटी येईल, अशी धर्माभिमानी पक्षास खात्री वाटत होती ! विस्मृतीच्या अंधारांत लोळत पडलेल्या एका अकिंचित्कर व्यक्तीची आठवण आपला पक्ष बळकट करण्याकरितां मुद्दाम कोण व कां काढील ? तेव्हां चिपळूणकरांचें क्षुद्रत्व व विस्मृतत्व वाचकांच्या गळीं उतरविण्याकरितां श्री. फाटक यांनीं केलेला युक्तिवाद उलट त्यांच्याच गळीं येतो.

खरा प्रकार असा आहे कीं, संमतिवयाच्या वादांत चिपळूणकरांचा उल्लेख फाटक म्हणतात अशा रीतीनें करण्यांत येत असल्याचें तत्कालीन लेखांवरून दिसत नाहीं. प्रस्तुत लेखकानें त्या काळांतील केसरीचे अंक लक्षपूर्वक वाचून पाहिले आहेत, त्यावरून फाटकांच्या विधानांस कांहीं आधार आहे असें दिसत नाहीं. कदाचित् एखाद्या वक्त्यानें, कोठें तरी, फाटक म्हणतात अशा अर्थाचें विधान केलें असेल. परंतु तें फक्त फाटकांच्याच लक्षांत यावें इतकीच त्याची मातब्बरी होय. पराचा कावळा करावयास जितका बळकट आधार असावा लागतो, तितकेंही महत्त्व त्या विधानाचें चिपळूणकरांच्या लोकप्रियतेच्या संबंधांत मानितां येत नाहीं आणि मानिलें तरी त्याचा अर्थ चिपळूणकरांच्या लोकप्रियतेस अनुकूल असाच होतो, हें वर दाखविलेंच आहे.

एकंदरींत निष्कर्ष असा कीं, संमतिवयाच्या वादांत विशिष्ट हेतूनें चिपळूणकरांचा कोणी उल्लेख केला नाहीं, कोणी एखाद्यानें वादाच्या भरांत त्यांच्या नांवाचा आधार घेतला असला, तरी तो चिपळूणकर ही अगोदर विख्यात असलेली व्यक्ति म्हणूनच घेतलेला असणार. संमतिवयाच्या वादामुळें चिपळूणकरांच्या प्रसिद्धीला नवीन चालना मिळाली ही फाटकांची कल्पना सर्वथैव मिथ्या होय.

खऱ्या ऐतिहासिक व विवेचक दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, चिपळूणकरांच्या लेखांचा व कर्तबगारीचा ज्या होतकरू तरुण पिढीच्या मनावर अत्यंत खोल ठसा उमटलेला होता, ती पिढी आपली विद्यार्थिदशा अगर होतकरूपणाचें वय संपवून जगाच्या व्यवहारांत भाग घेण्याच्या स्थितीला १८९० सालच्या सुमारास पहिल्याप्रथम आली. आणि या पिढीनेंच आपल्याला उदात्त भावनांची स्फूर्ति देणाऱ्या त्या प्रतिभासूर्याचें आवाहन करण्यास प्रथम सुरवात केली. पुढें त्यांचे लेख व कृत्यें यांचें आलोचन जसजसें अधि-

काधिक होत चाललें, तसतसा उत्तरोत्तर येणाऱ्या तरुण पिढ्यांमध्यें त्यांच्याविषयींचा पूज्यभाव वाढत जाऊन त्यांचे गुणानुवाद गाणाऱ्यांची परंपरा एकसारखी विस्तृतच होत गेली. या साध्या व नैसर्गिक क्रमाने घडून आलेल्या आणि कोणासही उघड दिसून येणाऱ्या गोष्टींचा विनाकारण विपर्यास करून फाटकांनीं आपल्या विकृत दृष्टीचें मात्र प्रदर्शन केलें आहे.

तेव्हां इ. स. १८९७ पूर्वी चिपळूणकरांचा गौरव प्रसिद्धपणें फारसा झालेला दिसत नाहीं, याचें मुख्य कारण थोडा विचार केला असतां सहज लक्षांत येणारें आहे. त्यांच्या सहकाऱ्यांपैकीं टिळक व आगरकर यांच्या मनांत त्यांच्याविषयीं आदर होता, परंतु त्यांचा गौरव करण्याकरितांच विशेष उद्योग करावा इतकी उत्कट भक्ति नव्हती व त्यांस फुरसतही नव्हती. सोसायटींतील इतरांचा चिपळूणकरांशीं फारसा प्रत्यक्ष संबंध आलेला नसल्यामुळें त्यांची या बाबतींत मुळींच आस्था नसणें हें साहाजिक होतें. बरें, संपत्तीच्या व अधिकाराच्या जोरावर जो एक उपकृतांचा व बगलबच्चांचा वर्ग आपल्या भोवतीं निर्माण करतां येतो, तोही जमविण्यास चिपळूणकरांच्या पाशीं साधन नव्हतें. राजदरबारीं किंवा बड्या लोकांत त्यांची मान्यता मुळींच नव्हती. अशा स्थितींत आपल्या उज्ज्वल कर्तबगारीच्या योगानें ज्यांच्या मनांत त्यांनीं स्फूर्ति उत्पन्न केली होती, अशी तरुण मंडळी आपल्या पणांत येईपावेतों त्यांच्या गौरवाचे समारंभ लांबणीवर पडणें अपरिहार्य होतें. याचा अर्थ, मध्यंतरींच्या आठ दहा वर्षांच्या काळांत त्यांच्याविषयींची स्मृति जागृत नव्हती व आदरभाव कोणासही वाटत नव्हता, असा मात्र नाहीं. त्यांच्या लोकप्रियतेचीं व स्फूर्तिप्रभावाचीं प्रमाणें त्यांच्या मृत्युकालापासूनच अनेक दृग्गोचर होऊं लागलीं होतीं. त्यांच्या निधनानंतर लगेच, पुण्यांतील त्यांच्याविषयीं पूज्यभाव बाळगणाऱ्या अनेक तरुणांनीं **त्यांचें स्मारक म्हणून**

'निबंधचंद्रिका' नांवाचें मासिक सुरू केलें. त्याच्या पहिल्या चार अंकांत मिळून चिपळूणकरांच्या कर्तृत्वाचें योग्य वर्णन करणारा एक सुंदर संपादकीय लेख आलेला आहे, त्यांतील चिपळूणरांविषयींचे गौरवपर उद्गार फाटकांनीं 'स्तुतिपाठकांची परंपरा' म्हणून दाखल केलेल्या उत्तरकालीन व्यक्तींच्या स्तुतिपर उद्गारांहून रेसभरही कमी ठरणार नाहींत. हरिभाऊ आपट्यांसारख्या प्रतिभाशाली तरुणानें पूज्यभावप्रेरित होऊन त्यांच्यावर एक सुंदर शोकगीत रचलें. पांच वर्षांच्या आंतच निबंधमालेच्या नवीन आवृत्तीविषयीं मागणी सुरू झाली व लवकरच तिच्या एक सोडून दोन आवृत्ति बाहेर पडल्या. तेराशें पानांचें येवढें प्रचंड पुस्तक, त्याच्या मूळ प्रसिद्धीनंतर केवळ सात आठ वर्षांच्या अवधीमध्यें, निवळ लोकआश्रयावर विसंबून, एका नव्हे तर दोन प्रकाशकांनीं अहमहमिकेनें प्रकाशित करण्याचें धाडस करावें व त्यांचें हें धाडसही त्या ग्रंथाच्या लोकप्रियतेशीं पुरें पडण्यास असमर्थ ठरून त्याच्या छापलेल्या प्रती तडाख्यांत खपून जाव्या ही गोष्ट मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत त्या वेळीं तर अपूर्व होतीच, परंतु पुस्तकाचें स्वरूप व त्याचा प्रचंडपणा लक्षांत घेतां आजतागायत ती अपूर्वच आहे, असें म्हटलें पाहिजे. कोणाचेंही अंतःकरण उचंबळून सोडील इतकी स्वयंभू लोकप्रियता या प्रकारावरून सिद्ध होत असतां संमतिवयाचा व चिपळूणकरांच्या कीर्तीचा बादरायण संबंध जोडण्यांत फाटकांसारख्यांनीं आपलें डोकें खर्च करावें याचा मोठा अचंबा वाटतो !

चिपळूणकरांच्या लोकप्रियतेला 'सवंग,' 'टारगेपणा करून मिळविलेली,' 'दुसऱ्यांच्या कुचेष्टेच्या भांडवलावर संपादन केलेली,' अशीं विशेषणें त्यांच्या बहुतेक दूषकांनीं दिलीं आहेत. परंतु ती लोकप्रियता मुळांत नव्हतीच असें ध्वनित करून एका विशिष्ट पक्षानें ती कृत्रिम रीतीनें आपल्या मतलबास्तव उत्पन्न केली, अशी कल्पना काढणारे श्री. फाटक हे बहुधा एकटेच आहेत. चिपळूणकरांच्या लोक-

प्रियतेला दूषणें देण्यासाठीं किंवा ती मुळांत फारशी नव्हतीच असें प्रतिपादन करण्यासाठीं टीकाकारांची अहमहमिका कां चालावी, याचा उलगडा करणें मोठेंसें कठीण नाहीं. ह्या टीकाकारांना पूज्य व मान्य अशा ज्या त्या वेळच्या इतर व्यक्ति त्यांच्या लोकप्रियतेचा प्रकार चिपळूणकरांच्या लोकप्रियतेपेक्षां फार निराळा होता ! चिपळूणकरांना ज्या तऱ्हेची लोकप्रियता मिळाली त्या तऱ्हेची लोकप्रियता आपणासही मिळावी अशी उत्कट इच्छा या दूषकांच्या मनामध्यें वागत नसेल असें नाहीं. तथापि ती ख्याति व ती लोकप्रियता खुद्द त्यांना तर नव्हेच, परंतु त्यांच्या परात्पर गुरूंना व परमदैवतांनाही कधींच मिळाली नसल्या-कारणानें ‘ द्राक्षें आंबट ’ हा न्याय या ठिकाणीं स्वाभाविकपणें लागू पडला असला तर त्यांत काय नवल ?

सध्यांचें युग हें लोकसत्तेचें युग आहे, आपल्याला जें कांहीं सांगावयाचें आहे तें सामान्य जनसमुदायास सांगावयाचें आहे— अर्थात् सामान्य जनांस आपण जें सांगतों त्याविषयीं प्रीति व गोडी वाटली, आपण आपल्या लेखनानें त्यांचीं मनें वेधून घेतलीं, तरच आपलें प्रतिपादन त्यांच्या मनांत ठसेल व त्यांच्या मनावर कांही तरी परिणाम होऊन ते कार्यप्रवृत्त होतील—ही गोष्ट चिपळूणकरांनीं बरोबर ताडली होती, असें त्यांच्या लिखाणाच्या स्वरूपावरून दिसतें. लोकसमुदायाचें मन आकृष्ट करून घेण्यासाठीं आपलें लिहिणें, बोलणें व करणें हें सर्वस्वीं लोकाभिमुख असलें पाहिजे. तसें चिपळूणकरांचें होतें. त्यांनीं पतकरलेली राजसेवाही लोकोपकारी स्वरूपाचीच होती व संधि येतांच तीही त्यांनीं सोडून दिली. चिपळूण-करांच्या पूर्वीच्या व त्या वेळच्या कार्यकर्ते म्हणून गाजलेल्या बहुतेक पुढाऱ्यांचा प्रकार असा नव्हता. त्यांपैकीं बहुतेक जबाब-दारीच्या राजकीय अधिकारांवर नियुक्त झालेले होते. चिपळूणकरांनीं जन्मभर जें कांहीं केलें तें सर्व लोकाभिमुख होऊन लोकांकरितां केलें.

याच्या उलट तत्कालीन इतर पुढाऱ्यांचें लिहिणें, बोलणें व करणें बव्हंशीं सरकारकरितां व अल्पांशानें निर्भेळ लोकांकरितां असें होतें. या सर्वांच्या प्रत्यक्ष राजसेवेंत व्यतीत होणाऱ्या कर्तबगारीचा विचार जरी सोडून दिला तरी त्यांच्या कांहीं लोकसुधारणेच्या चळवळी देखील सरकारकडे तोंड करून चाललेल्या होत्या. सरकारांत अर्जविनंत्या करणें, माहिती पाठविणें, तक्रारी गुदरणें, वगैरे प्रकार निरनिराळ्या संस्थांमधून जे चाललेले असत ते एरवीं कितीही उपयुक्त अगर त्या कालास अनुरूप असले तरी लोकसंग्रहाच्या व लोकवशीकरणाच्या दृष्टीनें त्यांचा कांहीं उपयोग नव्हता हें स्पष्ट आहे.

प्रौढ व सफाईदार इंग्रजी लिहितां येत असून सुद्धां चिपळूणकरांनीं आपली मातृभाषा जी मराठी तिलाच आपल्या विचारांची वाहक बनविलें. या गोष्टीचें मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या उद्धाराच्या दृष्टीनें कितीही महत्त्व असलें तरी लोकाभिमुखतेच्या दृष्टीनेंही तिचें महत्त्व विसरून चालणार नाहीं. इतर सर्व लहान मोठ्या धेंडांची इंग्रजी हीच शिष्टव्यवहाराची भाषा बनून गेली होती. मातृभाषेचा ते फार कमी प्रमाणांत अवलंब करीत. साहजिकच या धेंडांचें कार्य सामान्य लोकसमुदायास तितकें दुरावलें आणि चिपळूणकरांचे विचार मातृभाषेंतच प्रकट होत असल्यामुळें त्यांविषयीं त्यास आत्मीयभाव वाटूं लागला.

परंतु केवळ लोकाभिमुखता हा चिपळूणकरांच्या कार्याचा अनन्यसामान्य विशेष नव्हे. इतरांचीं कार्येंही कांहीं अंशानें लोकाभिमुख होतीं हें वर ध्वनित केलेंच आहे. लोकहितवादींनीं आपलीं शतपत्रें लिहिलीं तीं पूर्णपणें लोकाभिमुख होऊनच लिहिलीं. रानड्यांनीं व्याख्यानें दिलीं व अनेक चळवळींस अप्रत्यक्षरीत्या साहाय्य केलें, त्याचप्रमाणें तेलंगांनीं कांग्रेसपूर्वीं व कांग्रेसमधून राजकारणी चळवळ केली, हें

सर्व बऱ्याच अंशीं त्यांच्या लोकाभिमुखतेचेंच निदर्शक होय. परंतु चिपळूणकरांच्या लिहिण्याबोलण्यांत व करण्यांत दुसरें अभिनव तत्त्व होतें, तें लोकानुरंजनाचें होय. आपलें प्रतिपादन व आपलें कार्य लोकांच्या प्रीतीस व अभिमानास पात्र करावयाचें असेल, तर आपण लोकानुरंजनाचीं साधनें कुशलतेनें अमलांत आणलीं पाहिजेत, याची स्पष्ट जाणीव चिपळूणकरांस होती. हीं साधनें आपण उपयोजीत आहोंत हें अगदीं योग्य आहे, अशी त्यांची दृढ भावना होती व हीं आपलीं साधनें यशस्वी होत असून त्यांच्यामुळें लाधलेल्या लोकप्रियतेच्या आधारावर आपण लोककार्याच्या प्रचंड इमारती उभवूं शकूं असा दांडगा आत्मविश्वासही त्यांस पुढें पुढें वाटूं लागला होता. हीं लोकानु-रंजनाचीं साधनें म्हणजे दृष्टान्तादिक अलंकार, विनोद, उपहास, व्याजोक्ति, परमतखंडन, पूर्वजांच्या महिम्याचें गायन, इत्यादि होत. इंग्लंडामध्यें पार्लमेंटसत्तेच्या प्रभातकालीं ॲडिसन, स्टील, स्विफ्ट हे विख्यात लोकानुरंजनार्थ लिहिणारे लेखक होऊन गेले; त्याचप्रमाणें पुढें लोकसत्तेच्या उदयकालीं मेकाले, पामर्स्टन, डिझरायली इ. लोका-राधनतत्पर वक्ते अनेक झाले;—त्यांचीं उदाहरणें चिपळूणकरांच्या डोळ्यांसमोर त्यावेळीं खेळत होतीं. त्यांनीं ज्या साधनांचा लोकरंजना-साठीं, स्वपक्षसमर्थनासाठीं व परपक्षखंडनासाठीं उपयोग केला तशाच प्रकारचीं साधनें चिपळूणकरांनीं महाराष्ट्रांत मराठी भाषेमध्यें प्रथमच परंतु अत्यंत यशस्वी रीतीनें उपयोगांत आणून लोकाराधनाचें कार्य साधिलें. आतां यांतील कांहीं साधनें ज्या व्यक्तींवर रोख धरून वापरलीं होतीं त्यांस व त्यांच्या चेल्यांस तीं बोचावीं हें साहजिक व अपेक्षितच आहे. परंतु या साधनांच्या योगानें लोकसमुदायाच्या अंतःकरणाचा दुर्गम परंतु नाजूक बालेकिल्ला सर करण्याचा चिपळूणकरांचा उद्देश होता व तो त्यांनीं सिद्धीस नेला हें त्यांच्या निबंधमालेनें मिळविलेल्या प्रचंड लोकप्रियतेवरून सिद्ध होत आहे.

त्या वेळची व त्यापूर्वींची बरीचशी पुढारी मंडळी लोकानुरंजन करण्याच्या, लोकांमध्यें खेळीमेळीनें वावरण्याच्या प्रवृत्तीनें प्रेरित झाली नव्हती. त्यांची भूमिका उपदेशकाची होती. परंतु व्यक्तीस काय किंवा समाजास काय वरचढपणाचा, अलिप्ततेचा आव घालणारा उपदेशक सहसा रुचत नसतो. अशा उपदेशकांचीं व लोककल्याणकर्त्यांचीं तत्त्वगंभीर प्रवचनें व पांडित्यप्रचुर व्याख्यानें व्याख्यानगृहाच्या चार भिंतींच्या आंतच विराम पावलीं असलीं व फाटकांसारख्या जबऱ्या संशोधकाच्या श्रमाचें चीज करण्यासाठीं वृत्तपत्रांच्या फायलींतून, संस्थांच्या अहवालांतून अगर कधीं मधीं छापलेल्या पुस्तकांतून अवशिष्ट राहिलीं असलीं तर तें अगदीं साहजिक आहे. चिपळूणकरांनीं जनसमुदायाचा हा स्वभाव बरोबर हेरला होता. त्यांनीं उपदेश अगदीं केला नाहीं, असें नाहीं. परंतु केला तो जपून, उपहासविनोदांनीं मिश्रित करून केला. त्यांची भूमिका वरिष्ठाची व उपदेशकाची नसून समाजाच्या सन्मित्राची होती. परिहासविनोद करणें, वेळेनसार चुच-कारणें तर वेळेनसार कानपिचक्या देण्यासही मागें न सरणें, नाना तऱ्हांनीं प्रोत्साहन देणें, अनेकविध मनोरंजक माहिती खुलवून सांगणें, इत्यादि प्रकार त्यांनीं आपल्या लेखनांत आणले ते सन्मित्रास पूर्ण साजेसेच आहेत.

तत्कालीन पुढाऱ्यांत विरलत्वेंकरून आढळणारा, परंतु चिपळूणकरांच्या लेखनांत विशेषत्वेंकरून भासमान होणारा असा आणखी एक मोठा गुण म्हणजे भावनाशालिता हा होय. थिजलेली भाषा, पोक्त युक्तिवाद, जरठ सोवळेपणा, इत्यादि गुणांनीं युक्त अशा प्रतिपादनाकडे सामान्य जनता दुर्लक्षच करील. आणि तोच अनुभव लोककल्याणाचें कंकण बांधलेल्या त्या वेळच्या स्वयंमन्य पुढाऱ्यांना येत होता. पूर्वकालीन कार्यकर्त्यांपैकीं लोकहितवादींच्या उद्गारांमध्यें भावनांचा उद्रेक, आत-ड्याचा पीळ, विचारांची तडफ दिसून येते. परंतु त्यांच्या भावना-

शालितेला लोकानुरंजनाची, जोडगण नसल्यामुळें किंबहुना स्वजनाधिक्षेपाचें विपरीत साहचर्य तीस लाभल्यामुळें तिच्यापासून कांहींच कार्य घडून आलें नाहीं. चिपळूणकरांनीं मात्र आपल्या भावनांचा अत्यंत कुशलतेनें आविष्कार करून जनतेच्या हृदयांत संवादी भावना उत्पन्न केल्या व तिचें मन वश करून घेतलें.

चिपळूणकरांच्या लेखनांतील या अपूर्व गुणांमुळें महाराष्ट्रांत कांहीं काळ ते जनसमुदायाच्या, विशेषतः तरुण पिढीच्या, गळ्यांतील ताईत बनून राहिले. त्यांत त्यांचा निस्सीम देशाभिमान, बाणेदार स्वार्थत्याग व त्यांनीं अल्पावकाशांत निर्माण केलेली अद्भुत उद्योगपरंपरा यांमुळें सर्वत्र त्यांच्याविषयीं निर्माण झालेल्या आदरबुद्धीची त्यांच्या लोकप्रियतेंत भर पडल्यामुळें आयुष्याच्या अखेरीस ते एक प्रकारें लोकप्रियतेच्या शिखराला जाऊन पोंचले होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. तावत्कालपर्यंत इतकी लोकप्रियता, जनमनें इतकीं वेधून घेण्याचें भाग्य, कोणाच्याच वांट्यास आलें नव्हतें. या त्यांच्या लोकप्रियतेचे अनेक पुरावे वर दिले आहेतच. परंतु बेलसऱ्यांनीं आपल्या पुस्तकांत यासंबंधांतच एक चित्तवेधक वृत्तान्त कथन केला आहे तो येथें सादरकरणें अप्रस्तुत होणार नाहीं. ज्या पुस्तकांतील हा उतारा आहे तें पुस्तक १८९१ सालीं प्रसिद्ध झालें असलें तरी त्याच्या आदल्या वर्षींच तयार झालें होतें व बेलसऱ्यांचा संमतिवयाच्या वादाशीं अर्थाअर्थी कांहींच संबध नव्हता हें ( फाटकांच्या माहितीसाठीं ) येथें निवेदन करणें जरूर आहे.

“शास्त्रीबोवा किती लोकप्रिय झाले होते व त्यांचे लेख वाचून वाचकांची कशी मुरकुंडी वळत असे याच्या प्रत्यंतरासाठीं एक गोष्ट एथें सांगितल्यावांचून राहवत नाहीं. आमच्या एका मित्रास निबंधमालेचा व नंतर केसरीचा फार नाद लागला व त्याच्या कर्त्याविषयीं पराकाष्ठेचें

प्रेम उत्पन्न झालें; तें इतकें कीं जर आपल्या देशाचें पुनरुज्जीवन होणें असेल व गीतेंत ‘ संभवामि युगे युगे ’ म्हणून दिलेलें आश्वासन खरें होणें असेल तर तें याच पुरुषाच्या हातून होईल असें तो वारंवार म्हणत असे व शिवाजीमहाराजांप्रमाणेंच त्यांस तो मान देत असे. सन १८८२ सालीं चातुर्थिक हिमज्वरानें तो दोन तीन महिने बेजार होऊन त्याची प्रकृति फार क्षीण झाली होती; एके दिवशीं त्याच्या समाचाराला गेलों असतां, त्यास बोलतांना विष्णुशास्त्री यांच्या मृत्यूची बातमी सांगितली, ती प्रथम त्यास खरीच वाटेना; मग वर्तमानपत्रच दाखविल्यावर त्यास जें रडें कोसळलें तें कांहीं आवरेना. तो म्हणे, देशांतील चांगले चांगलेच मनुष्य देव ओढून नेतो त्याअर्थीं या देशाचें पुरें दुर्भाग्य ओढवलें खरें; यापेक्षां मला कां मरण येत नाहीं ?......

“ यापूर्वीं माट्रिक्युलेशनचा अभ्यास करीत असतां, ता. १३ आगस्ट सन १८८१ च्या पत्रांत तो लिहितो.—‘काय करावें ! केसरी येण्याची मी अगदीं वाट पहात असतों. केसरीचे मागचे अंक व निबंधमाला वाचण्यांत फार वेळ जाऊन त्यापुढें माझ्या परीक्षेच्या अभ्यासांतही कांहीं व्यत्यय येऊं लागला आहे. याबद्दल माझे बंधु मजवर रागें भरतात व मलाही वाईट वाटत नाहीं असें नाहीं.’......”

( वि. शा. चि. यांच्या चरित्राचें व लेखांचें साधारण स्वरूप. पृ. १३३).

अर्थात् चिपळूणकरांच्या लोकप्रियतेचें क्षेत्र त्या वेळच्या कालमानानुसार अतिशय विस्तृत व सखोल असलें तरी अलीकडच्या गांधी, दास इ. पुढाऱ्यांच्या लोकप्रियतेशीं त्याची तुलना करतां यावयाची नाहीं, हें उघड आहे. किंबहुना टिळकांची लोकप्रियताही त्या मानानें अफाट क्षेत्रांवर पसरलेली ठरेल. विष्णुशास्त्र्यांची लोकप्रियता जाणत्या व शिक्षित अशा पांढरपेशा वर्गापुरती—विशेषतः ब्राह्मणांपुरती—मर्यादित होती. टिळकांच्या वेळेस, विशेषतः त्यांच्याच प्रभावामुळें, राजकारणी

भावनेचा प्रसार फार मोठ्या क्षेत्रांत झाल्यामुळें त्यांची लोकप्रियता अनेक पटीनें वाढली व सध्याच्या काळांत या लोकगंगेला अधिकच विस्तृत व अफाट स्वरूप आलें आहे हें आपण पाहतों आहों. परंतु त्या वेळच्या मानानें पाहतां चिपळूणकरांची लोकप्रियता केवळ अलौकिक होती हें कोणासही कबूल करावें लागेल. आपणाविषयींच्या निरपेक्ष प्रीतीनें व अभिमानानें उचंबळणारीं अशीं अंतःकरणें चिपळूणकरांनीं जशीं हजारों निर्माण केलीं, तशीं तत्पूर्वी किंवा त्या वेळेस, इतर कोणाही विद्वत्तेविषयीं अगर लोककल्याणेच्छेविषयीं गाजलेल्या गृहस्थानें निर्माण केलीं होतीं असें दिसत नाहीं. या धेंडांच्या भोंवतीं त्यांचे तुटपुंजे चाहत्यांचे वर्ग होते. परंतु व्यक्तीचें स्मरण झाल्याबरोबर गात्रें रोमांचित होऊन मन हर्षोत्फुल्ल व्हावें इतकी गाढ प्रीतीची भावना चिपळूणकरांच्या विषयींच महाराष्ट्रांतील—अंशमात्र कां होईना—जनतेंत उत्पन्न झाली. लोकसत्तेच्या आधुनिक युगांतील लोकनायकाचें हेंच अद्वितीय लक्षण होय. यास्तव चिपळूणकरांस महाराष्ट्राचे आद्य लोकनायक असें जें अनेकांनीं म्हटलें आहे तें रास्त ठरतें.

## श्री. फाटक यांचा पूर्वपक्ष

चिपळूणकरांची लोकप्रियता ही मतलबी लोकांनीं कृत्रिम रीतीनें उत्पन्न केलेली अतएव आगंतुक स्वरूपाची होती, असें जें फाटकांनी प्रतिपादन केलें आहे, तें चिपळूणकरांचें क्षुद्रत्व व आकिंचित्करत्व वाचकांच्या गळीं उतरविण्याचा आपला जो मुख्य उद्देश तो साध्य करण्यासाठींच केलेलें आहे, असें दिसतें. चिपळूणकरांनीं लोकहिताची फारशी कामगिरी केलीच नाहीं, ती करण्याची त्यांची कुवत व योग्यताही नव्हती, अर्थात् त्यांचें कार्यच विशेष लक्षांत घेण्याजोगें नसल्यामुळें त्यांना लोकप्रियता व प्रसिद्धि हीही फारशी मिळाली नाहीं;—अशारीतीनें आपल्या प्रतिपादनाचा सांगाडा त्यांनीं सुरेखसा जमवून दाखविला.

आहे. चिपळूणकरांच्या लोकप्रियतेसंबंधानें त्यांनीं केलेल्या विधानांचें भ्रामक स्वरूप वर उघड करून दाखविलेंच आहे, आतां त्यांचें राष्ट्रोद्धार-कार्य फाटक भासवितात त्याप्रमाणें तुच्छ व पिष्टपेषणाच्या स्वरूपाचें होतें कीं काय याचें परीक्षण करूं.

विचार, उच्चार व आचार या तीन्ही बाबतींत पाहिलें तरी चिपळूण-करांचें कार्य अगदीं क्षेतें ठरतें असें दाखविण्याचा फाटकांनीं प्रयत्न केला आहे. आचाराच्या म्हणजे प्रत्यक्ष कृतीच्या बाबतींत पाहिलें असतां तत्कालीन कार्यकर्त्यांची मजल आपण समजतों त्यापेक्षां फारच पुढें गेली होती असें फाटकांचें म्हणणें आहे. " १८५० ते १८७० हा काल कर्तबगारीच्या दृष्टीनें महाराष्ट्रांत बराच गजबजलेला आहे; किंबहुना असेंही म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं कीं शास्त्रीबुवांच्या वेळीं किंवा नंतर जेवढ्या चळवळी झाल्या अगर सांप्रत होत आहेत, त्या सर्वांचें बीजारोपण या वीस वर्षांच्या कालावधींत शास्त्रीबुवा कार्यक्षेत्रांत अवतरण्यापूर्वीं घडल्याचें दृष्टीस पडतें......शास्त्रीबुवांनीं निबंधमाला गुंफण्यास प्रारंभ करण्यापूर्वीं पुणें शहरीं माधवरावांच्या नेतृत्वाखालीं कर्तबगारीला बहर येऊं लागला होता. सार्वजनिक सभा, वक्तृत्वो-त्तेजकसभा, वसंतव्याख्यानमाला, त्याशिवाय व्यापार, उद्योगधंदे, व्यायाम, कलाकौशल्य वगैरे सर्वप्रकारच्या राष्ट्रोपयोगी चळवळींची पुणें शहरांत रानड्यांच्या प्रेरणेनें गर्दी उडाली होती......१८७४ सालीं रानड्यांनीं 'प्रातिनिधिक राज्य' या विषयावर भाषण केलें व तशा अर्थाचा अर्ज हजारों लोकांच्या सह्यांनिशीं पार्लमेंटकडे पाठविला.......
१८७६ सालीं ख्रिस्तोदास पाल यांनीं 'होमरूल' चा उच्चार केला... इंग्रजी राज्यकारभारावर स्वदेशाभिमानाच्या प्रेरणेनें खरपूस टीका करण्याला निबंधमालेचा अवतार होण्यापूर्वीं कोणीही भीत नव्हते." सामाजिक, धार्मिक बाबतींतही कार्यकर्त्यांच्या उद्योगांची धाव जबर-दस्त वेगानें चालली होती. याच्या उलट चिपळूणकरांच्या निबंधमाले-

कडे पाहावें तों काय ! तिच्यांत कोणतेंही राजकीय ध्येय स्पष्टपणें पुढें मांडलेलें आढळत नाहीं; राज्यकारभाराचे किंवा देशस्थितीचे विशिष्ट प्रश्न घेऊन टीका केलेली कोठेंही आढळत नाहीं; सामाजिक व धार्मिक बाबतींत निश्चित अशा प्रगतिपर मतांचा पुरस्कार केलेला आढळत नाहीं; केवळ तत्कालीन कार्यकर्त्यांचा उपहास मात्र केलेला आढळतो. न्यू. इंग्लिशस्कूलच्या स्थापनेच्या बुडाशीं कांही ( राष्ट्रीय ) ध्येय नव्हतें. तस्मात् चिपळूणकरांची राष्ट्रोद्धाराची म्हणून जी कामगिरी वर्णिली जाते ती सर्व फोल होय. तत्कालीन इतर पुढाऱ्यांच्या मानानें चिपळूणकरांनीं कांहीं विशेष कार्य केलें असें म्हणतांच येत नाहीं. असा फाटकांच्या पहिल्या लेखांकांतील प्रतिपादनाचा सारांश आहे.

पहिल्या लेखांत याप्रमाणें तत्कालीन लोकांच्या कर्तबगारीच्या तुलनेनें चिपळूणकरांच्या कर्तृत्वाचें परीक्षण केल्यावर दुसऱ्या लेखांकांत विचारांचें व उच्चारांचें फाटकांनीं परीक्षण केलेलें दिसतें. "निबंधमाला सुरू करण्यांत विचारक्रान्ति हा त्यांचा (चिपळूणकरांचा) उद्देश नव्हता. सामान्य लोकांना रुचण्यासारख्या विषयांचें सुबोध व मनोरंजक विवेचन करावयाचें एवढेंच त्यांचें धोरण सदर लेखांतून व्यक्त झालेलें आहे......किताबवाले पुरुष भाषेच्या जोपासनेकडे दुर्लक्ष करतात, हा दोष नाहींसा करणें हा निबंधमालेचा हेतु होता." याप्रमाणें मालाकारांच्या हेतूचा व धोरणाचा कोतेपणा अगोदर निवेदन करून पुढें मालेंतील विचारांच्या मानानें तिच्या पूर्वीं निघून अस्तंगत झालेल्या 'मराठी ज्ञानप्रसारक' या मासिकांतील लेख किती व्यापक, उदात्त व प्रगतिपर मतांचे निदर्शक होते हें फाटकांनीं बऱ्याच मोठ्या पाल्हाळानें दर्शविण्याचा यत्न केला आहे. ज्ञानप्रसारकमंडळी ही गोविंद नारायण माडगांवकर प्रभृति स्वभाषाभक्तांच्या प्रोत्साहनानें निर्माण झालेली होती. या मंडळीतर्फे निघालेल्या 'मराठी ज्ञानप्रसारक' या मासिकामध्यें रानडे, कुंटे, मोडक, परमानंद, गाडगीळ, कीर्तने, पाठक

इत्यादिकांनीं आपल्या विद्यार्थिदशेमध्यें लिहिलेले निबंध पहावयास सांपडतात. शिवाय कित्येक अप्रसिद्ध व्यक्तींचेही निबंध 'ज्ञान-प्रसारकां'त रुजू आहेत. लक्ष्मण नृसिंह जोशी नांवाच्या एका सरकारी नोकरानें 'स्वदेशाच्या हलाखीची तीव्र जाणीव' व्यक्त केली असल्याचें, त्याच्या लेखांतील उतारा देऊन, फाटक पटवून देतात. दुसरा एक लेखक सखाराम मनोहर दीक्षित हा इंग्रजी राज्याचे दुष्परिणाम वर्णन करून दृढनिश्चयानें स्वदेशी व्रत पाळण्याचा उपदेश करतो. वामन आबाजी मोडक स्वदेशाभिमानाचें माहात्म्य वर्णन वर्णन करितात. जुन्या मराठी काव्याचा उद्धार, पोवाड्यांचें संशोधन, इतिहासाचें राष्ट्रीय दृष्टया पुनरुज्जीवन, इत्यादिकांचा पायंडाही 'ज्ञान-प्रसारका'नेंच घातलेला दिसून येतो. एवंच काय, कीं निबंधमालेचें धोरण कोतें, अपुरें व अनुदात्त होतें. त्या मानानें 'ज्ञानप्रसारकां'-तील लेखांमधील विचार फारच उदात्त, व्यापक व कळकळीचे असत. अर्थात् मालाकारांनीं तत्कालीन किताबवाल्यांवर स्वभाषेच्या उपेक्षेचा केलेला आरोपही फाटकांच्या मतें खोटाच होता.—अशा रीतीनें, 'निबंधमालेचें अंतरंग सर्वच दृष्टींनीं खोडसाळ व कुचकामाचें आहे, तर 'ज्ञानप्रसारका'सारखें उपयुक्त मासिक सोडून निबंधमालेला तुम्ही कवटाळून बसलां आहांत हा तुमचा मूर्खपणा नव्हे काय ?' असाच सवाल फाटक जणूं काय महाराष्ट्र जनतेला या लेखांत विचारीत आहेत असा वाचकास भास होतो.

'माले'चें विचारदारिद्र्य व ध्येयदारिद्र्य उघड केल्यानंतर सम-कालीन सुशिक्षितांवर, इंग्रजी ग्रंथकारांवर व मिशनरी, बाटे वगैरे मंडळीवर कोरडे उडविलेले जे 'मालें'त आढळतात, त्यांतही अभिनवता बिलकुल नसून ते पिष्टपेषणाच्याच स्वरूपाचे आहेत असें फाटक प्रतिपादन करितात. 'माले'च्याच वृत्तीचें परंतु मालेपूर्वी निघालेलें मासिक 'दंभहारक' हें होय. त्याच्या व 'माले'च्या विवेचनाविषयां-

मध्यें फार साम्य आढळतें. “ ख्रिस्ती धर्माची पद्धतशीर हजेरी दंभहारकांत सांपडते. युरोपियन लोकांच्या बडेजावीचे धिंडवडे दंभहारकानें काढलेले आहेत.......समकालीन शिकलेल्या लोकांच्या उच्छृंखलपणावर झणझणीत कोरडे दंभहारकानें ओढलेले आहेत. त्यांचे मासले सादर केल्यास लोकांना निबंधमालेच्या विचारांमध्यें कोणत्याही प्रकारची अपूर्वता नव्हती, हें तर दिसेलच, पण त्याबरोबरच दंभहारक व निबंधमाला यांच्यांतील बिंबप्रतिबिंबभावही सादृश्यानें लक्षांत येईल.” ज्ञानप्रसारक, विविधज्ञानविस्तार व दंभहारक हीं ‘ माले’पूर्वीचीं मासिकें स्वभाषेच्या पुरस्कारार्थच निघालेलीं होतीं. तात्पर्य, “ शास्त्रीबुवांचा जन्म होण्याच्या आधींपासून देशाभिमानाचा जो प्रवाह स्वभाषासेवेच्या पात्रांतून वाहत होता, त्यांतलाच निबंधमाला हा एक भाषेच्या डौलदारपणामुळें व मतांच्या खळखळाटामुळें थोडा निराळा भासणारा साह्यकारी उपप्रवाह होता.”–असा आपल्या विवेचनाचा निष्कर्ष फाटकांनीं सरतेशेवटीं वाचकास सादर केला आहे.

तिसऱ्या लेखांकांत मिशनऱ्यांचे धर्मप्रसाराचे उद्योग, त्यांच्या प्रतिकारार्थ शास्त्रीमंडळींनीं व विष्णुबुवा ब्रह्मचारी सारख्यांनीं केलेले वादविवाद वगैरेंची माहिती फाटकांनीं दिली आहे. मिशनरीलोकांचें इतरांनीं पूर्वीं इतक्या प्रकारांनीं खंडन केलें असल्यामुळें मालाकारांनीं त्यांच्यासंबंधानें केलेली टीका वायफळ व पिष्टपेषणात्मक होय, असें ध्वनित करण्याचा यांत फाटकाचा हेतु असावा. त्यापुढें प्रार्थनासमाजाच्या स्थापनेची हकीकत देऊन या नूतन पंथाच्या तत्त्वांची, त्याच्या आधारस्तंभांची व पुरस्कर्त्यांची तरफदारी करून चिपळूणकरांची त्यांजवरील टीका अयथार्थ होती असें दाखविलें आहे. यासंबंधानें लिहितांना, ‘ प्रार्थनासमाजांतील पुढाऱ्यांच्या चरित्राचें निरीक्षण केल्यास त्यांतल्या एकेकानें केलेल्या लोकहिताच्या कामगिरीची बरोबरी करण्याला शास्त्रीबुवांच्या पंथांत बहुधा माणसेंच

सांपडणार नाहींत.' असें मासलेवाईक विधान फाटकांनीं केलें आहे. यानंतर 'शास्त्रीबुवांचे झाकलेले दोष,' 'शास्त्रीबुवांचा भ्याडपणा,' 'शास्त्रीबुवांची नवसफेड' या मथळ्यांखालीं चिपळूणकरांच्या वैयक्तिक चारित्र्यावर घाला घालणारा कांहीं मजकूर लिहून फाटकांच्या लेखणींतून स्रवणारी ही सरस्वती एकदम मध्येंच गुप्त झाली आहे.

फाटकांच्या विस्कळीत विवेचनाच्या फाकट पसाऱ्यांतून सुसंगत असा जो कांहीं निष्कर्ष निघतो तो वर निवेदन केला आहे. त्यांतील मथितार्थ हाच कीं तत्कालीन कार्यकर्त्यांच्या प्रगतीच्या मानानें चिपळूणकरांचा सर्व खटाटोप कोता व वायफळ होता आणि त्यांची टीका अप्रशस्त, गैरलागू असून इतरांच्या नालायकीचा व स्वतःच्या श्रेष्ठतेचा खोटाच आभास उत्पन्न करणारी होती. निबंधमालापूर्वकालीन लोकस्थितीचें व कार्यकर्त्यांच्या चळवळींचें फाटकांनीं इतकें अवडंबर माजविलें आहे कीं त्यांच्या लेखांचा बहुतेक भाग तत्संबंधींच्या पाल्हाळीक वर्णनानेंच व्यापला आहे. तेव्हां फाटकांच्या प्रतिपादनाचा विचार करण्यापूर्वीं आपणही मालापूर्वकालीन लोकस्थितीचें थोडक्यांत आलोचन करूं म्हणजे त्यांच्या म्हणण्यांत तथ्य कितपत आहे याचें आकलन सुलभ रीतीनें आपणास करितां येईल.

## मालापूर्वकालीन महाराष्ट्र

ऐतिहासिक व विवेचक दृष्टीनें पाहिल्यास चिपळूणकरांपर्यंतच्या काळाचे स्थूलमानानें तीन खंड आपणास कल्पितां येतील. पहिला काल खंड इ. स. १८१० ते १८३० पर्यंतचा, दुसरा १८३० पासून १८५० पर्यंतचा व तिसरा १८५० ते १८७० पर्यंतचा. याप्रमाणें वीस वीस वर्षांचे तीन कालखंड कल्पिल्यास तत्कालीन महाराष्ट्राच्या प्रगतीचे टप्पे साधारणपणें दिग्दर्शित केल्यासारखें होईल, असें म्हटल्यास चिंता नाहीं.

या तीन कालविभागांपैकीं पहिले दोन फक्त मुंबई शहरांतील चळवळींनींच व्यापलेले दिसून येतात. या कालामध्यें पुणें शहरासकट बाकीचा सर्व महाराष्ट्र स्तब्धच होता. मुंबई बेटांत इंग्रजांचा अंमल फार पूर्वीपासून चालू झालेला असल्यामुळें पाश्चात्य संस्कृतीच्या परिचयामुळें प्रादुर्भूत होणाऱ्या नव्या कल्पनांचा उदय तेथें बाकीच्या महाराष्ट्राच्या मानानें पुष्कळच अगोदर झाला असल्यास नवल नाहीं. पश्चिम हिंदुस्थानांत झपाट्यानें वाढत चाललेल्या इंग्रजी सत्तेचें व पाश्चिमात्य देशांशीं चालत असलेल्या व्यापाराचें केंद्र बनल्याकारणानें एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभकालीं मुंबईशहराचा सर्वच बाबतींत एकसारखा उत्कर्ष होत चालला होता. इ. स. १८१० ते ३० या अवकाशांत जगन्नाथ शंकरशेट, सदाशिव काशीनाथ छत्रे, हरि केशवजी, धाकजी दादाजी प्रभु ही महाराष्ट्रीय मंडळी शिक्षणाच्या व लौकिक कार्याच्या क्षेत्रांत प्रमुख होती. विशेषतः १८२० ते १८३० हा काल शिक्षणप्रसाराच्या दृष्टीनें महत्त्वाचा होता. १८२२ सालीं 'बॉंबे नेटिव एज्युकेशन सोसायटी 'ची स्थापना होऊन तिच्या मार्फत इंग्रजी शिक्षणाची शाळा उघडण्यांत आली व शिक्षणोपयोगी मराठी पुस्तकें निर्माण करण्याचा उपक्रम करण्यांत आला. १८२८ सालीं सुप्रसिद्ध एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटची स्थापना झाली. या कालांतील मुंबईचा गव्हर्नर एलूफिन्स्टन हा सफाईनें राज्यवृद्धि करणारा अत्यंत चतुर व धोरणी मुत्सद्दी या नात्यानें जितका अग्रगण्य तितकाच एतद्देशीय प्रजेविषयीं कनवाळू असा विद्याभिलाषी व विद्यावृद्धीच्छु लोकपालक या नात्यानें संस्मरणीय पुरुष होता. त्याच्या प्रेरणेनेंच उपर्युक्त शिक्षणसंस्था मुंबईस अस्तित्वांत आल्या. छत्रेप्रभृति मंडळींचा शिक्षणप्रसाराविषयींचा उत्साह याप्रमाणें बहुतांशीं सरकारप्रेरित होता हें उघड दिसतें. देशहिताविषयीं किंवा समाजसुधारणेविषयीं कांहीं व्यापक कल्पना उत्पन्न झाल्याचें व तन्निमित्त सार्वजनिक स्वरूपाच्या चळवळी चालू झाल्या असल्याचें दृश्य या काळांत आपल्यास दिसून येत नाहीं.

यानंतरच्या वीस वर्षांच्या म्हणजे १८५० पर्यंतच्या कालखंडांत मुंबईच्या लोकांचें पाऊल सर्वच बाबतींत पुढें पडलें, असें दिसून येतें. इंग्रजी भाषेचें व पाश्चात्य विद्यांचें बरेंच भरीव शिक्षण घेतलेली मंडळी या कालांत थोडीबहुत दिसूं लागली होती. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर हे त्यांत अग्रेसर होत. अत्यंत तैलबुद्धीचे एकपाठी विद्वान म्हणून यांचा लौकिक जसा आजवर चालत आलेला आहे तसेंच निःस्पृह, कळकळीचे व उदात्त शीलाचे कार्यकर्ते या नात्यानेंही त्यांचें नांव प्रत्येक महाराष्ट्रीयास स्मरणीय व आदरणीय झालेलें आहे. निरपेक्ष व स्वयंस्फूर्त अशी लोकहितबुद्धि या गृहस्थांचे ठायीं, त्याचप्रमाणें यांचे सहाध्यायी व स्नेही भाऊ महाजन यांचे ठायीं प्रादुर्भूत झालेली आपणास प्रथम दृग्गोचर होते. जांभेकरांनीं सरकारकडून शिक्षकांना शिक्षण देणारें नार्मल स्कूल काढविलें; स्वतः 'दर्पण' नांवाचें वर्तमानपत्र व 'दिग्दर्शन' नांवाचें मासिक, भाऊ महाजनांच्या मदतीनें, कांहीं काल चालविलें; एका ख्रिस्ती झालेल्या गृहस्थास परत स्वधर्मांत घेण्याचा प्रयत्न केला. हे सर्व उद्योग त्यांच्या आंगिक स्फूर्तीचे निदर्शक होत. भाऊ महाजनांची विद्वत्ता बाळशास्त्र्यांइतकी गाढी नसली तरी त्यांचें उदाहरण एका निराळ्या दृष्टीनें पाहिल्यास अधिक कौतुकास्पद वाटतें. या गृहस्थांनीं सरकारी नोकरी मिळविणें त्याकाळीं इतकें सुलभ असतां अनेकवार चालून आलेली नोकरी न पत्करतां स्वतंत्र राहून लोकमतास वृत्तपत्रद्वारा जागृत करण्याचें काम पत्करलें, असें जांभेकर शास्त्रीबोवांचे चरित्रकार लिहितात. 'यांची लेखनशैली मोठी चटकदार होती. वर्तमानपत्रकर्त्याचें काम यांनीं मोठ्या निःस्पृहतेनें, वजनदारीनें व सरकारी अधिकाऱ्यांची भीड न धरतां चालविलें.' यांचीं मतें सुधारकी थाटाचींच होतीं व आपल्या 'प्रभाकर' ( प्रारंभ १८४० ) वर्तमानपत्रांतून त्यांनीं 'घोकीभटां'वर झोड उठविली असल्याचा वृत्तांत अद्यापि वाचावयास

मिळतो. या काळांतील आणखी प्रसिद्ध कार्यकर्ती मंडळी म्हटली म्हणजे दादोबा पांडुरंग व त्यांचे बंधु डॉ. आत्माराम पांडुरंग, राम बाळकृष्ण (परमहंस सभेचे उत्साही संस्थापक व चालक) इत्यादि होत.

लोककल्याणाविषयींची खरी आस्था व कळकळ या काळांतील कार्यकर्त्यांमध्यें उत्पन्न झालेली दिसते यांत कांहीं शंका नाहीं. ही आस्था व कळकळ सामाजिक व विशेषतः धार्मिक विषयांतच उद्भवलेली होती. राजकीय व आर्थिक बाबतींचा विचार या काळांत सुरू झालेला दिसत नाहीं. देशाभिमानमूलक राष्ट्रीयतेची भावना व कोणत्याही प्रश्नाचा सर्व देशाच्या दृष्टीनें विचार करण्याची व्यापक दृष्टि ही सार्वजनिक कार्यकर्त्यांमध्यें रुजण्यास अझून अवकाश होता. सामाजिक व धार्मिक बाबतींतील भावनाही बऱ्याच अंशीं वैयक्तिक व कौटुंबिक स्वरूपाच्या होत्या. धर्मबंधनांमुळें आपणांस पाहिजे तसें वागतां येत नाहीं हें असमाधान त्यांच्या बुडाशीं होतें असें दिसतें. आपला धर्म व त्यांतील चालीरीती इंग्रजी शिकून पुढारलेल्या लोकांस त्याज्य वाटूं लागल्या होत्या व त्यांची हेटाळणी व्हावयास सुरवात झाली होती. हिंदुधर्माच्या उदात्त, शाश्वत व व्यापक स्वरूपाच्या अंतरंगाकडे बाळशास्त्र्यांसारख्या एखाद्या बुद्धिमान गृहस्थाखेरीज इतर कोणाचेंही लक्ष या कालांत गेलेलें दिसत नाहीं. मिशनरींचा हिंदुधर्मावर जोराचा हल्ला व्हावयास या कालांत सुरवात झाली होती. आणि जवळ जवळ तशाच तऱ्हेचा सूर सुधारक मंडळींच्या प्रतिपादनांतूनही वाहत होता. स्वधर्मांतील तत्त्वांविषयीं व रीतीभातींविषयीं सुशिक्षितांच्या मनामध्यें उत्पन्न झालेला तिटकारा 'परमहंससभे' सारख्या चळवळींमध्यें प्रतिबिंबित झालेला दिसून येतो. सांपत्तिक दृष्ट्या मुंबईशहराचा एकसारखा उत्कर्ष होत असल्यामुळें व कोणतेंही सत्कार्याचें, उच्च शीलाचें ध्येय लोकांच्या डोळ्यासमोर नसल्यामुळें चैनबाजी, व्यसनाधीनता या काळांत अतिशय बोकाळली होती. जुन्या धार्मिक कल्पनांस अनु-

सरून असलेलीं परोपकाराचीं, तपस्वितेचीं व साधुतेचीं ध्येयें लुप्त झालीं असून नव्या पाश्चात्य संस्कृतीबरोबर येणारीं स्वार्थत्याग, देश-हिततत्परता इत्यादि ध्येयें अद्याप रुजलेलीं नव्हतीं. या काळांतले पुढारी लोक सुखासीन असून मनोधैर्याचा त्यांच्या ठायीं बराच अभाव होता. त्यांचीं मतें विशेष खोल विचाराअंतीं बनलेलीं नव्हतीं. मुंबई शहराबाहेरच्या महाराष्ट्राच्या परिस्थितीची जशी त्यांस विशेष जाणीव नव्हती त्याचप्रमाणें पाश्चात्य संस्कृतींतील उच्चतम गुणांचीही त्यांस विशेष पारख झालेली नव्हती. परमहंससभेचें गुप्त स्वरूप, तिच्या बुडाशीं निश्चित मतांचा व ध्येयांचा असलेला अभाव, तिची अत्यंत शोचनीय रीतीनें झालेली वाताहत या गोष्टींवरून हाच निष्कर्ष कोणाच्याही मनांत उतरल्याखेरीज राहत नाहीं.

यापुढील वीस वर्षांचा काल ( १८५०–१८७० ) सर्वच दृष्टींनीं अधिक महत्त्वाचा होय. या काळांत सुशिक्षित लोकांची संख्या वाढली, अर्थात् देशस्थितीविषयीं विचार करणाऱ्यांचीही संख्या वाढली आणि तो विचार अधिक व्यापक व खोलवर होऊं लागला. या काळांतील मुख्य कार्यकर्ते म्हटले म्हणजे नानाशंकर शेट, डॉ. भाऊ दाजी, डॉ. आत्माराम पांडुरंग, गोविंद नारायण माडगांवकर, विश्वनाथ नारायण मंडलीक, विष्णुशास्त्री पंडीत इत्यादि होत. दादाभाई नवरोजी हा प्रतिभासूर्य १८५६ पर्यंत मुंबईतील सर्व कार्यकर्त्यांमध्यें प्रेरणा उत्पन्न करीत होता. या कालांतील प्रगतीचीं मुख्य लक्षणें तीन चार सांगतां येतील. पहिलें विशिष्ट लक्षण हें कीं स्वदेशाच्या एकत्वाची व व्यापक अशा देशबंधुत्वाची भावना या कालांत उत्पन्न होऊन ती वाढीस लागली आणि स्वदेशाच्या राजकीय स्थितीविषयीं विचार सुरू झाला. १८५४ सालचा कंपनीची सनद वाढविण्याचा प्रसंग, १८५७ सालचा बंडाचा वणवा, १८५८ सालचा राणीचा जाहिरनामा, १८६१ सालीं झालेली कायदेकौन्सिलांची स्थापना, इत्यादि महत्त्वाच्या

राजकीय घटनांनीं विचारी सुशिक्षितांच्या मनामध्यें राजकीय आकांक्षांचीं बीजें रुजत घातलीं. या बीजांचेच अंकुर पुढील कालविभागामध्यें चांगले जोम धरूं लागलेले आपल्यास दिसून येतात.

सामाजिक व धार्मिक विषयांवरील विचार अधिकाधिक व्यापक व तीव्र होत जाऊन त्या बाबतींतल्या पक्षोपक्षांची घडण सुस्पष्ट व दृढ होत चालली. पूर्वींच्या कालविभागांत सामाजिक व धार्मिक चळवळ बहुधा एकतर्फीच होत असे. सुधारकांनीं व ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं हिंदु धर्मावर, चालीरीतींवर व समाजव्यवस्थेवर केलेल्या हल्ल्यांना परतवून लावण्यास प्रारंभीं प्रारंभीं कोणी प्रतिपक्षीच रणांगणावर उभा नव्हता. पुढें १८४० च्या सुमारास शास्त्री मंडळींतर्फे प्रतिक्रियेस थोडीबहुत सुरवात झाली. परंतु या बाबतींतले खरे जोमाचे व परिणामकारक प्रयत्न प्रस्तुतच्या कालविभागांतच होऊं लागले. हिंदुधर्माची तरफदारी करणाऱ्या या मंडळींमध्यें अग्रगण्य सेनानी विष्णुबुवा ब्रह्मचारी हे होत. त्यांनीं आपलें वादसंगर १८५० ते १८५८ पर्यंत चालू ठेवलें होतें. आपल्या धर्मविषयक सर्व मतांचें सार त्यांनीं आपल्या 'वेदोक्त धर्मप्रकाश' ( १८५९ ) या ग्रंथामध्यें लिहून ठेवलें आहे. याच पक्षाकडील गंगाधरशास्त्री फडके यांचा ' हिंदुधर्मतत्त्व ' हा ग्रंथ व कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची ' विचारलहरी ' हीं उल्लेखनीय होत. जुना पक्ष या प्रमाणें प्रतिकारक्षम व सामर्थ्यवान झाला, तसाच नवा पक्षही याच काळांत संस्थारूपानें संघटित होऊन बलवान बनला. एवंच, निरनिराळे पक्ष सुस्पष्ट व रेखीव बनून त्यांचें दृढीकरण होऊं लागलें व त्यांनी आपआपले मार्ग स्वतंत्र रीतीनें चोखाळण्यास सुरवात केली.

संघटित संस्थांच्या द्वारें कार्य करण्यास सुरवात याच काळामध्यें झाली, हा या कालाचा तिसरा मोठा विशेष होय. इंग्रज लोकांची संस्कृति व कार्यपद्धति आमच्या लोकांमध्यें मुरूं लागल्याचें हें चिह्न

होय. परंतु या बाबतींत प्रारंभीं प्रारंभीं थिल्लरपणा, आरंभशूरत्व, अव्यवस्था इत्यादि प्रकार बरेच झाले हीही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. खुद्द प्रार्थनासमाजाच्या अधिकृत व्यक्तीनें लिहिलेल्या इतिहासावरूनच ही गोष्ट नजरेस येते व त्यावरून चिपळूणकरांनीं या बाबतींत केलेली टीका कशी यथार्थ आहे याचाही प्रत्यय येतो. तथापि यासंबंधानें येथें विशेष विस्तार न करणेंच उचित होईल. धर्मसुधारकांनीं आपली प्रार्थनासमाज ही संघटित संस्था १८६७ सालीं स्थापली. विधवाविवाहवाल्यांनीं विधवाविवाहोत्तेजक मंडळ १८६५ सालीं स्थापिलें. धार्मिक व राजकीय बाबी वगळून इतर सर्व क्षेत्रांत समाजसेवेचें कार्य करण्यासाठीं मुंबईतील एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट मधील विद्यार्थी व शिक्षक यांनीं पुढाकार घेऊन 'स्टूडंट्स लिटररी आणि सायंटिफिक सोसायटी' ही सुप्रसिद्ध संस्था १८४८ सालीं स्थापिली. श्री. फाटक यांनीं ज्या ज्ञानप्रसारक सभेचें इतकें स्तोम माजविलें आहे ती या मोठ्या सोसायटीचीच शाखा होय. मराठी ज्ञानप्रसारक मंडळी व गुजराती ज्ञानप्रसारक मंडळी अशा दोन शाखा १८४८ च्या सुमारासच सुरू करण्यांत आल्या. मुख्यत्वेंकरून एल्फिन्स्टन शाळेंतील विद्यार्थ्यांचीं हीं चर्चामंडळें अथवा निबंधवाचनमंडळें होतीं. त्यांतील सभासदांनीं विशेषतः स्त्रीशिक्षणाचें कार्य जोमानें हातीं घेतलें होतें. अशीं मंडळें आज बहुतेक कॉलेजांतून व शाळांतून काम करीत असलेलीं पाहावयास मिळतात. उत्तम विचारी विद्यार्थ्यांनीं अशा संस्थांमधून वाचलेले व आपआपल्या नियतकालिकांतून प्रसिद्ध केलेले निबंध आजही वाचनीय नसतात असें नाहीं. तसेच कांहीं वाचनीय निबंध या सभेच्या 'ज्ञानप्रसारक' मासिकांतून आले असल्यास त्याबद्दल आश्चर्य मानण्याचें ज्याप्रमाणें प्रयोजन नाहीं त्याचप्रमाणें त्याचें अवास्तव स्तोम माजविण्याचेंही कांहीं कारण नाहीं. असो. संघटित संस्थांप्रमाणेंच मतप्रसाराचीं व चळवळीचीं साधनें जीं वर्तमानपत्रें तींही या काळांत

अधिक निर्माण झालीं व त्यांचा प्रसारही वाढूं लागला. पुण्याचा ज्ञानप्रकाश १८४८ सालीं सुरू झाला. इंदुप्रकाश मुंबईस १८६२ सालीं निघाला. १८६४ मध्यें नेटिव ओपीनियन (इंग्रजी) निघालें. दरम्यानच्या काळांत 'धूमकेतु,' 'शिवाजी' यांसारखीं कांहीं वृत्तपत्रें चालू होतींच.

मुंबईच्या बाहेर, विशेषतः पुण्यनगरीमध्यें जागृति व्हावयास सुरवात झाली, हा या कालाचा सर्वांत मोठा विशेष होय. 'लोकहितवादी' उर्फ गोपाळराव हरि देशमुख हे सुप्रसिद्ध चळवळ्ये गृहस्थ १८४४ ते १८५२ पर्यंत पुण्यास नोकरीवर होते. ज्ञानप्रकाश हें पत्र त्यांच्या प्रेरणेमुळें निघालें, असें म्हणतात. १८५० नंतर कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशरामपंत तात्या गोडबोले इत्यादि मंडळींनीं वाङ्मयविषयक व इतर चळवळी पुण्यास चालू केल्या.

प्रस्तुत कालविभागाचा उत्तरार्ध, म्हणजे १८६० ते १८७० हीं दहा वर्षें, न्या. रानडे, डॉ. भांडारकर, वामन आबाजी मोडक, नारायण महादेव परमानंद, म. मो. कुंटे, रा. वि. माडगांवकर, शं. पां. पंडित, सार्वजनिक काका जोशी इत्यादि सुप्रसिद्ध कार्यकर्त्यांच्या उमेदवारीचा काल या नात्यानें लक्षांत ठेवण्याजोगा होय. भांडारकर हे १८६८ सालीं मुंबईस बदलून आले व त्यानंतर त्यांनीं प्रार्थनासमाजाच्या उपासनादि कार्यामध्यें प्रामुख्यानें भाग घेण्यास सुरवात केली. रानडे हे १८५६ पासून १८७० पर्यंत, मध्यंतरींचीं दोनचार वर्षें खेरीज करून, मुंबईसच होते. व तेथें विद्यार्थी, अध्यापक, इंदुप्रकाशचे संपादक व विधवाविवाहाचे साहाय्यक या नात्यानें त्यांनीं विविध कामगिरी केली. वर उल्लेखिलेली मंडळी सरासरीनें चिपळूणकरांपेक्षां दहा वर्षांनीं वडील होती व त्यांच्या सार्वजनिक कार्यांतील उमेदवारीस सुरवातही निबंधमालेच्या अगोदर दहा वर्षें झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या सर्वांची विद्वत्ता, देशाभिमान व लोकहितार्थ उद्योग करण्याची

प्रवृत्ति याविषयीं वाद करण्यास जागा नाहीं. रानडे, भांडारकर, परमानंद, सार्वजनिक काका यांच्या ठायीं तर अनेक उच्च गुणांचा समन्वय झाला होता व त्या गुणांचा आपल्या राष्ट्रास अनेक रीतींनीं उपयोगही झाला ही गोष्ट सर्वमान्य आहे. असें असूनही या मंडळींच्या प्रेरणेनें चाललेल्या कित्येक कार्यांवर, संस्थांवर आणि त्यांच्या कांहीं उद्गारांवर चिपळूणकरांनीं टीका केली आहे ! या प्रकाराची संगति कशी लावावयाची ? रानडे, भांडारकर व सार्वजनिक काका चुकले कीं चिपळूणकरांनीं विनाकारण टीका केली, किंवा दोघेही बरोबर असून त्यांच्यामधील विरोध कांहीं निराळ्याच गोष्टींचा निदर्शक होता ? या प्रश्नांचा निर्णय आपणास यापुढें करावयाचा आहे.

येथें ही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं चिपळूणकरांनीं टीका केली त्या काळीं रानडे भांडारकर इत्यादिकांच्या कर्तबगारीला नुकता कोठें प्रारंभ झालेला होता. चिपळूणकरांच्या मानानें रानडे-भांडारकरांची विद्यार्थिदशा व उमेदवारीचा काळ अधिक लांबलेला होता. भांडारकरांची खरी सार्वजनिक कारकीर्द १८६८ सालीं मुंबईस आल्यानंतर व रानडे यांची स्वतंत्र कर्तबगारी १८७१ मध्यें पुण्यास आल्यावर सुरू झाली असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाहीं. या दोघांचें परिणतावस्थेंतील सर्व कार्य चिपळूणकरांचा अवतार होऊन गेल्यावर झालें. आपण या व्यक्तींविषयीं जेव्हां विचार करतों तेव्हां त्यांची सर्व आयुष्यांतील कर्तबगारी साहजिक रीतीनें आपल्या मनश्चक्षूंसमोर असते आणि चिपळूणकरांनीं टीका केली ती मात्र त्यांच्या प्रारंभींच्या कृत्यांवर, हें नेहमीं लक्षांत ठेवून तदनुसार तारतम्यानें चिपळूणकरांच्या टीकेची योग्यायोग्यता ठरविली पाहिजे.

आणखी एक मुद्दा चिपळूणकरांच्या कार्याचें स्थल कोणतें होतें याकडे लक्ष दिलें म्हणजे सुचतो, तोही अवश्य विचारांत घेतला

पाहिजे. जन्मापासून मृत्यूपर्यंत चिपळूणकरांचें निवासस्थान पुणें शहर हेंच होतें. बदलीनिमित्त रत्नागिरीस केलेल्या अल्पकालिक प्रवासाखेरीज त्यांनीं आपली जन्मभूमि सोडून केव्हांही बाहेर पर्यटन केलेलें नव्हतें. विशेषतः मुंबईची परिस्थिति व तेथील एकंदर चळवळी यांविषयीं त्यांची माहिती मर्यादित होती असें दिसतें. सहजासहजीं मिळणाऱ्या माहितीवर झाप घालून ती आपल्या स्मरणशक्तीच्या कोठडींत जतन करून ठेवण्याइतकी त्यांच्या बुद्धीची पकड बळकट असली तरी मुद्दाम सायास करून माहिती गोळा करण्याइतका चौकस व चोखंदळ त्यांचा स्वभाव नव्हता. ही एक स्वभावांतील उणीव म्हटली तरी ती त्यांच्या ठायीं होती हें कोणाही सत्यदक्ष मनुष्यास कबूल केलें पाहिजे. अर्थात् चिपळूणकरांनीं जें जें लिहिलें तें सर्व आपल्या आजूबाजूची म्हणजे पुणें शहरांतील व भोंवतालच्या महाराष्ट्रांतील परिस्थिति पाहून लिहिलें. आणि पुणें शहर हें, ज्या काळीं चिपळूणकरांनीं आपल्या लेखनास सुरवात केली त्या काळीं सार्वजनिक कार्याच्या बाबतींत अगदीं नवथर व नवशिकें होतें ही गोष्ट कोणाही निःपक्षपाती मनुष्यास कबूल करावी लागेल. स्थूलमानानें १८५० पर्यंत सार्वजनिक चळवळीचा पुण्यास मागमूसही नव्हता हें आपण मागें पाहिलेंच आहे. १८४८ सालीं ज्ञानप्रकाश पत्राच्या रूपानें पुणें शहरानें आपल्या सार्वजनिक चळवळीची मुहूर्तमेढ रोवली, असें म्हणतां येईल. परंतु खरें पाहिलें असतां १८७० पूर्वीं सार्वजनिक चळवळ पुण्यामध्यें भरास आलेली नव्हती व १८६०–६२ पूर्वीं तिला सुरवातही झालेली नव्हती. १८७० सालीं विधवाविवाहावरील वादाच्या योगानें पुणें शहर गाजलें व त्याच सालीं स्थापन झालेल्या सार्वजनिक सभेमुळें पुण्यास पद्धतशीर रीतीनें लोकहिताच्या कार्यास प्रारंभ झाला. पुण्याचा प्रार्थनासमाजही त्याच सालीं स्थापन झाला. यापूर्वीं १८५३ च्या सुमारास दक्षिणेंतील सरदारांनीं आपलें गाऱ्हाणें कंपनीच्या डायरेक्टरांच्या कानांवर घालण्यासाठीं

काढलेली 'डेक्कन असोसिएशन', मोरशास्त्री साठे यांची 'कल्याणोन्नायक सभा', किंवा धर्मसुधारकांची 'फ्रेंडली मीटिंग', वगैरे सारख्या संस्था पुण्यास स्थापन झाल्या असल्याचा दाखला मिळतो. परंतु सुशिक्षित जनसमाजांत उत्पन्न झालेल्या जागृतीचें मोजमाप घेण्याच्या दृष्टीनें हे प्रयत्न जमेस धरण्याजोगे नाहींत. पांच पंचवीस लोकांस कांहीं थोडा काळपर्यंत एकत्र आणण्याखेरीज दुसरें कांहीं कार्य यांच्या हातून झालेलें दिसत नाहीं.

सारांश १८७० पर्यंत पुणें जवळ जवळ थंडच होतें. खुद्द फाटकांनीं आपल्या लेखांत पुणें शहराची हीच स्थिति वर्णन केली आहे. "(लोकहितवादी गेल्यामुळें) पुनः पुण्यांत चळवळी थंडावल्या," "(पुण्यांत) किरकोळ स्वरूपांत सरकारच्या प्रोत्साहनानें लोकोद्धाराचीं वाङ्मयसेवेसारखीं कामें सुरू होतीं ......पण पुढें १८७० सालापर्यंत पुण्यांत नांव घेण्याजोग्या चळवळी झाल्या नाहींत." इत्यादि त्यांचे उद्गार या बाबतींत पुरेशी कबुली देणारे आहेत. हे उद्गार काढतांना त्यांनीं लोकहितवादींच्या कामगिरीचा अवास्तव बडेजाव केलाच आहे. परंतु त्याचा विचार आपण पुढें करूं. खुद्द फाटकांच्या मतानें देखील पुणें शहर १८७० पूर्वीं सार्वजनिक चळवळीच्या बाबतींत निष्क्रिय होतें येवढी गोष्ट या ठिकाणीं आपण लक्षांत बाळगिली म्हणजे बस्स आहे.

महाराष्ट्राचें काळीज जें पुणें शहर तेंच जर याप्रमाणें थंड होतें तर एकंदर महाराष्ट्राची त्यावेळीं काय अवस्था असेल याची कोणासही सहज कल्पना करतां येण्याजोगी आहे. माधवराव रानड्यांवरील मृत्युलेखांत टिळकांनीं 'त्यावेळीं महाराष्ट्र म्हणजे एक थंड गोळा बनलेला होता' असें जें वर्णन केलें आहे, तें अक्षरशः खरें आहे. हें वर्णन रानड्यांची कामगिरी सुरू होण्याच्या पूर्वींच्या म्हणजे १८७० च्या अगोदरच्या काळास अनुलक्षून आहे. आणि चिपळूणकरांच्या

कामगिरीलाही साधारणतः त्याच सुमारास सुरवात झाली हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. चिपळूणकर १८६८–६९ सालीं लिहूं लागले तर रानड्यांनीं त्याच सुमारास विधवाविवाहाच्या चळवळींत भाग घेऊन आपलें कर्तृत्व प्रकट करण्यास सुरवात केली. अर्थात् रानड्यांच्या पूर्वींचा महाराष्ट्र जर 'थंड गोळा' बनलेला होता तर चिपळूणकरांच्या पूर्वींचाही तसाच होता हें अगदीं उघड आहे. आणि चिपळूणकरांचे जे 'स्तुतिपाठक' फाटकांच्या अधिक्षेपास पात्र झालेले आहेत त्यांनीं यापेक्षां दुसरें काय म्हटलेलें आहे? फाटकांनीं आपल्या रानडे चरित्रांत १८७१ नंतरची रानड्यांची कामगिरी वर्णन करण्यास प्रारंभ करितांना टिळकांचें उपर्युक्त विधान मोठ्या आस्थेनें उद्धृत केलें आहे, कारण त्या योगें रानड्यांच्या कर्तृत्वास उत्कृष्ट रीतीनें उठाव मिळत आहे! केवळ टिळकांचेंच वाक्य उद्धृत करून ते थांबले नसून त्यांनीं स्वतः पुढें एके ठिकाणीं "महाराष्ट्रच नव्हे तर सारें भारतवर्ष त्यावेळीं राजकारणाच्या अज्ञानामध्यें स्वस्थ घोरत पडलें होतें" असें तत्कालीन देशस्थितीचें यथार्थ वर्णन केलें आहे. रानड्यांचें कर्तृत्व वर्णितांना जो महाराष्ट्र घोरत पडलेला फाटकांस दिसतो तोच, त्याच काळचा महाराष्ट्र, विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या कामगिरीचें वर्णन करावयाच्या वेळीं मात्र, राजकीय व इतर सर्व बाबतींतल्या कर्तृत्वानें गजबजलेला त्यांस भासतो, हा मोठाच चमत्कार आहे! पक्षांधता म्हणतात ती हीच!

तेव्हां फाटकांनीं निबंधमालेच्या पूर्वीं महाराष्ट्र सर्व क्षेत्रांतील कर्तृत्वानें गजबललेलें होतें असें दर्शविण्याचा जो विलक्षण अट्टाहास केला आहे तो व्यर्थ असून पुण्यासकट सर्व महाराष्ट्र त्या काळीं "अज्ञानामध्यें घोरत पडलें होतें" हीच खरी वस्तुस्थिति आहे. आणि हीच वस्तुस्थिति निबंधमालेमध्यें वर्णन केलेली आहे. असें वर्णन करण्यांत फाटक म्हणतात त्याप्रमाणें आपल्या कर्तृत्वास उठाव देण्याचा मालाकारांचा हीन हेतु नसून उलट फाटकांनीं महाराष्ट्राची तत्का-

लीन परिस्थिति उज्ज्वल दाखविण्याचा आपल्या इतर ठिकाणच्या उद्गारांशीं विसंगत असा जो प्रयत्न केला आहे तो मात्र चिपळूण-करांचें कर्तृत्व 'येन केन प्रकारेण' तुच्छ ठरविण्याच्या हेतूनें केला आहे कीं काय, असा संशय येतो. चिपळूणकरांना, महाराष्ट्रापासून कांहीं अंशीं तुटून असणाऱ्या मुंबई शहरांतील घडामोडींची अगदीं सूक्ष्म व तपशीलवार माहिती जरी नसली, तरी एकंदर महाराष्ट्राच्या स्थितीचें अचूक निदान त्यांस झालें होतें यांत बिलकूल संशय नाहीं. कारण अखिल महाराष्ट्रांतील परिस्थिति पुणें शहरांत यथार्थ रीतीनें प्रतिबिंबित झालेली होती. तें शहर महाराष्ट्राचें प्रतिनिधि म्हणून शोभण्याजोगें निदान त्या काळीं तरी होतें. मुंबई शहरास ती योग्यता आलेली नव्हती. आणि याचीं कारणेंही उघड होतीं. इ. स १८६२ सालीं पुणें ते मुंबई आगगाडीचा रस्ता चालू होईपर्यंत मुंबईचें देशावरल्या महा-राष्ट्राशीं दळणवळण फारच अल्प होतें. तावत्कालपर्यंत मुंबईस कार्य-कर्ती म्हणून पुढें आलेली सर्व मंडळी एकतर मुंबईची परंपरागत रहिवासी अगर कोंकणांतून मुंबईस नशीब काढण्याकरितां गेलेली अशीच होती. देशावरून मुंबईस गेलेला त्यांत कोणीही नव्हता. यावरून त्यावेळीं मुंबईचें देशाशीं साक्षात् दळणवळण किती अल्प होतें याची कल्पना होते. भौतिक दळणवळणाप्रमाणेंच मानसिक विनिमयही अत्यल्प प्रमाणावरच होत होता. आपल्या अंगचे तेजःकिरण चहूं-बाजूंस विकीर्ण करून सर्व दिशा प्रकाशमय करून टाकण्याचें जें प्रकाशकेन्द्राचें कार्य तें त्या काळीं मुंबई शहराकडून बजाविलें जात नव्हतें. याचें एक कारण वर उल्लेखिलेला दळणवळणाचा अभाव हें तर होतेंच. परंतु मुंबई शहरांतील सुधारणा, तेथील शिक्षणप्रसार व तेथील विचारांची परिणति ही इंग्रजी अंमलाच्या संरक्षणाच्या उबे-खालीं बऱ्याच अंशीं कृत्रिम रीतीनें घडून आली होती हेंही आणखी एक कारण तेथील सुधारणांचा व सार्वजनिक चळवळींचा प्रसार

महाराष्ट्रांत इतरत्र न होण्यास होतें. १८६५–७० पर्यंत मुंबईस चालू झालेल्या चळवळी व संस्था व्यापक देशहिताच्या भावनेनें निघालेल्या नसून मुंबईतील जनसमाजाकरितांच निघालेल्या दिसतात; हा काळपर्यंत मुंबईच्या कार्यकर्त्यांनीं मुंबईबाहेर जाऊन आपल्या कार्याचा प्रसार केल्याचें कोठें दिसून येत नाहीं; व बाहेरच्या महाराष्ट्रांतही मुंबईतील संस्थांच्या व चळवळींच्या धर्तीवर कार्यें सुरू झाल्याचा ह्या काळापूर्वी दाखला मिळत नाहीं. या व अशाच अनेक गोष्टींवरून मुंबईचें बाकीच्या महाराष्ट्राहून अलिप्तत्व सिद्ध होतें. मुंबईची परिस्थिति व बाहेरच्या महाराष्ट्रांतील परिस्थिति यांतील विषमता १८६०–६५ च्या सुमारास नाहींशी होण्यास सुरवात झाली. आगगाडीच्या रस्त्याच्या योगानें दळणवळण वाढलें. युनिवर्सिटीची स्थापना होऊन ठिकठिकाणच्या तरुण विद्यार्थ्यांना विद्याभ्यासाचीं कित्येक वर्षें मुंबईस काढण्याचा प्रसंग येऊं लागला. मुंबईच्या वातावरणांत असलेलीं देशसुधारणेच्या कल्पनांचीं बीजें ह्या विद्यार्थ्यांच्या द्वारा महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं प्रसृत होऊं लागलीं व अशा रीतीनें परस्परांच्या ध्येयांमध्यें व कल्पनांमध्यें एकरूपता येत चालली. परंतु हा वृत्तांत बऱ्याच पुढील काळाचा होय. साधारणतः १८६०–७० पर्यंत मुंबई शहर कांहीं अंशीं स्थानिक व कांहीं अंशीं कोंकणांतील कार्यकर्त्यांच्या पुरवठ्यावर भरारणारें परंतु बाकीच्या महाराष्ट्रापासून अलिप्त असें शहर होतें. काचेच्या घरांत कृत्रिम रीतीनें वाढविलेलें परकीय संस्कृतीचें तें एक कलम होतें. हें कलम कितीही गोंडस रीतीनें वाढलेलें असलें तरी त्यावरून बाकीचें सर्व अफाट क्षेत्रही तृणधान्यादिकांनीं तरारलें होतें असें अनुमान काढणें चुकीचें होईल. परंतु फाटकांनीं अशा तऱ्हेचा विवेक केला नसून हें अनुमान जणूं काय स्वतःसिद्ध सत्यच आहे अशा भावनेनें गृहीत धरलें आहे. मुंबई शहरांतील चळवळींची, तेथील लोकांच्या प्रगत कल्पनांची त्यांनीं जी माहिती दिली

आहे ती बऱ्याच अंशीं यथार्थ आहे; परंतु ती मुंबई शहरापुरतीच यथार्थ आहे, ही मुद्द्याची गोष्ट या बाबतींत लक्षांत ठेवली पाहिजे. ही गोष्ट लक्षांत न ठेवल्याकारणानें फाटकांचें सर्व विवेचन फसवें व अनर्थकारक झालें आहे. त्यांनीं केलेलें मुंबईतील चळवळींच्या, विचारांच्या व ध्येयांच्या प्रगतीचें वर्णन महाराष्ट्रांतील परिस्थितीचें निदर्शक नसून महाराष्ट्र अद्याप निद्रिस्त व पाश्चात्य संस्कृतीच्या द्वारानें येणाऱ्या हितकारक कल्पनांशीं अपरिचित होता, हीच गोष्ट खरी आहे. त्याचा जो थोडा परिचय झाला होता तो मिशनरींच्या बडबडीशीं व त्यांच्या अनुकरणानें वाहावलेल्या अशा अविचारी सुधारकांच्या प्रलापांशींच. मुंबईस पाश्चात्य सुधारणा पुष्कळ काळ मुरलेली असल्यानें तेथील समाजाच्या नेत्यांच्या विचारांना बरेंच समतोलपणाचें व स्वाभिमानाचें स्वरूप प्राप्त झालें होतें, तसेंही इतर ठिकाणीं झालें नसल्यामुळें सर्वत्र अर्धबाडग्या लोकांच्या प्रलापांना उत्तरें देण्याची जरूरी अद्यापिही तीव्रतेनें भासत होती. अशा रीतीनें सर्वत्र अज्ञानजन्य घोर निद्रा व सुशिक्षित म्हणविणाऱ्या थोड्याशा लोकांच्या मनावर दुराग्रहजन्य तामसी मतांचा अंमल याप्रमाणें मुंबई वगळून बाकीच्या महाराष्ट्रभर १८६५–७० च्या सुमारास स्थिति होती. फाटकांनीं मुंबईतील परिस्थितीचें जें वर्णन केलें आहे, त्या योगानें मालेंतील प्रतिपादनास मुळींसुद्धां ढळ कसा पोचत नाहीं तें वरील उपपादनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. थंडपणा, स्तिमितता, अज्ञानजन्य दुराग्रह यांचा प्रसार ज्या अर्थीं सर्वत्र झालेला होता त्या अर्थीं स्वभाषेच्या द्वारें यथार्थ ज्ञानाचा प्रसार सर्वत्र करणें हा जो उपाय चिपळूणकरांनीं आपल्या मालेंत वारंवार—विशेषतः 'आमच्या देशाची स्थिति' या अखेरच्या लेखांत—सांगितलेला आढळतो तोच, सर्व देशाची स्थिति लक्षांत घेतां, बरोबर होता; आणि नूतनधर्मस्थापना, पार्लमेंटामधील प्रतिनिधित्वासाठीं अर्ज, इत्यादि

नानापंथांचें अनुसरण जें देशहिताचीं व लोककल्याणाचीं बिरुदें बांधणाऱ्या महान पंडितांकडून चाललें होतें तें अल्पफलद होतें हें कोणाही सरळ मनुष्याच्या मनास पटेल. निश्चित असें राजकीय ध्येय राष्ट्रीय सभेसारख्या संस्थेला देखील १९०६ सालापर्यंत अवलंबितां आलें नाहीं, तेथें अशा ध्येयांची कल्पना व वाच्यता १८७० च्या सुमारास करणें केवळ अप्राप्तकालच नव्हे तर अप्रयोजक होतें हें कोणासही सहज दिसून येईल. आणि चुकून कोठें तरी एखाद्या लेखांत स्वदेशीचा, होमरूलचा, किंबहुना बंडाचाही, उल्लेख कोणी केलेला असला तरी स्फुट ध्येयें या नात्यानें सुशिक्षितांच्याही मनांत या गोष्टी त्या काळीं वावरूं लागलेल्या नव्हत्या हें निश्चित आहे. अशा स्थितींत कोणाचें निदान अचूक होतें व कोणाचा मार्ग मृगजळामागें धावणारा होता हें कालानेंच आज दाखवून दिलें आहे. गेलीं पन्नास वर्षें देशहितार्थ झटणाऱ्या सर्व प्रमुख व्यक्तींनीं हातीं कंकण बांधून विविध मार्गांनीं ज्ञानप्रसार करण्याची शिकस्त केली असतांना देखील आजच्या घटकेस झाला हा ज्ञानप्रसार अत्यंत अपुरा झाला असेंच आपणास वाटत आहे, यावरून ज्ञानप्रसाराच्या कार्याची महती, आपल्या देशाच्या सद्यःस्थितींत, केवढी मोठी आहे हें व्यक्त होत आहे. इतर मार्ग वायफळ किंवा अपायकारक होते असें म्हणण्याचा भावार्थ नाहीं. परंतु त्यांपैकीं कांहीं अप्राप्तकाल होते, कांहींची दिशा चुकलेली होती, तर कांहीं अत्यल्प फायद्याकरितां कार्यशक्तीचा अतिरिक्त व्यय करणारे होते. प्रार्थनासमाजासारखे नवीन पंथ स्थापण्याचा उपाय तर अनावश्यक व अपायकारक होता असेंच आजवरचा पन्नास वर्षांचा इतिहास कंठरवानें सांगत आहे. देशसुधारणेसाठीं काय करूं काय न करूं, अशी बावरलेली मनःस्थिति मोठमोठ्या विचारवंतांची देखील ज्या काळीं झालेली आपणास दिसून येते त्या काळीं देशस्थितीचें बरोबर निदान करून सर्वस्वीं समर्पक व

हितकारक अशा उपायाचा जोमानें व आग्रहानें पुरस्कार करण्याचें चातुर्य विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनींच दाखविलें. त्यांनीं सुचविलेला उपाय मोठा अलौकिक, इतर कोणास न सुचण्याजोगा होता असें नाहीं. ज्ञानप्रसाराचा हा उपाय इतर अनेकांना दिसत होता व त्याचें लेखांतून व भाषणांतून प्रसंगवशात् प्रतिपादनही चाललें होतें. परंतु इतर नानातऱ्हेचे देशसुधारणुकेचे मार्ग मोठमोठ्या विद्वान व पुढारी म्हणून गाजलेल्या लोकांनीं सुरू केले असतां त्यांचा निषेध करण्यास निधड्या छातीनें पुढें होऊन लोकशिक्षणाचा व यथार्थ ज्ञान-प्रसाराचा उपाय आग्रहानें उपदेशिला व स्वतः अत्यंत यशस्वी रीतीनें अमलांत आणून दाखविला असा चिपळूणकरांनींच !

या वेळच्या कार्यकर्त्या मंडळीनें सुरू केलेले इतर सर्व उपाय चिप-ळूणकरांस एकतर व्यर्थ किंवा थिल्लरपणाचे किंवा त्या कालास अयोग्य वाटत होते आणि आपणास जें वाटतें तें ठासून जोरदारपणें सांगण्यास त्यांनीं कधींच कसूर केली नाहीं. यांतील कित्येक उपायांची उभारणी करण्यांत रानडे यांचें अप्रत्यक्ष अंग असल्यामुळें त्या उपायांचा निषेध अगर उपहास केल्याबद्दल फाटकांचा चिपळूणकरांवर बडा घुस्सा झाला आहे. स्थूल मानानें १८६५–७० पर्यंत मुंबई खेरीज करून इतर सर्व महाराष्ट्र निष्क्रिय, थंड व स्तिमित असा एक गोळा होऊन पडला होता असें मागें दाखवून दिलेंच आहे. त्यानंतर ही स्थिति पुणें शहरापुरती बऱ्याच झपाट्यानें बदलण्यास सुरवात झाली. निबंधमाला सुरूहोईपर्यंतच्या मधल्या चार पांच, किंबहुना आठ दहा, वर्षांत पुणें शहरांत सार्वजनिक कार्यांची व संस्थांची बरीच गडबड उडाली होती. पुणें शहरानें या बाब-तींत बराचसा नमुना मुंबईचा उचलला होता, तथापि सर्व कार्यांमध्यें त्याच्या स्वतःच्या कर्तृत्वाची छाप थोडी बहुत उमटलेली होतीच. पुणें शहराचें अनुकरण तावडतोब महाराष्ट्रांत इतर अनेक ठिकाणीं व्हाव-यास सुरवात झाली. एकंदर देशाच्या निष्क्रिय अवस्थेस अपवादरूप

अशी ही एक मोठीच लाट उद्भवली होती. सर्व देशाच्या निद्रिस्त, अज्ञानमग्न व दुर्मतग्रस्त स्थितीची जाणीव निबंधमालेंतील लेखांच्या अंतर्यामीं प्रेरक रूपानें सर्वदा अवस्थित असल्याचें आपणास प्रतीत होतें. त्याबरोबरच आपल्या अफाट देशाच्या निःस्तब्ध अशा जलाशयावर लोककल्याणाच्या उद्योगांची ही जी एक लाट त्या सुमारास उठली होती तिनें उडवून दिलेल्या खळबळीचेंही विनोदप्रचुर व उपहासमिश्रित वर्णन निबंधमालेंत अनेक ठिकाणीं केलेलें आढळतें. निबंधमालेचा एकविसावा अंक वाचून पाहिल्यास या सर्व गडबडीची पूर्ण जाणीव मालाकारांस होती असें स्पष्ट दिसून येईल. या सर्व हुल्लडीचें श्री. फाटक हे अनेकशः अत्यंत गौरवपूर्ण भाषेंत वर्णन करितात ( व तिचें श्रेय माधवराव रानडे या एकाच व्यक्तीला देऊं पाहतात ! ) तर चिपळूणकर तिचा उपहास करून तिला बहुतांशीं वायफळ ठरवितात इतकाच काय तो दोघांमध्यें फरक आहे ! या दोन पक्षांपैकीं कोणता बरोबर आहे याचें परीक्षण प्रस्तुत लेखमालेंत पुढें अनेक ठिकाणीं प्रसंगवशात् करण्यांत येणारच आहे. कालाचा अभिप्राय तत्कालीन उद्योगांविषयीं काय पडतो हें पाहूं गेल्यास तो मालाकारांस अनुकूल असाच दिसून येतो येवढें येथें नमूद करून ठेवणें बस्स होईल. उपर्युक्त एकविसावा अंक हा 'मालें'तील उत्कृष्ट अंकांपैकीं एक असून त्यांतील मजकूर समतोलपणानें, कळकळीनें व पूर्ण विचाराअंतीं लिहिलेला दिसतो. त्यांत चिपळूणकरांनीं निवळ उपहासावरच काम भागविलेलें नसून नवीन आरंभिलेल्या लोककल्याणाच्या कृत्यांवर आपण आक्षेप कां घेतों हें खुलासेवार सांगून तें प्रमाणासह पटवून देण्याचा प्रांजल यत्न केला आहे. तत्कालीन कार्यकर्ते व त्यांनीं आरंभिलेलीं कृत्यें यांच्या मधील अनेक दोष चिपळूणकरांनीं येथें दाखविले आहेत. एकाच कोणत्या तरी सर्वसंमत व सर्वंकष अशा

ध्येयाचा पुरस्कार न होतां अनेक पंथांची बजबजपुरी माजल्या-मुळें लोकांच्या मनाची इसापनीतींतील शंभर युक्तीवाल्या कोल्ह्या-प्रमाणें अवस्था होऊन गेली आहे, असा त्यांचा पहिला आक्षेप आहे. दुसरा आक्षेप " त्यांस ( तत्कालीन कार्यकर्त्यांस ) मोठेपणाचा आव घालण्याची मोठी हौस वाटते; कशास कांहीं ठिकाण नसतांही आपल्या अंगची योग्यता जी त्यांस कांहीं वाटत असते ती अतोनात ! " हा होय. आपली कुवत न जाणतां किंवा शक्याशक्यतेचा विचार न करितां भलत्याच कार्यास हात घालणें, हा तिसरा आक्षेप होय; तो मालाकारांनीं स्वतः पुढील शब्दांत नमूद केला आहे:—" तर याप्रमाणें मोठालीं कामें आमच्या दुर्बळपणानें आम्हांस झेपत नाहींत, आणि जीं वरच्याहून लहान पण होण्यासारखीं आहेत. तीं आमच्या अहंपणामुळें आम्हांस तुच्छ वाटून आम्ही तिरस्कारानें लोटून देतों. " याशिवाय अव्यवस्थितपणा, आपसांतील दुफळी, इत्यादि दोषांचा त्यांनीं जातां जातां उल्लेख केला आहे तोहीं लक्षांत घेण्याजोगा आहे.

आतां चिपळूणकरांनीं ही जी टीका केली आहे तिजवर स्वतःच्या मतानें अभिप्राय देण्याच्या भानगडींत न पडतां रानडे पक्षाचे पाठी-राखे व चिपळूणकरांचे विख्यात विरोधक जे बाळकृष्ण नारायण देव त्यांनीं चिपळूणकरांवर लिहिलेल्या पहिल्या लेखांतीलच कांहीं उद्गार निवडून काढून येथें दाखल करितों. म्हणजे, कुरकुरत कां होईना, परंतु मालाकारांनीं तत्कालीन कार्यकर्त्यांवर केलेले सर्व दोषारोप मान्य करणें त्यांस कसें भाग पडलें आहे हें दिसून येईल. नवीन धर्मसंस्थांच्या संबंधानें देव म्हणतात:—" त्या निर्जीव आहेत, त्यांच्या प्रवर्तकांत व अनुयायांत एकनिष्ठा, कार्यैकपरता, स्वार्थविमुखता हीं फार कमी म्हणून त्यांचा प्रसार होत नाहीं, हें खरें......महाराष्ट्रांत त्याचा ( नवीन धर्मपंथाचा ) व्हावा तसा प्रसार झाला नाहीं याचें कारण

प्रसारकर्त्यांची असमर्थता होय." पुढें सामाजिक, धार्मिक व राजकीय संबंधाच्या ज्या संस्था त्यावेळीं चालल्या होत्या त्यांवरील मालाकारांच्या टीकेचा विचार करतांना " कदाचित् या संस्थांत वर्णन करण्यासारखे गुण प्रकट झाले नसतील. आतां यापैकीं कांहीं दोष जरी अतिशयोक्तीनें कदाचित् भरले असले तरी ते निर्मूल किंवा केवळ अयथार्थ होते, असें सिद्ध करतां येत नाहीं. त्यामुळें ( मालाकारांचा ) हा कोटिक्रम अभेद्य व अढळ झाला आहे, हें कबूल केलें पाहिजे." पुढें मालाकारांच्या टीकालेखांसंबंधीं आणखी लिहितांना, "पुनर्विवाहाच्या पक्षाच्या प्रवर्तकांची जी मालाकारांनीं फटफजीती उडवून दिली आहे, ती पुढाऱ्यांच्या त्या वेळच्या धरसोडीच्या वर्तनास, भित्रेपणास, व्यवस्थेस गैरवाजवी होती असें म्हणतां येत नाहीं." पुढें आणखी:— "वरच्या सारखाच प्रकार बहुतेक सार्वजनिक संस्थांवर टीका करतांना झाला आहे. त्यांच्या प्रवर्तकांच्या दोषांस ती अयोग्य नाहीं." "**मालाकारांनीं सामाजिक सुधारकांवर जें शस्त्र धरलें होतें तें त्यांच्या दुर्बल व धरसोडीच्या वर्तनावर होतें आणि तें बरेंच यथान्याय होतें**, यांत संशय नाहीं." या उद्गारांवर निराळें भाष्य करण्याची जरूरी नाहीं. तत्कालीन स्थितीचे पूर्ण माहितगार, 'टीकाविषयाचा पूर्ण अभ्यास करून लिहिणारे विधायक टीकाकार' म्हणून विविधज्ञानविस्ताराकडून प्रशस्तिपत्र मिळविणारे व सुधारणा पक्षाचे पाठीराखे, अशा गृहस्थांच्या लेखणींतून निघालेले हे उद्गार आहेत. त्यांवरून फाटकांचें विवेचन किती एकदेशीय व वाचकांची फसवणूक करणारें आहे याचा वाचकांस प्रत्यय आल्याखेरीज राहणार नाहीं.

आजवर धुगधुगी धरून प्राण कंठीत असलेल्या प्रार्थनासमाजाकडे बोट दाखवून त्याच्या प्रवर्तकांवर स्तुतिस्तोत्रें उधळण्याची श्री. फाटक यांना कांहीं सोय तरी आहे. परंतु निबंधमालेमध्यें प्रविष्ट झाल्यामुळेंच ज्यांच्या नांवांना चिरस्थायित्व प्राप्त झालें आहे अशा

'कौशल्य शिक्षक मंडळी,' 'बलवर्धक सभा' इत्यादि संस्था कोठें आहेत? वक्त्यांच्या वर्गांनीं व मालेच्या दोन तीन अंकांतून गाजलेल्या त्या वक्तृत्वोत्तेजक सभेनें आजवर कितीसे वक्ते निर्माण केले आहेत? सार्वजनिक सभेनें पार्लमेंटांतील प्रतिनिधित्व मिळविण्यासाठीं पाठविलेला व चिपळूणकरांच्या चेष्टेस विषय झालेला तो अर्ज म्हणजे शेखमहंमदी राजकारणाचाच एक नमुना होता असें त्यानंतर लोटलेला काळ कंठरवानें आपणास सांगत नाहीं काय? श्री. फाटक यांनीं आपल्या लेखमालेंत व रानडे चरित्रांत लोकमत शिक्षित करण्याच्या दृष्टीनें त्या अर्जाची उपयुक्तता अट्टाहासानें प्रतिपादून त्याचें कितीही स्तोम माजविण्याचा प्रयत्न केलेला असला तरी तो अर्ज म्हणजे चुकीच्या दिशेनें केलेल्या राजकारणाचा एक निष्फळ खटाटोप होता हें कोणासही सांगण्याची आवश्यकता नाहीं. लोकांना राजकीय शिक्षण देण्याच्या दृष्टीनें श्री. फाटक त्याची उपयुक्तता वर्णितात. परंतु लोकांना राजकीय शिक्षण देण्याचे व ध्येयाची ओळख पटविण्याचे यापेक्षां शेंकडो पटीनें उपयुक्त व परिणामकारक असे दुसरे अनेक मार्ग होते. असो. तेव्हां काळाची सांगी चिपळूणकरांच्या टीकेचें यथार्थत्वच सिद्ध करिते आणि फाटकांच्या टीकेचें विकृतत्व आणि एकदेशीयत्व आपल्या नजरेस आणिते.

आतांपर्यंतच्या विवेचनाचा निष्कर्ष वाचकांच्या लक्षांत सहज येईल, असें वाटतें. इंग्रजी शिक्षणामुळें व पाश्चात्य संस्कृतीच्या संनिकर्षामुळें होत असलेली जागृति १८५० किंबहुना १८६० पर्यंत फक्त मुंबई शहरांतच दिसून येत होती. १८६० नंतर पुणें शहरांत हळूहळू नवीन कल्पनांचा प्रादुर्भाव होऊं लागला. परंतु एकंदर सर्व महाराष्ट्रभर अज्ञानाचा, निःस्तब्ध शांततेचा व आत्मघातकी दुर्मतांचाच अंमल अद्यापि जारी होता. १८७० च्या सुमारास पुणें शहरांत सार्वजनिक चळवळ बरीच भरास आली व तिचा महाराष्ट्रांतील इतर लहान

मोठ्या शहरींही प्रादुर्भाव होऊं लागला. परंतु या एकदम भरास आलेल्या चळवळींमध्यें थिल्लरपणाचा, आरंभशूरत्वाचा, अविचार-विजृम्भिताचा अंश बराच होता, हें खुद्द सुधारणापक्षीय लेखकांच्या अभिप्रायांवरूनच सिद्ध होतें. निबंधमालेच्या प्रारंभकालीं एकंदर देशाची स्थिति याप्रमाणें होती. या देशस्थितीचें यथातथ्य ज्ञान (मुंबईतील १८५० पर्यंतच्या चळवळी खेरीज करून) चिपळूणकरांना होतें व तें निबंधमालेमध्यें योग्य ठिकाणीं योग्य रीतीनें प्रकट झालें आहे. तत्कालीन देशसुधारकांच्या चळवळींमध्यें त्यांना फारसें चांगलें दिसत नसून त्यांचा त्यांनीं अनेक ठिकाणीं सकारण उपहास केला आहे. त्याबरोबरच देशाच्या दुःस्थितीवर यथार्थ ज्ञानप्रसाराचा एकमेव तोडगा त्यांनीं सांगितला असून त्याचा प्रयोगही आपल्या आयुष्यांत अत्यंत यशस्वी रीतीनें त्यांनीं करून दाखविला.

## चिपळूणकरांनीं काय केलें?

हरएक उपायांनीं स्वभाषेला ऊर्जितावस्थेस आणून तिच्या द्वारें आपल्या देशबांधवांना स्वतःच्या स्थितीचें यथार्थ ज्ञान करून द्यावयाचें, ही कार्याची दिशा चिपळूणकरांनीं निबंधमालेच्या द्वारें उपदेशिली हें वर सांगितलेंच आहे. परंतु केवळ येवढ्यापुरतेंच पाहिलें तर त्यांच्या उपदेशांत नावीन्य किंवा अपूर्वत्व कांहीं नव्हतें. स्वभाषेच्या उद्धाराचें ध्येय तर छत्रे–हरि केशवजी यांच्या पासून तों तहत कीर्तने, महाजनि इत्यादि चिपळूणकरांच्या सहाध्यायांपर्यंत सर्वांच्या अंतःकरणांत कमी अधिक मानानें वावरत होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञानप्रसाराचा उद्देशही बाळशास्त्री जांभेकर व मुंबईतील ‘स्टूडंट्स लिटररी आणि सायंटिफिक सोसायटी’ या संस्थेंतील कार्यकर्ती मंडळी यांच्या आचरणांत स्फुट रूपानें दिसून आलेला होता. तेव्हां या दुहेरी उद्देशांत अपूर्वता मुळींच नव्हती. चिपळूणकरांचें

अपूर्वत्व जें आहे तें उपर्युक्त उद्देश डोळयापुढें ठेवण्यांत नसून ते उद्देश अभूतपूर्व चिकाटीनें, उज्ज्वलतेनें व यशस्वितेनें सिद्धीस नेण्यांत आहे. ह्या उद्देशांना त्यांनीं आपलें जीवन वाहिलें; तसें तावत्कालपर्यंत कोणीही वाहिलें नव्हतें. या उद्देशांच्या सिद्धीसाठीं आठ वर्षें एकसारखे अविश्रांत परिश्रम करून त्यांनीं लोकवशीकरणाच्या कामीं मोहिनीच जणूं काय अशी अप्रतिम मनोहर व ज्ञानवाहक निबंधरचना केली; तशी त्या वेळेपर्यंत कोणीही केली नव्हती. ज्ञानप्रसाराच्या उद्देशाच्या पूर्तीसाठीं स्वतःच्या अंगच्या सामर्थ्यावर बाणेदारपणानें नवीन शाळा काढून तिला अल्पावधींतच 'न भूतो न भविष्यति' असें यश मिळवून दिलें; तसें त्या वेळेपर्यंत कोणीही मिळविलें नव्हतें. आणि आपल्या ध्येयसाधनासाठीं निर्मिलेल्या कार्यमालिकेचा मेरुमणिच जणूं काय अशा 'केसरी'ची स्थापना आपल्या आयुष्याच्या अखेरीस करून स्वदेशोद्धारार्थ लेखणी हातांत वागत असतांनाच ते कालवश झाले. उपर्युक्त गोष्टींपैकीं एकएकटीच जरी दीर्घायुष्य लाभलेल्या एखाद्या गृहस्थानें केली असती तरी त्याचें तें करणें धन्यवादांस पात्र झालें असतें. मग या सर्व गोष्टी, आणि त्याही अद्वितीय यशस्वितेनें, केवळ बत्तीस वर्षांच्या अल्पायुष्यांत करून दाखविणाऱ्याची प्रतिभा, त्याची योजकता व कार्यकुशलता, त्याची देशहितबुद्धि, यांचें योग्य वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतात असें कित्येकांस वाटल्यास त्यांत नवल करण्याजोगें काय आहे?

स्वभाषेच्या उन्नत्यर्थ मासिक पुस्तक काढणें, स्वतंत्र शिक्षणप्रसाराच्या उद्देशानें शाळा काढणें किंवा मतप्रसाराच्या हेतूस्तव वर्तमानपत्र काढणें—या गोष्टी चिपळूणकरांच्या काळींही मोठ्या अपूर्व वाटण्यासारख्या नसतील. या सर्व गोष्टी त्यांच्या पूर्वीं इतर कार्यकर्त्यांनीं करून दाखविल्या होत्या, हें म्हणणें बऱ्याच अंशानें खरें आहे. अर्थात् नुसत्या या गोष्टी करण्यामध्यें चिपळूणकरांचें विशिष्टत्व नाहीं. तर ज्या धडाडीनें, उज्ज्वलतेनें व यशस्वितेनें त्यांनीं या गोष्टी करून

दाखविल्या त्यांतच त्यांच्या थोरवीचें रहस्य भरलेलें आहे. अनेकांस पुरतील इतक्या गोष्टी त्यांनीं एकट्यानें करून दाखविल्या. त्यांनीं केलेली कामगिरी सर्व महाराष्ट्रभर गाजली, त्यांनीं उभारलेलें प्रत्येक कार्य परिणामकारक झालें, जिकडे तिकडे दणाणलें व पूर्ण भरास आलें. अर्थात् त्यांनीं सुरू केलेल्या कार्यप्रणालीनें आजवर अपरिमित लोककल्याण साधलें आहे हें निराळें सांगावयास नको. खुद्द निबंधमालेचीच गोष्ट घेतली तरी तिची अपूर्वता व परिणामकारकता ती निघाल्यापासूनच लोकांस भासूं लागली होती. फाटक भासवितात त्याप्रमाणें निबंधमाला हा इतर मासिकांसारखाच परंतु 'थोडासा निराळा भासणारा उपप्रवाह' नसून सर्वांस अपूर्व वाटणारा

श्रवणें, स्मरणें, पानें शुचि करिती विश्वचित्तवागंगा।

अशा योग्यतेचा महाप्रवाह होता. केवळ मागून येणाऱ्या लोकांनींच निबंधमालेचें हें स्तोम माजविलेलें नसून तिची तत्कालीन लोकप्रियता व महती वर केलेला गौरव सार्थ ठरविण्याइतकी मोठी होती हें मागें अनेक प्रमाणें देऊन दाखविलेंच आहे. परंतु खुद्द त्या वेळच्याच एका मासिक पुस्तककर्त्यास 'माले'विषयीं काय वाटत होतें तें त्यानें नमूद करून ठेवलें असून तें 'माले'च्या अपूर्वतेविषयीं आजही साक्ष देण्यास तयार आहे. 'दंभहारक' मासिकाचा उल्लेख फाटकांनीं अनेकवार केला असून निबंधमालेचींच मतें व विचारसरणी प्रतिपादणारें हें मासिक 'माले' च्या अगोदर जन्मलें असल्यानें मालेंतील प्रतिपादनामध्यें कांहीं नावीन्य नव्हतें असें दाखविण्याकडे त्याचा उपयोग केला आहे. परंतु खुद्द तेंच 'दंभहारक,' मालेशीं त्याचा विरोधसंबंध आलेला असतां सुद्धां, मालेविषयीं काय उद्गार काढतें तें पहा.—" मालेस आम्ही सर्व मासिक पुस्तकांत पहिली जागा देतों. अलीकडच्या किताबी विद्वानांत व मतलबी आणि खुशामती मन्वंतरांत, मालेसारखें खरें स्वदेशाभिमानी, स्पष्टवादी आणि निस्पृह पुस्तक निघेल असें कोणाच्या स्वप्नीं

देखील नव्हतें........लोक सुधारण्याच्या प्रामाणिक व खऱ्या उद्देशानें जें काम आम्ही हातीं धरलें आहे त्यासही साह्य न मिळतां सर्वत्र दूषणांचा भडिमार चालत असे. तरीही आम्ही अवसान न सोडतां तसेंच चालल्यानें लवकरच परमेश्वरानें आमची पाठ राखण्यास आम्हां-हून विशेष गुणी मालेस निर्माण केलें आणि आज कित्येक गोष्टींत तिचें खरें धैर्य, सत्यप्रीति आणि निस्पृहता हीं उघड झालीं हें पाहून आम्हांस आनंद झाला. आतां विस्तार करण्यांत हसल नाहीं. एकंदरीनें पुस्तककाराचा खरा उद्देश व त्याचें स्वजनांसी जें योग्य कर्तव्य तें मालाकारच काय तें एकटे चालवितात असें म्हटल्यास चिंता नाहीं. ” ( दंभहारक, पु. ५ अंक ४, आक्टोबर १८७६. ) पत्रकर्त्यांच्या अंगीं नेहमीं दिसून येणारा स्वतःविषयींचा अभिमान आणि समकालीन व्यवसायबंधूंविषयींचा स्पर्धाभाव लक्षांत बाळगिला असतां वर उद्धृत केलेल्या ‘ दंभहारक ’ कृत निबंधमालाप्रशस्तीचें महत्त्व किती मोठें आहे हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं.

चिपळूणकरांच्या कार्याचें अपूर्वत्व याप्रमाणें सर्वांनींच मान्य केलें आहे. हें अपूर्वत्व कोणत्या गुणविशेषांमुळें त्यास प्राप्त झालें याचें विवेचन येथें करणें अस्थानीं होणार नाहीं. पूर्वीच्या कार्यकर्त्यांनीं हाताळलेल्या कल्पना घेऊनच चिपळूणकरांनीं आपल्या कार्याची इमारत उभविली असूनही ती लोकोत्तर यशःशालिनी व तजेलदार झाली हा कांहीं नुसता दैवयोग नव्हे; तसे विशेष गुण त्यांच्या कार्यपद्धतींत अनुस्यूत झालेले होते म्हणूनच त्यांचें कार्य इतकें प्रभावी झालें, हें निरीक्षणाअंतीं आप-णास सहज दिसून येतें. पूर्वीच्या कार्यकर्त्यांमध्यें ज्या अत्यवश्य गुणांची उणीव होती असे अनेक गुण देशकार्याच्या प्रवाहामध्यें त्यांनीं आणून सोडले. त्यांनीं व्यक्त स्वरूपाचें जें कार्य केलें तें तर महनीय आहेच परंतु अमूर्त गुणांचें उद्भावन करून त्यांनीं कार्यकर्त्यांच्या व जनतेच्या मनोरचनेमध्यें जी प्रगति घडवून आणली तिचें महत्त्व विशेष

आहे. इतरांनीं न केलेलें किंवा इतरांना न साधलेलें असें चिपळूण-करांनीं जें काय केलें तें हेंच होय. आणि त्याकरितांच देशोद्धारकांच्या मालिकेमध्यें अत्युच्च स्थान त्यांना कायमचें प्राप्त झालेलें आहे.

त्यांच्या कार्यपद्धतींतील पहिला गुण लोकवशीकरणाचा होय. याचें उपपादन मागें केलेंच आहे. लोकवशीकरणाची बुद्धि त्यांच्या प्रत्येक कृत्यांत दिसून येते. ती पूर्वींच्या कार्यकर्त्यांच्या प्रयत्नांत दिसून येत नव्हती. खुद्द निबंधमालेचेंच उदाहरण घ्या. मालेच्या पूर्वी ज्ञान-प्रसारक, विविधज्ञानविस्तार इत्यादि मासिकें निघालीं होतीं. तेव्हां मासिक या नात्यानें ‘ माला ’ मुळींच अपूर्व नव्हती. मालेची अपूर्वता तिचें अंत:स्वरूप इतर पूर्वकालीन मासिकांच्या अंत:स्वरूपाशीं तुळिल्यास तेव्हांच ध्यानांत येते. इतर मासिकांची रुक्ष भाषा, बोजड विवेचनशैली, इंग्रजी विद्यांचा आशय वाचकांच्या मनांत कसाबसा कोंबण्याची बुद्धि, भाषांतरांचे कंठाळी लेख, यांचा अनुभव घेऊन सुंदर भाषा, विशद प्रतिपादनशैली, समर्पक उतारे, रसपूर्ण कविवचनें, विनोदपूर्ण आख्यायिका इत्यादिकांनीं नटलेल्या निबंधमालेच्या अंतरंगांत प्रवेश केला म्हणजे आजचा वाचकही हरखून जातो, तर मग त्या वेळच्या वाचकांचीं तृषित मनें आह्लादानें उचंबळून जात असतील यांत आश्चर्य काय? मालेच्या अंतरंगाची ही सर्व सजावट लोकवशीकरणासाठीं व लोकानु-रंजनासाठींच केलेली होती.

ही सजावट करितांना चिपळूणकरांची लोकोत्तर अभिजात रसिकता साहजिकच त्यांच्या मदतीस आली. रसिकता व सौंदर्यदृष्टि हा चिपळूणकरांच्या कार्यपद्धतीला अपूर्वता प्राप्त करून देणारा दुसरा विशिष्ट गुण होय. त्यांच्यासारखा रसिक, सौंदर्यपिपासु व कलांचा शोकी असा गृहस्थ सार्वजनिक कार्यकर्त्यांमध्यें तावत्काल-पर्यंत कोणीही झाला नव्हता. खुद्द त्यांचे वडील कृष्णशास्त्री

व इतर कित्येक जुन्या पिढींतील लोक रसिक होते. परंतु त्यांपैकीं पुष्कळांची रसिकता आचारशैथिल्यानें दूषित होती. बाहेरख्याली व इतर अनेक ढंग करणें हें जुन्या वळणाच्या रसिकतेचें एक कलमच बनून गेलें होतें. आचरणांत खंबीर असून सुद्धां मनुष्य रसिक व कलाप्रेमी असूं शकतो हें विष्णुशास्त्री यांनीं आपल्या उदाहरणानें दाखविलें. आणि सर्वांत विशेष गोष्ट ही कीं त्यांनीं आपल्या रसिकतेला स्वभाषा-सेवेच्या व देशसेवेच्या कामीं राबविलें. आपल्या रसिकतेचें सारसर्वस्व त्यांनीं निबंधमालेंत कसें ओतलें आहे याचें दिग्दर्शन वर केलेंच आहे. चित्रशाळेचा जन्मही त्यांच्या रसिकतेच्याच पोटीं झाला.

अभिजात रसिकतेमुळें चिपळूणकरांच्या कार्यास कसें अपूर्वत्व प्राप्त झालें, याचा खरोखर विचार आतांपर्यंत कोणी केलेला दिसत नाहीं. चिपळूणकरांच्या पूर्वींच्या लोकांनीं भाषेचा उपयोग केवळ विचारांची किंवा ज्ञानाची वाहक या नात्यानेंच केला होता. केवळ पाणी वाहून नेण्याकरितां खणलेले कालवे व जलदानाबरोबरच मनोहर सृष्टिसौंदर्याचाही आविष्कार करून नेत्रांचें पारणें फेडणारी सरिता यांत जो फरक आहे तोच चिपळूणकरांपूर्वींचें मराठी वाङ्मय व चिपळूणकरांची निबंधमाला यांत आहे. चिपळूणकरांनीं भाषेच्या विचारवाहकतेबरोबरच तिच्या लालित्याकडेही लक्ष पुरविलें. त्यांच्या पूर्वींच्या लेखकांची भाषा बहुधा नीरस, कित्येक ठिकाणीं अशुद्ध, वाक्यांचे तोल न सांभाळल्यामुळें ओबड धोबड झालेली, अशी आढळते. ( वर दिलेल्या 'दंभहारकां'तील उताऱ्याची भाषा, किंवा फाटकांनीं 'ज्ञानप्रसारक' मासिकांतील लेखांचे जे अंश उद्धृत केले आहेत त्यांची भाषा पाहिल्यास या विधानाचा तेव्हांच प्रत्यय येईल. ) त्यांतल्या त्यांत सुबोध, सरळ, ओघवती व अर्थवाहक अशी भाषा एक लोकहितवादी व दुसरे कृष्णशास्त्री यांच्या लेखणींतून उतरली आहे. परंतु विष्णुशास्त्री यांच्या लेखांशीं तुलना केल्यास त्यांचे लेख फिकेच पडतील हें कोणास सांगावयास नको.

विष्णुशास्त्र्यांच्या मनोहर भाषाशैलीनें लोकांचें चित्त तेव्हांच वेधून घेतलें. याचा एक कांहींसा अनिष्ट परिणाम हा झाला कीं मालेच्या ओजस्वी व मनोहर लेखांमुळें तिच्या पूर्वींचें सर्व वाङ्मय मागें पडून केवळ संशोधनाचा विषय होऊन राहिलें. मालापूर्वकालीन लेखकांचें कोणतेंही लिखाण आज प्रचलित नाहीं; खुद्द निबंधमाला व तदनंतरचें वाङ्मय मात्र प्रचलित असून सर्वसामान्य लोकांच्या वाचनांत आहे. हा विलक्षण फरक मालेनें घडवून आणिला, म्हणूनच मालेच्या मुळें मराठी वाङ्मयांत नवें युग अवतरलें असें म्हटलें जातें. हा युगप्रवर्तकत्वाचा मान मालेला तिच्यांतील विचारांच्या अभिनवतेपेक्षां, भाषेच्या लोकोत्तर सौंदर्यामुळें प्राप्त झालेला आहे. मालेच्या कर्त्याची रसिकता, इंग्रजी निबंधकारांच्या धर्तीवर सफाईदार भाषा लिहिण्याची शैली, मनोहर व समर्पक दृष्टांत देण्याचें चातुर्य ह्या गोष्टी त्या काळीं लोकांस अपूर्व वाटल्या. जुन्या वाङ्मयांतील सौंदर्यास पारखा झालेल्या समाजास या अभिनव वाङ्मयसौंदर्यानें मोहनी घातली व मध्यंतरींच्या काळांतील चाचपडत चाललेल्या वाक्पाथिकांचे कष्टावह संचार विसरावयास लावून वाङ्मयाच्या ललितमनोहर सृष्टीकडे त्याची दृष्टि वळविली ही कामगिरी कमी महत्त्वाची आहे काय ?

मालेच्या गुणसंपदेमुळें तिच्या पूर्वीचें लिखाण मागें पडलें हा कांहींसा तोटा झाला खरा, परंतु नवीन प्रगतीचा मार्ग मोकळा करून व अनेक प्रतिभाशाली तरुणांस त्या मार्गास लावून तिनें शेंकडोपटीनें अधिक उपकार महाराष्ट्रसमाजावर केले आहेत, ही गोष्ट त्याचबरोबर लक्षांत ठेविली पाहिजे. इंग्रजी प्रबंधकारांच्या धर्तीवर आधुनिक तऱ्हेची सफाईदार भाषा लिहिण्याचा प्रचार निबंधमालेनेंच पाडला व हा प्रचार पुढें चालविणारे परांजपे, कोल्हटकर, केळकर, पांगारकर इत्यादि ग्रंथकार निबंधमालेचे पुष्कळ अंशानें ऋणी आहेत ही गोष्ट त्यांच्याच कबुलीवरून सिद्ध होत आहे. या लेखकांच्या लेखनशैलींतील सर्व उत्कृष्ट गुण

मालाकारांच्या अनुकरणाचें फळ होत असें म्हणण्याचा भावार्थ नाहीं. प्रतिभाशाली लेखक बुद्धिपुरस्सर अनुकरण फार करून कोणाचेंच करीत नाहींत. अभिनव वाङ्मयगुणांनीं भारलेलें जें वातावरण मालेनें प्रथमच निर्माण केलें तें आत्मसात् केल्यामुळेंच पुढच्या पिढ्यांमधील अनेक लेखकांच्या अंगच्या शक्तींचा विकास झाला येवढें मात्र खास म्हणतां येईल. प्रतिपाद्य विषयाबरोबरच भाषाशैलीकडे व वाङ्मयगुणांकडेही लक्ष पुरवून आपलें लेखन नीटनेटकें, सुंदर व परिणामकारक करण्याची प्रवृत्ति मराठी लेखकांमध्यें जी निर्माण झाली ती मुख्यतः निबंधमाले-मुळेंच होय. यामुळेंच महाराष्ट्र वाग्देवीचे अनेक पट्टीचे उपासक मालाकारांच्या स्तुतिपाठकांमध्यें आढळतात आणि मतांमध्यें भिन्नता, किंबहुना विरोध, असला तरी वाङ्मयगुणांमध्यें चिपळूणकर हेच बहुधा सर्व साहित्याचार्यांचेही आचार्य असल्याचें आपल्या प्रत्ययास येतें.

मालाकारांच्या रसिकतेबद्दल व त्यांनीं लिहिलेल्या निबंधांच्या अप्रतिम सौंदर्याबद्दल त्यांच्या कित्येक दूषकांनींही त्यांस धन्यवाद दिले आहेत. ग्रंथमालेंतील लेखांत कै. बा. ना. देव म्हणतात,—"ग्रंथकारा-संबंधानें मालाकारांची गणना निःसंशय पहिल्या प्रतींत होईल. गद्य ग्रंथांत त्यांची सर कोणालाच येणार नाहीं. त्यांच्या भाषासौंदर्यास जो मोहित होणार नाहीं, तो 'स योगी ह्यथवा पशुः' या कोटींतच गणला पाहिजे......त्यांच्या लेखांनीं मराठी भाषेस नवीन रूप प्राप्त झालें. या लेखांनीं मायभाषेबद्दल लोकांचें प्रेम वाढविलें......मालाकारांच्या हातून केवळ अप्रतिम भाषासेवा झाली असें कबूल केल्याखेरीज गत्यं-तरच नाहीं!" हें व असेंच मालाकारांच्या वाङ्मयसेवेचें जें गुणवर्णन देवांनीं केलें आहे त्यापेक्षां अधिक असें चिपळूणकरांचे स्तुतिपाठक मानले जाणारे गृहस्थ तरी काय म्हणत आहेत ?

रसिकता व तज्जनित भाषासौंदर्य निबंधमालेमध्यें जरी भरपूर

आढळत असलें तरी त्याचा उपयोग मालाकारांनीं वाईट तऱ्हेनें केला असें देवांचें व इतर आक्षेपकांचें म्हणणें आहे. "विचार-क्रांति घडवून आणण्याची शक्ति त्यांच्या लेखांत होती ही गोष्ट कांहीं सामान्य नाहीं !! परंतु ती विकारवशतेमुळें प्रकट झाली." असें देव म्हणतात. "भाषेला जोरदार बनवितांना त्यांनी लोकांच्या अभिरुचीला इष्ट वळण लाविलें कीं काय ?" असा प्रश्न श्री. फाटक उपस्थित करतात. अशाच धर्तीचीं अनेक दूषणें या दोघांनीं व इतरांनींही चिपळूणकरांना दिलीं आहेत. त्यांचा विचार पुढें योग्य स्थळीं करूं. येथें या संबंधांत येवढेंच लक्षांत ठेवावयाचें कीं दूषकांनीं दिलेलीं उपर्युक्त दूषणें खरीं आहेत असें जरी क्षणभर वादाकरितां मान्य केलें तरी आपल्या लेखन-सामर्थ्याच्या प्रभावानें मराठी वाङ्मयांत नवयुगाची प्राणप्रतिष्ठा त्यांनीं केली व महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांच्या नव्या पिढीमध्यें विशुद्ध सौंदर्य-दृष्टि व सर्वगामी रसिकता यांचा उद्भव केला, ही गोष्ट मान्य केल्यावाचून गत्यंतर नाहीं. आणि या कार्याचें श्रेय येवढें मोठें आहे कीं दूषकांनीं वर्णन केलेले दोष यद्यपि खरे मानले तरी ते त्यांत सहज लोपून जातील. परंतु या भाषोद्धाराच्या व रसिकताप्रसाराच्या कामगिरीचाही प्रांजळ उल्लेख कित्येक दूषकांना करवत नाहीं. इतका विकृत दृष्टीचा पगडा त्यांच्यावर बसलेला दिसतो.

रसिकता व लेखनपटुता या दोन गुणांच्या जोरावर वाङ्मयक्षेत्रांत चिपळूणकरांनीं नवयुग निर्माण केलें ही कामगिरी लहानसहान नव्हे; परंतु यापेक्षांही महत्तर अशा त्यांच्या कामगिरीचा यापुढें उल्लेख करावयाचा आहे. ही कामगिरी संस्था, इमारती, ग्रंथ इत्यादिकांप्रमाणें मूर्त व बाह्येंद्रियगोचर नसून मानसिक वातावरणांत घडवून आणलेल्या फरकाच्या स्वरूपाची आहे. ती लक्षांत येण्यासाठीं महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्यांची आंतरिक प्रगति चिपळूणकरांच्या काळापर्यंत कसकशी होत गेली याकडे थोडेंसें लक्ष पुरविलें पाहिजे.

पेशवाई नामशेष होऊन आंग्लाई सुरू झाल्यानंतर जी पहिली पिढी झाली तिच्यामध्यें लोककल्याणबुद्धीचा अंकुर उद्भवलेला फारसा कोठें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं, हें मागें सांगितलेंच आहे. इ. स. १८३० पासून १८५० पर्यंत जी दुसरी पिढी झाली त्या पिढीमध्यें (अर्थात् मुंबई शहरांत) लोकहितबुद्धीचा तुरळक उदय होत असल्याच्या खुणा आपणास पटतात. आपल्याला काय कार्य करावयाचें आहे व तें कशाकरितां करावयाचें आहे, याविषयींच्या या काळांतील लोकांच्या कल्पना पूर्ण स्पष्ट झालेल्या होत्या असें म्हणवत नाहीं. तथापि, आपले राज्यकर्ते अत्यंत सुधारलेले, अतिशय ज्ञानी, मोठ्या उदार विचारांचे असे आहेत; त्या मानानें आपण अत्यंत मागासलेले, अज्ञ व संकुचित विचारांचे आहों, तस्मात् सुधारणेचा अवलंब करून, विद्यांचा प्रसार करून व पाश्चात्य संस्कृतींतील नवीन विचार सर्वत्र फैलावून देऊन आपण हळूहळू आपल्या राज्यकर्त्यांच्या तोडीचे बनण्याचा प्रयत्न केला पाहिजे ही त्यावेळच्या बहुतेक पुढारी लोकांच्या विचारांची दिशा होती असें दिसून येतें. बाळशास्त्री जांभेकरांसारखा एखादा अपवादात्मक पुरुष विचारांमध्यें कदाचित् यापेक्षांही थोडासा पुढें गेला असेल परंतु इतरांची विचारसरणी वर दर्शविलें आहे त्यापेक्षां पुढें गेली असल्याचा दाखला मिळत नाहीं. या विचारसरणीमध्यें इंग्रज राज्यकर्ते व त्यांचा समाज हा सर्वतोपरि आपणापेक्षां श्रेष्ठ दर्जाचा, आपण त्यापेक्षां हीन दर्जाचे, अर्थात् आपली उन्नति होण्यास आपण त्यांची समाजरीति, त्यांचे विचार, त्यांची विद्या हें सर्व यथाशक्य उचललें पाहिजे, हा सिद्धान्त प्रामुख्यानें अंतर्भूत होत होता. अर्थात् स्वतःच्या संबंधानें 'हीनतेची जाणीव' (Inferiority Complex) या वेळच्या लोकांमध्यें वागत होती. याच्या पुढील पिढीचा काळ (१८५० ते १८७०) अधिक विचारीपणाचा होता. या काळांत परस्पर भिन्न अशा दोन प्रवृत्ति उत्पन्न झाल्या. त्यामुळें पूर्वींच्या काळांत

अतिशय तीव्र असलेली हीनतेची जाणीव ( Inferiority Complex ) या काळांत बरीच दबली गेली असें दिसतें. या दोन प्रवृत्तींपैकीं एक प्रत्यक्ष प्रतिकाराची होय. हा प्रतिकार प्रारंभीं मुख्यत्वेंकरून धार्मिक स्वरूपाचा होता. ख्रिस्ती मिशनऱ्यांकडून आपल्या धर्मावर होत असलेला हल्ला धर्माभिमानी शास्त्री मंडळींच्या प्रथम लक्षांत आला व त्यांनीं त्यावर मोहीम सुरू केली. विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यासारखा साक्षात्कारी प्रेरणेनें प्रवृत्त झालेला निरिच्छ पुरुष कालांतरानें यांत सामील झाला असला तरी ही धर्मसंरक्षणाची चळवळ धर्मावर ज्यांचें पोट व प्रतिष्ठा अवलंबून होती अशा शास्त्रीमंडळीनें प्रथम सुरू केलेली होती. इंग्रजी संस्कृतीच्या आक्रमणानें सर्वत्र उत्पन्न झालेली जी स्वतःच्या हीनतेची जाणीव ती नाहींशी करण्याइतकी व्यापक दृष्टि व इतकें सामर्थ्य या शास्त्री लोकांत नव्हतें. मिशनरींच्या 'अरे'ला 'कारे'चा प्रत्याघात मिळूं लागल्यामुळें ही हीनतेची जाणीव थोडी बहुत दबत चालली असेल येवढेंच.

शास्त्री मंडळाकडून नवशिक्षित समाजाकडे वळल्यास या कालांत सुधारणावादाची तात्त्विक पायावर प्रतिष्ठापना करण्याची कामगिरी तेथें चालू होती असें दिसून येईल. 'आमचे राज्यकर्ते श्रेष्ठ व आम्ही हीन; तस्मात् खाणें, पिणें, आचार, विचार, व्यवहार इत्यादि सर्व बाबतींत आपला समाज राजकर्त्यांच्या समाजाच्या धर्तीवर गेला तर आमची उन्नति होईल'–ही जी साधी भोपळसुती अनुमानपद्धति मागील पिढींतील सुशिक्षितांच्या मनामध्यें वसत होती तिचा अंमल कमी होऊन व्यापक तात्त्विक विचारांच्या आधारानें सुधारणापक्षाचें समर्थन करण्यांत येऊं लागलें. 'इंग्रजांच्या समाजांत सोवळया ओवळयाचीं शिवाशिवीचीं बंधनें नसल्यामुळें त्यांचा व्यवहार कसा सोयीस्कर व सुटसुटीत होतांना दिसतो, तस्मात् आमच्याकडील सोवळें व स्पर्शास्पर्श निर्बंध वाईट; इंग्रज लोक प्रतिमापूजन न करितां निराकार देवाची

प्रार्थना करितात तेव्हां आमच्याकडील मूर्तिपूजा अगदीं टाकाऊ; जातिभेद नसल्याकारणानें इंग्रजलोक सर्व एकत्र मिसळून प्रेमानें व्यवहार करतांना दिसतात, यास्तव आमच्यांतील जातिव्यवस्था त्याज्य.'—अशा तऱ्हेची विचारसरणी कोठें स्पष्ट तर कोठें अस्पष्ट रीतीनें व्यक्त केलेली परंतु सर्वांच्या मनांत असलेली पूर्वीच्या काळांत दिसून येते. १८५० नंतरच्या अधिक शिकलेल्या व खोल विचार करणाऱ्या सुधारकाच्या विचारसरणींत अनुकरणेच्छा इतक्या स्पष्ट स्वरूपांत व्यक्त होणार नाहीं. सोवळें ओवळें न पाळण्यास इंग्रज लोक तें पाळीत नाहींत, हें कारण न दाखवितां सोवळ्या ओवळ्याच्या कल्पनेस तर्काचा कांहीं आधार नाहीं, स्वच्छतेचा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं, त्याच्यामुळें इतर व्यक्तींचा निष्कारण अपमान करण्याचा प्रसंग येतो, इत्यादि कारणें तो दाखवील. 'मूर्तिपूजा हा असन्मार्ग आहे' असें प्रतिपादन करितांना ख्रिस्तीधर्माकडे बोट न दाखवितां सृष्टिकर्ता सर्वशक्तिमान् परमेश्वर यःकश्चित् दगडाधोंड्यांमध्यें कसा वास करूं शकेल, असा युक्तिवाद तो लढवील व क्वचित् याच्याही पुढें जाऊन वेदान्ताच्या आधारानिशीं आपलें म्हणणें पटवून देण्याचा यत्न करील. अशा रीतीनें स्वतंत्र तात्त्विक पायावर सुधारणापक्षाची घटना १८५० ते १८७० या काळांत होत होती व ती घटना चिरस्थायी करण्याकरितां संस्था स्थापण्याचाही उपक्रम सुरू होता. सुधारणापक्षाचें हें जें स्थिरीकरण चाललें होतें त्यास धर्मनिष्ठा व आस्तिक्यवाद यांचा सर्वस्वीं आधार होता. पुढें पंधरा वीस वर्षांनीं आगरकरांच्या जोरकस पुरस्काराच्या योगानें फैलावूं पाहणारा सामाजिक सुखवाद हा अज्ञेयवादानुसारी, म्हणजे जवळ जवळ नास्तिक मतांनीं प्रेरित झालेला होता. त्याच्याशीं तुलना करितां १८७० पूर्वीच्या धर्मनिष्ठ महाजनांचा सुधारणावाद हा फार निराळा भासतो.

अशा रीतीनें १८७० पर्यंत जुन्या शास्त्रीप्रभृति मंडळींच्या व नव-

शिक्षित सुधारणेच्छूंच्या चळवळी परस्पर विरोधी असल्या तरी धर्मास प्रामुख्य देऊनच चालल्या होत्या. एक पक्ष धर्मसंरक्षक होता तर दुसरा धर्मसुधारक होता. धर्माकडे लक्ष दोघांचेंही अतिशय होतें. १८७० नंतर ही स्थिति बदलूं लागली. आणि ती बदलण्यांत अग्रगण्य अशी कामगिरी चिपळूणकरांचीच झाली. देशसुधारणेच्या नाना क्षेत्रांतून ज्या चळवळी चालवावयाच्या असतील त्या चालविण्यासाठीं प्रेरणा व उत्साह उत्पन्न होण्यास धर्मकल्पनेचा आधार आधुनिक कालांत कांहीं उपयोगाचा नाहीं. धर्माविषयींची आस्था ही तरुणांच्या भावना उचंबळवून त्यांना आज घटकेस कार्यप्रेरित करूं शकणार नाहीं. पारमार्थिक उन्नतीच्या जरठ झालेल्या ध्येयाऐवजीं ऐहिक स्वरूपाचें ध्येय तरुणांच्या भावना अधिक उद्दीपित करूं शकेल. त्यासाठीं आपली संस्कृति, आपला पूर्वेतिहास यांची श्रेष्ठता उज्ज्वल भाषेंत वर्णून स्वदेशाभिमानाची व आपलेपणाची भावना तरुणांच्या मनांत उत्पन्न केली पाहिजे. चिपळूणकरांनीं मालेच्या द्वारें हेंच कार्य केलें. आणि देशाची सर्व बाजूंनीं सुधारणा घडवून आणण्यासाठीं धर्माची सुधारणा अगोदर घडवून आणली पाहिजे हें जें पूर्वीच्या पुढाऱ्यांचें महातत्त्व त्याचा फोलपणा आपल्या टीकेनें निदर्शनास आणिला. ख्रिस्ती मिशनऱ्यांची व आपल्यांतलि धर्मसुधारकांची वारंवार चेष्टा करून त्यांनीं जें दर्शविलें व जो परिणाम घडवून आणला तो हाच कीं, धर्मासारख्या अतींद्रिय गोष्टींच्या नादीं सध्यां लागणें हा वेडगळपणा आहे; देव निराकार कीं साकार हा वाद घालून नवीन पंथांची स्थापना करणें याची सध्यां कांहीं जरूरी नसून आपला आहे तोच धर्म घेऊन आपलेपणाच्या खंबीर पायावर देशाची सर्व बाजूंनीं व्यावहारिक उन्नति घडवून आणण्यास झटणें हेंच सध्यांच्या काळीं आपलें परमकर्तव्य आहे. ही विचारसरणी चिपळूणकरांनीं प्रामुख्यानें प्रतिपादन केली. चिपळूणकरांनीं प्रार्थनासमाजिस्टांचा, दयानंदांचा व

इतर धर्मसुधारकांचा जो उपहास केला आहे तो याप्रमाणें सकारण असून त्यायोगें त्यांस मोठें कार्य साधावयाचें होतें. देशोद्धाराच्या कार्या-खालचें धर्माचें अधिष्ठान काढून टाकून स्वाभिमानाचें, ऐहिक उन्नतीच्या ध्येयानें प्रेरित झालेल्या देशाभिमानाचें अधिष्ठान त्यांस निर्माण कराव-याचें होतें. हेंच अधिष्ठान आधुनिक काळांतील तरुणांच्या भावना उद्दीपित करून त्यांस कार्यप्रेरित करूं शकेल, अशी त्यांची समजूत होती. ही त्यांची समजूत बरोबर असल्याचेंच आजवरचा इतिहास सांगत आहे.

धर्मसुधारणुकेचा निषेध करून आपलेपणाची व देशाभिमानाची निवळ व्यावहारिक भावना चिपळूणकरांनीं जागृत केली, त्याबरोबरच त्यांनीं आणखी एक फार मोठें कार्य साधिलें. मोठमोठ्या विचारवंत पुढाऱ्यांपासून तों सामान्य माणसापर्यंत प्रत्येकाच्या मनांत पूर्वीपासून 'हीनतेची जाणीव' ( Inferiority Complex ) दबा धरून बसलेली होती, याचा उल्लेख वर आलाच आहे. ही जाणीव १८५०–६० च्या पूर्वीं व्यक्त स्वरूपांत दिसत असे. पुढें अधिकाधिक विद्वान व विचारी माणसें जशीं आपल्यांत निर्माण होऊं लागलीं तशी ही जाणीव तितक्या मानानें प्रकट होईनाशी झाली. तथापि सुप्त स्वरूपांत ती बहुतेकांच्या मनांत दबा धरून बसलेली होती, यांत शंका नाहीं. या भावनेला जोराचा हिसडा देऊन तिला समूळ नाहींशी करण्याचें काम जर कोणी बजाविलें असेल तर तें चिपळूणकरांनी, ही गोष्ट सर्वमान्य आहे. 'हीनतेच्या जाणिवे' चा पूर्ण निरास करून स्वाभिमानाचा जोमदार अंकुर त्यांनीं जनतेच्या मनांत वाढीस लावला. इंग्रज लोक श्रेष्ठ असतील तर आम्हीही आपल्या-परीनें श्रेष्ठ आहोंत; आम्हांस प्राप्त झालेली निकृष्टावस्था ही दैववशात् कोणत्याही राष्ट्रास आगंतुक कारणांनीं प्राप्त होणारी आहे; त्यामुळें हाय खाऊन निरुत्साह होऊन न बसतां आपल्याला झेपतील असे उद्योग हातीं घेऊन प्रगतीचा मार्ग झपाट्यानें क्रमिला पाहिजे;—हे

कोणाही थिजलेल्या मनुष्यास आशावादी व उत्साहयुक्त करून सोडतील असे विचार दणदणीत रीतीनें निबंधमालेंतूनच प्रथम प्रकट झाले. त्यामुळें हीनतेची जाणीव नाहींशी होऊन जनतेच्या मनांत उत्साह संचरला. मालापूर्वकालीन कार्यकर्त्यांच्या अंगीं स्वदेशाभिमान नव्हता असें कोणी म्हणत नाहीं; त्यांच्या अंगीं स्वदेशाभिमान पूर्णपणें भरलेला होता. परंतु आपण सर्व बाजूंनीं अत्यंत हीन झालेलों आहोंत, आपल्या समाजव्यवस्थेंत मुळापासून कांहीं तरी भयंकर विघाड झालेला आहे,– अशी समजूत सर्वांच्या मनामध्यें दृढमूल होऊन बसली होती. त्यामुळें वर वर्णिलेली जी 'हीनतेची जाणीव' तिचेंच पुष्कळशा कार्यकर्त्यां व सामान्य लोकांच्या मनांमध्यें अप्रत्यक्ष रीतीनें पोषण होत होतें. आपला समाज ज्या अर्थीं मुळापासून बिघडला आहे त्याअर्थीं धर्म, नीति, जातिसंस्था यांसारख्या समाजरचनेच्या मुळाशीं जाऊन पोंचणाऱ्या गोष्टींची सुधारणा करण्यास कंबर कसली पाहिजे. आणि धर्मापासून सर्व गोष्टींची सुधारणा करावयाची हें काम तर इतकें गहन व प्रचंड होतें कीं अव्वल दर्जाच्या कार्यकर्त्यांसही त्यांत फजीत होण्याची पाळी यावयाची. तशी पाळी अनेकांवर प्रत्यक्ष आली होती हेंही त्यावेळच्या लोकांस दिसत होतें. तेव्हां देशाची सेवा करावयाची असेल तर धर्मसुधारणा, समाजसुधारणा ( किंवा फार तर व्यापारसुधारणा–तीही त्या काळीं तितकीच गहन व बेलगामी होती ) यांसारख्या शेखीं फजीती करणाऱ्या अवडंबरांत पडावें, नाहींतर स्वस्थ बसावें, अशी कांहींशी निरुत्साहजनक परिस्थिति त्या वेळीं, म्हणजे मालेच्या उदयकालीं होती. चिपळूणकरांनीं या स्थितींत यक्षिणीच्या कांडीप्रमाणें पालट घडवून आणला. 'हीनतेची जाणीव' समूळ नाहींशी करून उद्दाम स्वाभिमानाचा फैलाव केला. आणि कोणासही अनुसरतां येतील असे स्वदेशसेवेचे अनेक मार्ग त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या आचरणाच्या योगानें दाखवून दिले. वाङ्मयनिर्मितीचा एक मार्ग त्यांनीं उपदेशिला; शिक्षणप्रसाराचा आणखी

एक मार्ग त्यांनीं दाखवून दिला; इतिहाससंशोधनाची आस्था त्यांनीं वृद्धिंगत केली; कलाप्रेम त्यांनीं उत्पन्न केलें;—याप्रमाणें 'सदैव भलत्या-सही सुलभ' अशा देशहिताच्या अनेक मार्गांची प्रेरणा त्यांनीं जनतेंत उत्पन्न केली. या सर्व गोष्टी पूर्वींच्या लोकांनींच करून दाखविल्या होत्या, तस्मात् चिपळूणकरांच्या कामगिरींत कांहींच वैशिष्ट्य नाहीं, असें म्हणणें मुळींच बरोबर होणार नाहीं. कोणाचें कार्य खरें परिणामकारक झालें हेंच या बाबतींत पाहिलें पाहिजे. चिपळूणकरांनंतरच्या अनेक विख्यात कार्यकर्त्यांना प्रत्यक्ष प्रेरणा चिपळूणकरांपासून झालेली दिसत असली आणि चिपळूणकरांच्या उदाहरणानेंच अनेक कार्यें महाराष्ट्रांत फोफावलेलीं दिसत असलीं तरी त्यांच्या प्रेरकत्वाचें श्रेय त्यांस देण्याचें नाकारणें हा कृतघ्नपणा ठरेल. चिपळूणकरांच्या उदाहरणानेंच प्रेरणा उत्पन्न होऊन अनेक मासिकें ( निबंधचंद्रिका, सरस्वतीमंदिर इ० ) निघालीं, अनेक वाङ्मयवीर ( आपटे, कोल्हटकर, पांगारकर इ० ) निर्माण झाले, अव्वल दर्जाचे इतिहाससंशोधक पुढें आले ( राजवाडे इ० ) आणि अनेक शिक्षणसंस्था ( नूतन मराठी विद्यालय इ० ) स्थापिल्या गेल्या. चिपळूणकरांच्या ऋणाची प्रत्यक्ष कबुली देणाऱ्या व्यक्ति व संस्था तर याप्रमाणें अनेक आहेतच परंतु प्रत्यक्ष उद्गारांनीं ज्यांनीं आपलें ऋण उच्चारून दाखविलें नाहीं, अशा अनेकानेक व्यक्ति व संस्था, चिपळूणकरांनीं निर्माण केलेला उत्साह व स्फूर्ति यांचें ऋण शिरावर वागवीत आहेत, असें आपणास निरीक्षणा-अंतीं दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं.

तेव्हां चिपळूणकरांच्या पूर्वींच्या कार्यकर्त्यांमध्यें स्वदेशाभिमान जरी पुष्कळ वागत असला, मिशनऱ्यांच्या हल्ल्याच्या प्रतिकाराला सुरवात जरी पुष्कळच पूर्वीं झालेली असली व सर्व तऱ्हेचे सुधारणुकेचे व देशाच्या हलाखीसंबंधाचे विचार पुष्कळ पूर्वींपासून प्रकट होत असले, तरी देखील चिपळूणकरांचें कर्तृत्व अपूर्व, उज्ज्वल व असा-

मान्य महत्त्वाचें कसें ठरतें हें वरील विवेचनावरून ध्यानांत येईल. ‘ हीनतेची जाणीव ’ त्यांनीं समूळ नाहींशीं केली; उद्दाम देशाभिमानाचा सर्वत्र प्रसार केला; धर्मसुधारणेच्या अवडंबराचा निरास करून व्यावहारिक उन्नतीचें ध्येय प्रचलित केलें; आपल्या समाजास दुर्धर रोग जडला आहे ही समजूत नाहींशी करून सध्यांची हीनावस्था आगंतुक कारणांनीं आली आहे ही उत्साहजनक समजूत त्या जागीं रूढ केली व कोणासही सुसाध्य असे देशसेवेचे मार्ग स्वतःच्या उद्गारांच्या व उदाहरणाच्या द्वारा उपदेशिले. हें सर्व कार्य त्यांच्या पूर्वीं कोणीही केलें नव्हतें. शास्त्रीमंडळी किंबहुना विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचा मिशनऱ्यांवरचा फेर हल्ला समाजांतील कांहीं वर्गापुरता परिणामकारक झाला असला तरी त्या वेळच्या इंग्रजी शिकलेल्या समाजावर त्याचा कांहीं परिणाम होत नव्हता. चिपळूणकरांप्रमाणेंच स्वाभिमानाच्या पायावर उभें राहून परकी धर्माचे व संस्कृतीचे हल्ले परतविणारें ‘दंभहारक’ हें मासिक मालेच्या पूर्वीं तीन वर्षें उत्पन्न झालें होतें व आणखी तुरळक प्रयत्न त्या तीन चार वर्षांत या दिशेनें झाले असतील, नाहीं असें नाहीं. तात्पर्य जीर्ण सुधारकांच्या सद्दीस कंटाळून देशकार्याला नवीन दिशेनें कलाटणी देण्याची कल्पना त्या वेळच्या वातावरणांत वावरत होती. परंतु निबंधमालेच्या पूर्वींचे ह्या कल्पनेस अनुसरून झालेले प्रयत्न अगदीं कोते होते. निबंधमालेच्या तुलनेनें आपला प्रयत्न अगदीं कोता व कमी दर्जाचा असल्याची कबुली खुद्द दंभहारकानेंच दिलेली वर दाखल केली आहेच. निबंधमालेच्या आगमनाची पूर्वसूचना देणारी आघाडीची ललकारी, यापेक्षां दंभहारकाची अधिक किंमत ऐतिहासिक दृष्टीनें मानितां येत नाहीं. जनतेच्या मनावर प्रत्यक्ष परिणाम घडवून आणून देशकार्याच्या स्वरूपाला कलाटणी देण्याचें कार्य घडवून आणलें चिपळूणकरांनींच. तो मान इतरांकडे जाऊं शकत नाहीं.

स्वाभिमान, स्वदेशाभिमान या भावना आहेत आणि भावनाच

मनुष्याला कार्यप्रवृत्त करूं शकतात. नुसते विचार हे मनुष्याच्या इच्छा-शक्तीला चालना देऊन त्याच्या करवीं कार्य घडवून आणूं शकत नाहींत. चिपळूणकरांनीं आपल्या लेखांच्या योगानें जसें व जितक्या प्रमाणांत भावनांचें उद्दीपन केलें तसें व तितक्या प्रमाणांत पूर्वी कोणीच केलें नव्हतें. पूर्वींच्या कार्यकर्त्यांमध्यें विचारी पुरुष पुष्कळच होते. देशाभिमानाच्या भावनेनें व लोककल्याणाच्या तळमळीनें ते स्वतः प्रेरित झालेले होते याविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. मामा परमानंद, भांडारकर, माधवराव रानडे, लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित, माधवराव कुंटे, सार्वजनिक काका इत्यादि मंडळी अनेक सार्वजनिक कार्यांच्या खटाटोपांत पडली ती भावनेची जोराची प्रेरणा असल्याशिवाय पडली नाहींत, हें उघड आहे. परंतु त्यांच्या भावना त्यांच्या स्वतः-पुरत्याच राहिल्या. लोकांमध्यें—अर्थात् शिक्षित समाजामध्यें—भावनांचें उद्दीपन करून उदात्त आदर्श त्यांच्या मनःश्चक्षूंपुढें निर्माण करून त्यांची कार्यशक्ति जागृत करण्याचें काम चिपळूणकरांनींच प्रथम म्हणण्यासारखें केलें. रानड्यांच्या पिढींतील कार्यकर्त्यांचें मुख्य लक्षण विचारीपणा हें होय, तर चिपळूणकरांच्या व्यक्तित्वाची मुख्य खूण भावनाशालिता ही होय. विचारी देशभक्तांचे मेरुमणि रानडे हे मानितां येतील. त्यांनीं महाराष्ट्रास विचार करण्यास शिकविलें तर चिपळूणकरांनीं भावना उद्दीपित करून त्यास कार्योद्युक्त केलें. या दोघां प्रतिभावान् नेत्यांच्या कार्यांचें वैशिष्ट्य स्थूलमानानें याप्रमाणें वर्णन केल्यास तें चुकीचें होणार नाहीं. रानड्यांनीं देशकार्यासाठीं अनेक लोकांना हाताशीं धरलें; परंतु ती सर्व मंडळी त्यांच्या कक्षेंत येण्यापूर्वींच देशकार्यास उद्युक्त झालेली होती. सार्वजनिक काका जोशी हे तर स्वयंभू देशभक्त असून स्वतंत्रप्रज्ञ कार्यकर्तेही होते. सीताराम हरी चिपळूणकर व गोपाळराव गोखले यांच्यामधील देशकार्याची प्रेरणाही रानड्यांनीं उत्पन्न केली नव्हती. गोखल्यांच्या प्रेरणेचा संबंध तर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष

रीतीनें चिपळूणकर संप्रदायाशींच जाऊन पोंचतो. ही सर्व आधींच कार्योद्युक्त असलेली मंडळी रानड्यांच्या सांनिध्यांत आल्यावर रानड्यांनीं त्यांना विचारसामग्री पुरविली व कार्याची दिशा दाखविली हें मात्र खरें. आणि रानड्यांचें मुख्य जीवितकार्य हेंच होय. आयुष्यभर आपल्या देशबांधवांना राष्ट्रीय प्रगतीच्या सर्व क्षेत्रांची कल्पना आणून देऊन त्या सर्व क्षेत्रांतील प्रगतीस साधक होईल अशा विचारसामग्रीचा पुरवठा त्यांनीं केला. राजकीय क्षेत्रांत सनदशीर चळवळ कशी करावी, हें मुंबईबाहेरच्या महाराष्ट्रास त्यांनीं शिकविलें. माहिती कोणती व कशी जमवावी, युक्तिवाद कसा करावा व तक्रार कशी मांडावी याचे धडे त्यांनीं घालून दिले. अर्ज, विनंत्या, सभा वगैरेच्या द्वारें चळवळ करण्यास रानडे यांनींच शिकविलें व त्यासाठीं जरूर तेथें युक्तिवादांचा व विचारांचा पुरवठा त्यांनींच केला, याविषयीं दुमत होण्याचें कारण नाहीं. औद्योगिक व आर्थिक बाबतींकडे तर राष्ट्राचें लक्ष प्रथम त्यांनींच वळविलें. ह्या क्षेत्रांत त्यांनीं केलेली विचारनिर्मिति किती महत्त्वाची आहे हें त्यांना ‘हिंदी अर्थशास्त्राचे जनक’ ही पदवी पुष्कळांकडून देण्यांत येते या एकाच गोष्टीवरून पूर्णपणें निदर्शनास येणार आहे. धर्मसुधारणेच्या बाबतींतही प्रार्थनासमाजाला व्यापक, उदार व प्रसंगोचित विचारांचा पुरवठा रानडे यांनींच केलेला आहे असें दिसून येतें. प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांचें संकलन जींत उत्कृष्ट रीतीनें केलेलें आहे ती ‘एकेश्वरनिष्ठाची कैफियत’ ( A Theist’s Confession of Faith ) रानडे यांनींच लिहिलेली आहे. समाजसुधारणेच्या विषयांतही पूर्व परंपरेला व संस्कृतीला न सोडतां सुधारणा कशी व कोणची घडवून आणावी यासंबंधींच्या तात्त्विक विचारांचा पुरवठा रानडे यांनींच केला. तात्पर्य, रानडे हेच आमचे एकोणिसाव्या शतकांतील राष्ट्रीय प्रगतीचें प्रणयन करणारे तत्त्वज्ञ होत यांत कांहीं शंका नाहीं.

परंतु जाज्वल्य भावनांमुळें उत्पन्न होणारी तडफ, धडाडी व कोणं-त्याही कार्यास सर्वस्वीं वाहून घेण्याची धमक रानडे यांच्या अंगीं स्वभावतःच नव्हती. चिपळूणकरांच्या पूर्वींच्या इतर सर्वच कार्यकर्त्यां-मध्यें ही उणीव कमी अधिक मानानें भासत होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या वैगुण्यामुळें विचार प्रसविणाऱ्या तत्त्वज्ञाचें व मसलत देणाऱ्या मुत्सद्द्याचें कार्यच रानड्यांस साधलें व तेवढेंच त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें करून दाखविलें. त्यांनीं ज्या संस्थांच्या कामांत लक्ष घातलें त्यांपैकीं ज्या ज्या संस्थांना भावनासंपन्न कार्यकर्ते लाभले होते त्या त्या संस्थांत रानड्यांच्या उपदेशाचा सदुपयोग होऊन त्या संस्थांचीं कार्यें भरास आलीं. ज्या संस्थांसाठीं असे कार्यकर्ते त्यांस मिळाले नाहींत तेथें त्यांचें सूत्रचालकत्व व्यर्थ होऊन कार्याचा बोजवारा उडाला. पहिल्या प्रकारचें उदाहरण सार्वजनिक सभेचें सुप्रसिद्धच आहे. दुसऱ्या प्रकारांत मोडणारें अत्यंत नमुनेदार उदाहरण ग्रंथोत्तेजक मंड-ळीचें होय. अशीं आणखीही अनेक उदाहरणें तत्कालीन इतिहासांतून काढून देतां येतील.

रानडे पक्षांतील ही भावनांची व आंतरिक प्रेरणेची उणीव चिपळूण-करांनीं भरून काढली. त्यांनीं तत्कालीन तरुण पिढीचीं अंतःकरणें उत्साहदीपित केलीं. त्यांच्या उद्गारांनीं व प्रत्यक्ष उदाहरणानें तरुणांच्या भावना कशा उचंबळून येत असत याचें एक उदाहरण बेलसऱ्यांनीं नमूद केलेलें मागें दाखल केलेंच आहे. परंतु हा मुद्दा इतका स्वयंसिद्ध आहे कीं तो उदाहरणें देऊन सिद्ध करण्याची फारशी आवश्यकताही नाहीं. सध्यां साठीच्या पुढें गेलेली जी कार्यकर्त्यांची पिढी महाराष्ट्रांत दिसत आहे व तिच्यापेक्षां थोडी वडील असलेली असलेली पिढी जी आजला बहुतेक दिवंगत झालेली आहे, त्यांतील बहुतेक सर्व कार्यकर्त्यांच्या मनावर चिपळूणकरांच्या कर्तृत्वानें व चारित्र्यानें फार मोठा परिणाम केलेला आहे. हरिभाऊ आपटे, शिवरामपंत परांजपे, राजवाडे, भिकाजीपंत हर्डीकर,

अच्युतराव कोल्हटकर हे दिवंगत देशभक्त व पांगारकर, लवाटे, भोपटकर इत्यादि विद्यमान कार्यकर्ते यांच्या स्फूर्तीचा स्फुलिंग कमीअधिक मानानें चिपळूणकरांपासूनच प्रज्वलित झालेला आहे ही गोष्ट त्यांच्या उद्गारां-वरून व इतर पुराव्यांवरून सहज शाबीत करतां येण्याजोगीं आहे. परंतु या बाबतींत व्यक्तिनिर्देश करण्याची गरजही नाहीं. इ. स. १८८० नंतर समाजांतील शिक्षित व पांढरपेशा वर्गांमध्यें स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यांविषयींच्या जाज्वल्य अभिमानाची जी एक लाट उसळली व त्या लाटेसरशीं सरकारी नोकरी न पतकरितां देशकार्यास वाहून घेणाऱ्या व्यक्तींची जी मालिका निर्माण झाली तिच्या उत्पत्तीचें बरेंचसें श्रेय चिपळूणकरांकडे जातें हें कोणाही सत्याभिमानी विवेचकास मान्य केल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

भावनांमुळेंच मनुष्याला कार्याची प्रेरणा मिळते. विचारीपणा कांहीं एका मर्यादेबाहेर गेला म्हणजे मनुष्य निष्क्रिय बनतो; विचार कितीही चांगले असले तरी ते मनांतल्या मनांतच राहून मनुष्य हिशेबी वृत्तीनें आपल्या स्वार्थास चिकटून राहतो. उत्कट भावनेची प्रेरणा असेल तरच मनुष्याच्या हातून धाडसाचीं, पराक्रमाचीं, त्यागाचीं व कष्टाचीं कार्यें घडून येतात. चिपळूणकरांनीं स्वातंत्र्यलालसेनें व देशाभिमानाच्या सर्वंकष भावनेनें प्रेरित होऊन नोकरीला तिलांजलि दिली व स्वतःच्या चरितार्थास उपयोगीं पडतील अशा अनेक कार्यांची परंपरा निर्माण केली. या त्यांच्या उदाहरणाचा पुढील दोनतीन पिढ्यांतील तरुणांच्या मनावर अतोनात परिणाम झाला. चरितार्थासाठीं नोकरी न पत्करितां देशकल्याणाचे अनेक उद्योग निर्माण करून, त्यांस आपलें जीवित वाहून त्यांतूनच होणाऱ्या मिळकतीवर आपला चरितार्थ चालविणें, ही कल्पनाच चिपळूणकरांच्या पूर्वीच्या काळीं अपूर्व होती. कांहीं वृत्त-पत्रकर्ते आपल्या पत्रांवर कांहीं द्रव्य मिळवीत असले तरी त्यांच्या कृत्याच्या बुडाशीं देशकार्यास सर्वस्वीं वाहून घेण्याची वृत्ति व त्यागाची

भावना नव्हती. भाऊ महाजनांसारख्या एखाद्याच्या मनामध्यें कदाचित् देशकार्यार्थ त्याग करण्याची भावना असली तरी ती अप्रकट, अप्रसिद्ध व अप्रसृत अशीच राहिली. याचें कारण त्यांच्या त्या भावनेमध्यें विशेष जोम व प्रतिभाजनित सामर्थ्य नव्हतें हेंच होय. चिपळूणकरांच्या त्यागाचा व देशकार्यार्थ जीवित वाहण्याच्या संकल्पाचा परिणाम तात्काळ सर्वत्र थरारून सोडण्याजोगा झाला. त्यांच्या मागून त्यागी कार्यकर्त्यांची उज्ज्वल परंपरा महाराष्ट्रांत निर्माण झाली. ती निर्माण करण्याचें आद्य श्रेय कोणाच्या वाट्यास जातें याविषयीं विचारी मनुष्याच्या मनास कधींही संदेह वाटणार नाहीं.

तरुण पिढीच्या मनांत देशाभिमानाच्या भावनांचे कल्लोळ निर्माण करून देशकार्यासाठीं वाहून घेण्याची प्रथा त्यांच्यांत निर्माण करणें हें चिपळूणकरांचें सर्वांत महत्त्वाचें कार्य होय. जनमनावर, विशेषतः तरुणांच्या भावनाप्रधान वृत्तींवर, अशा तऱ्हेचा परिणाम घडवून आणण्याचें सामर्थ्य त्या वेळेपर्यंत कोणीही दाखविलें नव्हतें. चिपळूणकरांच्या पूर्वी अमक्यानें अमक्या मासिकांत फार पुढें गेलेले विचार प्रकट केले होते, अशा गोष्टी प्रतिपादन करणें हें चिपळूणकरांची वरील कामगिरी नाशावीत करण्याच्या दृष्टीनें अगदीं फोल आहे. कधींकाळीं कोणाच्या तरी मनामध्यें चांगले विचार येणें व ते त्यानें एखाद्या मासिकांत लिहून व्यक्त करणें यांत विशेष असें कांहींच नाहीं. कल्पना व विचार हे काय, कोणासही सुचूं शकतात आणि साधारण शिक्षित असा कोणताही मनुष्य ते कागदावर उतरवूं शकतो. कार्यकर्त्यांच्या दृष्टीनें कोणते विचार किती अभिनव आहेत हा मोठासा मुद्द्याचा प्रश्न नसून कोणते विचार किती परिणामकारी ठरले, कोणाच्या विचारामध्यें कितपत सामर्थ्य दिसून आलें, हें पाहणेंच विशेष महत्त्वाचें ठरतें. बिचारा लक्ष्मण नृसिंह जोशी ज्ञानप्रसारकांत एकवार 'स्वदेशाच्या हलाखीची तीव्र जाणीव' व्यक्त करून व 'स्वदेशी व्रताचें माहात्म्य' वर्णून जो अस्तंगत झाला

त्याचा पुनः पाउणशें वर्षांनीं फाटकांच्या हस्तें उद्धार होण्याचा योग आला ! तो बिचारा उपर्युक्त लेख लिहून सुखेनैव आपल्या सरकारी नोकरीच्या कामकाजांत मग्न होऊन गेला असेल. तो स्वर्गस्थ होऊन विस्मृतीच्या गाढ अंधकारांत विलीन झाला असतां, तेथून ओढून काढून चिपळूणकरांना त्यांच्या योग्य पदवीपासून खेचून खालीं दडपण्याच्या कामीं फाटकांनीं त्यास राबविलेलें पाहून त्या बिचाऱ्याला स्वतःची मोठी खंत वाटत असेल, यांत शंका नाहीं. त्यानें मोठे उपयुक्त विचार प्रकट केले; कदाचित् दादाभाई नौरोजीसारख्या तत्कालीन पुढाऱ्यांच्या प्रतिपादनावरूनही त्यास हे विचार सुचले असतील. स्वदेशी व्रत स्वतः आचरणांत आणून त्याचा त्यानें चिकाटीनें पुरस्कार केला असता तर सार्वजनिक काकांचें स्थान त्यानेंच पटकावलें असतें. परंतु तसें त्यानें केलें नाहीं त्यास कोणी काय करावें ? तात्पर्य, कालेजांतील विद्यार्थ्यांनीं बहुतांशीं चालविलेल्या ‘ ज्ञानप्रसारक ’ मासिकांतील उताऱ्यांच्या आधारावर चिपळूणकरांच्या कार्याचें अपूर्वत्व नाशाबीत करूं पाहण्याचा आक्षेपकांचा हा डाव मुळींच साध्य होण्यासारखा नाहीं. कालाची तारतम्यबुद्धि आक्षेपकांच्या विवेचक शक्तीपेक्षां केव्हांही श्रेष्ठ आहे. जुन्या मासिकांतील उताऱ्यांच्या बळावर कालानें दिलेला निर्णय फिरविण्याचा यत्न केल्यास तो कसा साध्य होईल ?

## ३

# रानडे व चिपळूणकर

चिपळूणकरांनीं काय केलें हें पाहतां पाहतां त्यांची व रानडे यांची लोककार्याच्या बाबतींत तुलना करण्यापर्यंत आपण येऊन ठेपलों. प्रतिपादनाच्या ओघांत या दोन महानुभावांच्या तुलनेचा जो विषय उपस्थित झाला आहे त्याचेंच सूत्र पुढें चालवून या दोन्ही व्यक्तींचें वैशिष्ट्य आजमावण्याचा आणखी थोडासा प्रयत्न करूं.

विद्वत्ता, विचारीपणा, गांभीर्य, नेमस्तपणा, व्यापकता हे रानड्यांच्या कर्तृत्वांतील लक्षणीय गुण मानिल्यास भावनाप्रधानता, तडफ, त्यागशीलता, लोकरंजनबुद्धि, वाङ्मयरसिकता, इत्यादि चिपळूणकरांच्या चारित्र्यांतील विशेष गुण म्हणून सांगतां येतील. हे सर्व गुण चिपळूणकरांच्या जीवनांत अत्यंत परिणामकारक रीतीनें प्रकट झाले म्हणूनच लोकोत्तर प्रतिभाशाली पुरुषांत त्यांची गणना करावी लागते. वीस वर्षांपूर्वी राजवाड्यांनीं लोकशिक्षण मासिकांत ‘महाराष्ट्रांतील बुद्धिमान्, प्रतिभावान् व कर्त्या पुरुषांची मोजदाद’ या मथळ्याचा एक लेख लिहिला होता. त्यांत पेशवाईनंतरच्या महाराष्ट्रामधील जे सात अव्वल दर्जाचे प्रतिभाशाली पुरुष म्हणून त्यांनीं निवडिले होते त्यांत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें नांव दुसरेंच होतें. खरें पाहिलें असतां रानडे यांच्या अंगच्या गुणांपेक्षां चिपळूणकरांच्या अंगच्या गुणांचाच राष्ट्रास अधिक उपयोग झाला आहे. याचें कारण त्यांनीं आपले गुण सर्वस्वीं आपल्या राष्ट्राच्या चरणीं वाहिले होते हें तर आहेच, परंतु त्याशिवाय त्यांच्या अंगचे गुण स्वभावतःच आपल्या राष्ट्रांतील लोकांना विशेष धारजिणे होणारे होते ही गोष्ट मुख्यत्वेंकरून लक्षांत ठेवण्याजोगी आहे. विद्वत्ता व पुस्तकी पांडित्य ही चीज उपयुक्त असेल, परंतु लोककल्याणकारितेचें माप विद्वत्तेवरून ठरविणें हें असमंजसपणाचें

होय. याच्याही पलीकडे जाऊन शाळेंतील व कालेजांतील अभ्यासक्रमांत मिळविलेल्या यशापयशावरून एखाद्याच्या उत्तर आयुष्यांतील कर्तृत्वाचा अजमास बांधणें हें तर निखालस अविचारीपणाचें होय. परीक्षेंतील यश हें पुढील आयुष्यांतील कर्तृत्वाचें मुळींच गमक मानितां येत नाहीं. रानड्यांनीं युनिवर्सिटीच्या परीक्षांमध्यें पहिला नंबर पटकावला व परीक्षेसाठीं पुस्तकांचे भारेच्या भारे वाचून काढले याचा अचंबा वाटण्याचे दिवस आतां निघून गेले आहेत. त्यांची योग्यता आजमावतांना लोकहितासाठीं ते किती झटले हेंच आजचा विवेचक मुख्यत्वेंकरून पाहील. या दृष्टीनें पाहिल्यास त्यांची योग्यता कमी भरेल असें कोणाचें म्हणणें नाहीं. परंतु भलत्याच गोष्टींचें स्तोम माजवून पोकळ स्तुति करण्याकडे कित्येक विवेचकांचा कल असलेला दिसून येतो, म्हणून हा इषारा देणें जरूर वाटतें. असो.

रानड्यांची वृत्ति विचारप्रधान होती तर चिपळूणकरांची भावनाप्रधान होती हीच गोष्ट या दोघांच्या जीवितकार्यासंबंधानें मुख्यतः लक्षांत ठेवण्याजोगी होय. दोघां व्यक्तींमधील हा प्रकृतिभेद लक्षांत घेतला म्हणजे त्यांच्या कृत्यांची व त्यांच्या जीवनांतील घटनांची उपपत्ति सुसंगत रीतीनें लागते. भावनांची प्रेरणा तितकीशी जाज्वल्य नसली म्हणजे विचारी मनुष्य आपल्या विचारांतच गुंतून राहून कांहींसा निष्क्रिय बनतो. तशी स्थिति रानड्यांची होती. येथें निष्क्रिय याचा अर्थ केवळ स्वस्थ बसणारा, आळशी, असा घ्यावयाचा नसून आपल्या विचारांस व मतांस अनुसरून जीं कृत्यें आपण स्वतः पुढें होऊन करावयास पाहिजेत तीं न करणारा, येवढाच घ्यावयाचा आहे. या अर्थास अनुसरून निष्क्रियतेचा दोष आयुष्यांतील अनेक प्रसंगीं पदरांत घेणें त्यांस भाग पडलें हें सुप्रसिद्धच आहे. द्वितीय विवाहप्रसंगीं स्वमतानुसार न वागल्याचें लांछन त्यांस लागलें किंवा पंच हौद मिशन प्रकरणांत स्वतःच्या विचारांच्या विरुद्ध प्रायश्चित्त

घेऊन व इतरांस घ्यावयास लावून स्वतःच्या पक्षांतील लोकांच्या कडक टीकेस त्यांनीं स्वतःला पात्र करून घेतलें, या सर्व प्रकारांतील बीज हेंच होय. या सर्व प्रसंगांत ते आपल्या प्रकृतीनुसार वागले. त्यांचा प्रकृतिस्वभाव लक्षांत घेतां यापेक्षां निराळें आचरण त्यांच्या हातून घडणें अशक्य होतें. या दृष्टीनें पाहिलें असतां या कृत्यांचें दोषरूपत्वही निघून जातें; व 'स्वभावस्तु प्रवर्तते' या न्यायानें घडून आलेल्या घटना येवढेंच त्यांचें वर्णन शिल्लक राहतें. नोकरींत अपमान झाला असून सुद्धां पैशाच्या लोभास्तव त्यांनीं नोकरी सोडली नाहीं, असा जो आरोप त्यांजवर केला जातो तोही या दृष्टीनें पाहिलें असतां फोल ठरतो. अशा तऱ्हेचा त्याग करावयास भावनेची जोरकस प्रेरणा लागते, ती त्यांच्यांत नसल्यानें त्यांच्या हातून तसें कृत्य होऊं शकलें नाहीं हें उघड आहे. सध्यांचा काळ विचाराचा आहे, आचाराचा अझून पुढें यावयाचा आहे, असेंच जणूं काय त्यांचें म्हणणें असावें असा त्यांच्या आचरणावरून ग्रह होतो.

परंतु उणीव म्हणजे कांहीं दोष नव्हे, हें सर्वांनीं सर्वत्र लक्षांत ठेवलें पाहिजे. तशी सर्वगुणपूर्णता कोणाही मानव व्यक्तीच्या ठायीं आढळणें अशक्य आहे, म्हणून अमक्यानें अमकें केलें नाहीं हें सांगण्यावर विशेष जोर न देतां, त्यानें केलें काय व तें कितपत महत्त्वाचें व उपयुक्त आहे हें पाहण्याकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. हा दृष्टिकोण स्वीकारला म्हणजे रानडे यांनीं आपली जबाबदारीची व जिकिरीची सरकारी नोकरी संभाळून केलेलें कार्य केवळ अतुलनीय ठरतें. कार्यकर्त्या व्यक्तींना हातीं धरून अनेक संस्था त्यांनीं चालविल्या, हें तर आहेच. परंतु या प्रच्छन्न रीतीनें केलेल्या सूत्रचालकत्वापेक्षां देशकार्याच्या व्यापकतेची, किंबहुना विराट स्वरूपाची, कल्पना महाराष्ट्राला त्यांनीं आणून दिली; व सर्व बाबतींत एक प्रकारच्या उदारमतवादाचा प्रसार केला हें त्यांच्या कामगिरीचें वैशिष्ट्य विशेष लक्षांत घेण्याजोगें

आहे. देशोद्धाराचें कार्य केवढें अफाट आहे याची जाणीव रानड्यांनीं करून दिली, तर त्या कार्याला सर्वस्वीं वाहून घेऊन लोकानुरंजनबुद्धीनें तें कार्य कसें करावें हें चिपळूणकरांनीं शिकविलें असें दोघांच्या कार्यांचें वर्णन केलें असतां चालेल.

यावरून हें दिसून येईल कीं या दोघां प्रतिभाशाली पुरुषांचें कार्य एकमेकांस पूरक अशा स्वरूपाचें झालें. रानड्यांच्या प्रकृतींतील उणीवा चिपळूणकरांच्या प्रकृतिगुणांमुळें भरून आलेल्या दिसतात, तर चिपळूणकरांमध्यें ज्या स्वभावगुणांची उणीव आढळते त्यांची परिपूर्ति रानड्यांच्या गुणांमुळें होऊं शकते. गाढ विद्वत्ता, गहन विचार, व्यापक दृष्टि व संग्राहक बुद्धि या गुणांचा चिपळूणकरांमध्यें बहुतांशीं अभाव होता, तर रानड्यांच्या ठायीं याच गुणांचा प्रकर्ष झालेला दिसून येत होता. उलट भावनाशालिता, त्यागशीलता, लोकानुरंजनबुद्धि इत्यादि ज्या गुणांची रानड्यांच्या ठायीं उणीव होती तेच गुण चिपळूणकरांमध्यें परमोच्च स्थितीला जाऊन पोंचले होते.

अशा रीतीनें दोघांही कार्यकर्त्यांचे गुण एकमेकांस पूरक असल्यानें त्यांचा समन्वय होऊन गंगा–यमुनांच्या प्रवाहांप्रमाणें त्यांचा एकच ओघ बनला असता तर किती बहार झाली असती ! पुढील पिढ्यांमधील कार्यकर्त्यांनीं दोघांच्याही गुणांकडे व कार्यपद्धतींकडे आदरबुद्धीनें पाहून दोघांमधील विशिष्ट गुण आत्मसात् केले असते तर देशाचें, झालें त्यापेक्षां, किती तरी पटींनीं अधिक कल्याण झालें असतें. परंतु दुर्दैवानें ती गोष्ट घडून आली नाहीं. चिपळूणकरांच्या हयातींत या दोघां पुरुषांमधील विरोधास तीव्रता आली नव्हती. किंबहुना दोघांमध्यें विरोध असा नव्हताच. फक्त मतभिन्नता व मार्गभिन्नता होती. परंतु चिपळूणकरांच्या मृत्यूनंतर कांहीं कालानें मतभिन्नतेचें मतविरोधांत पर्यवसान झालें व दोघांचेही दोन भिन्न संप्रदाय निर्माण झाले. दोघांच्या मतांचा वारसा सांगणाऱ्या दोन भिन्न परंपरांना याप्रमाणें सांप्रदायिक

स्वरूप प्राप्त झाल्यानंतर मग परस्पर उखाळ्या व गालिप्रदान यांस काय उणीव ? दोघांच्याही संप्रदायांमध्यें पुष्कळ उच्च दर्जाचे कार्यकर्ते निर्माण झाले; परंतु त्यांनीं समन्वयाकडे दृष्टि न ठेवल्यामुळें, इतकेंच नव्हे तर परपक्षांतील गुणांचीही हेटाळणी करण्याचा क्रम सुरू झाल्यामुळें, दोन्ही संप्रदायांना एकांगीपणा आला आणि गुणांचाच अतिरेक होऊन त्यांना हळूहळू दोषांचें स्वरूप प्राप्त होत गेलें. चिपळूणकरांच्या संप्रदायांत भावनाशालितेचा अतिरेक होऊं लागला; अभ्यास, व्यासंग, विचारीपणा यांची त्या संप्रदायांत कमताई दिसून येऊं लागली, इतकेंच नव्हे तर या सर्वस्वीं इष्ट प्रवृत्तींची अवहेलना करण्याचाही क्रम सुरू झाला. चिपळूणकरांच्या ठायीं योग्य स्वरूपांत दिसून आलेल्या स्वाभिमानाचें पुढें दुरभिमानांत रूपांतर होऊं लागलें; त्याचप्रमाणें लोकानुरंजनबुद्धीचाही अतिरेक होऊन निवळ चुरचुरीत लिहून अथवा बोलून वाहवा मिळविणें हेंच कित्येकांस आपलें इतिकर्तव्य वाटूं लागलें. याच्या उलट रानडे संप्रदायांतही विचारीपणाचा अतिरेक होऊन कृतीचें प्रमाण जवळ जवळ शून्यापर्यंत जाऊन पोंचलें; संग्राहकबुद्धि नाहींशी होऊन लोकांपासून फटकून राहण्यांतच त्यांतील कित्येकांस भूषण वाटूं लागलें; बदलत्या परिस्थितीस अनुसरून नवीन विचार प्रसविण्याची त्यांची ताकद नाहींशी होऊन आपल्या गुरूंचेच विचार पुनः पुनः घोटीत बसण्यांत त्यांस सार्थक वाटूं लागलें. या दोन्ही संप्रदायांत जे अनेक विख्यात कार्यकर्ते झाले त्यांस हीं वर वर्णिलेलीं अतिरेकाचीं लक्षणें लागू पडतात असा प्रस्तुत लेखकाचा भावार्थ आहे, असा कोणी गैरसमज करून घेऊं नये. साखळीची मजबुती जशी त्यांतील सर्वांत अधिक कमकुवत दुव्यावरून ठरते त्याचप्रमाणें संप्रदायाचें स्वरूप त्यांतील अगदीं सामान्य लोकांच्या प्रवृत्तींवरून ठरवावें लागतें. अर्थात् वर वर्णन केलेला अतिरेक त्या त्या संप्रदायांतील सामान्य अनुयायांच्या अंगीं दिसून येणारा होय हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

हा अनिष्ट स्वरूपाचा अतिरेक परस्पर विरोधामुळें झाला. दोन्ही संप्रदायांचा समन्वय झाला असता तर दोघांमधील गुणांचें एकीकरण होऊन सर्वांगपरिपूर्ण अशा एकाच देशभक्तिसंप्रदायाचें आपणांस दर्शन घडलें असतें. परंतु विधिघटना तशी नव्हती. आपणा महाराष्ट्रीयांच्या दुर्दैवानें परस्पर उखाळ्या पाखाळ्या, भांडणें व हेवेदावे यांतच कार्यकर्त्यांच्या उत्साहाचा व शक्तीचा बराचसा व्यय व्हावयाचा होता!

तेव्हां सामान्यतः चिपळूणकरांचा भावनाप्रधान संप्रदाय व रानड्यांचा विचारप्रधान संप्रदाय यांच्यामधून विस्तव न जाण्याजोगीच परिस्थिति महाराष्ट्रांत निर्माण झालेली असली, तरी दोन्ही पक्षांतील कांहीं कांहीं व्यक्तींमध्यें उभय संप्रदायांतील बऱ्याचशा गुणांचा सुंदर समन्वय झालेला दिसून येतो, ही त्यांतल्या त्यांत समाधान मानण्याजोगी गोष्ट होय. अशा समन्वयाचें सर्वांत उत्कृष्ट उदाहरण हरि नारायण आपटे यांचें होय. हा समन्वय कांहीं अंशीं स्वभावतः घडून आलेला होता; तथापि बऱ्याच अंशीं तो हरिभाऊ आपट्यांनीं बुद्धिपुरस्सर घडवून आणलेला असल्यामुळें त्याचें कौतुक विशेषच वाटतें. आपट्यांचा स्वभाव अत्यंत भावनाप्रधान; तेव्हां अल्पवयांतच चिपळूणकरांच्या कर्तृत्वाची छाप त्यांच्या मनावर पडून ते त्यांचे निष्ठावंत अनुयायी बनले. देशसेवेसाठीं जीवित वाहण्याचा व स्वभाषेंत वाङ्मयनिर्मिति करून तद्द्वारा देशसेवा करण्याचा असे दोन्ही निश्चय त्यांनीं चिपळूणकरांचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवूनच केले. रसिकता त्यांच्या अंगीं मूळचीच होती, ती चिपळूणकरांच्या उदाहरणामुळें त्यांनीं आणखी वाढविली. अशा रीतीनें त्यांच्या मनोभूमिकेचा पाया सर्व चिपळूणकरांच्या चारित्र्याच्या प्रभावामुळेंच तयार झाला. परंतु पुढें मात्र प्रत्यक्ष राजकारणामध्यें व समाजकारणामध्यें ते रानडे संप्रदायाचे अनुयायी बनले. त्यांच्या मृदु स्वभावास रानडे संप्रदायाचीं नेमस्त मतेंच रुचलीं व पचलीं असावीं. तथापि त्यांचें वाङ्मय सूक्ष्म दृष्टीनें जो कोणी वाचून पाहील त्यास चिपळूणकर

संप्रदायाच्या तत्त्वांची दाट छाया त्यांच्या लिखाणावर पडली असल्याचें आढळल्याखेरीज राहणार नाहीं. एकंदरीनें दोन्ही संप्रदायांच्या समन्वयाचें अभिनंदनीय दृश्य आपटे यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडतें असें म्हटल्यास तें कोणासही पटण्यास अडचण पडेल असें वाटत नाहीं.

समन्वयाचें असेंच दुसरें सुंदर उदाहरण श्री. तात्यासाहेब केळकर यांचें सांगतां येईल. तथापि यांच्या ठिकाणचा समन्वय हेतुपुरस्सर करण्यांत आलेला नसून तो स्वभावतःच झालेला दिसतो. त्यांचें चरित्र आज सर्वांच्या डोळ्यांपुढें वागत आहेच. तेव्हां त्यांतील गुणांविषयीं येथें अधिक विवरण करण्याचें कारण नाहीं.

तेव्हां रानडे व चिपळूणकर यांच्या चरित्राकडे बघतांना आपण दोन तीन गोष्टी प्रामुख्यानें लक्षांत ठेवल्या पाहिजेत. त्यांच्या कार्यांचें मोजमाप करून त्यांची परस्पर तुलना करितांना केवळ त्यांच्या सार्वजनिक चरित्राकडेच लक्ष देण्याचें धोरण आपण अवलंबिलें पाहिजे. इतर आंगतुक गोष्टींकडे लक्ष पुरविल्यानें मूळ मुद्द्याच्या विवेचनास मदत तर होत नाहींच परंतु आपली विचारसरणी पूर्वग्रहदूषित बनण्याचा मात्र संभव असतो. उदाहरणार्थ, दोघांच्या लौकिक कार्यांचा विचार कर्तव्य असतां, चिपळूणकरांनीं शाळेच्या अभ्यासांत कांहीं हुशारी दाखविली नाहीं, उलट ते एकदोनदां नापासही झाले होते, व रानड्यांनीं एकामागून एक परीक्षा देऊन सर्वांत पहिला नंबर व बक्षिसें वगैरे मिळविलीं, या गोष्टींचा उल्लेख करणें अगदीं अप्रस्तुत व अप्रयोजक होय. ही एक गोष्ट झाली. दुसरी गोष्ट पूर्वी अनेकवार सांगितली आहे, ती हीच कीं, अशा गतव्यक्तींच्या जीवनकार्यांकडे पाहतांना ऐतिहासिक दृष्ट्या त्यांच्या कार्यांचा समन्वय करण्याची दृष्टि आपण नेहमीं जागृत ठेवली पाहिजे. तसें न करितां ते परस्परांशीं भांडले म्हणून आपणही त्यांची कड घेऊन परस्परांशीं भांडू लागलों तर आपणासारखे

आत्मघातकी आपणच ठरूं. आणि भांडावयास आतां कांहीं सबब किंवा कारणही उरलेलें नाहीं. सध्यांचा काळ इतका बदललेला आहे कीं रानडे काय, चिपळूणकर काय, दोघांनींही प्रकट केलेले विचार आतां गतार्थ झालेले असून अगदीं नवीन व निराळ्या प्रश्नांच्या भोंवऱ्यांत आपण आज सांपडलों आहों, असें आजच्या पिढींतील पुष्कळ कार्यकर्त्यांस वाटतें. सध्यांचा काळ असा विचित्र आला आहे कीं कदाचित् रानडे यांचें उदारमतवादित्व व धर्माधिष्ठित सुधारणावाद आणि चिपळूणकरांचा पूर्वजाभिमान व देशाभिमान या सर्वच गोष्टी सोडून देऊन आपणास तिसरीकडेच वाहत जावें लागेल. तरी अशा समयीं जीर्ण वादांचें उद्भावन करून त्याचा काथ्याकूट करीत बसण्यापेक्षां ऐतिहासिक दृष्ट्या सर्व व्यक्तींचें व प्रश्नांचें निरीक्षण करणें हेंच आजच्या घटकेस उचित होय, हें कोणासही पटेल.

रानडे–चिपळूणकरांनीं व्यक्त केलेल्या मतांचा व विचारांचा उपयोग, वर वर्णिल्याप्रमाणें, आजच्या घटकेस कांहींसा कमी झाला असला तरी त्यांनीं आपल्या चरित्राच्या व लेखांच्या द्वारा ज्या मानसिक गुणांची प्रेरणा आपणांमध्यें उत्पन्न केली आहे तिचें मूल्य मात्र कधींही कमी होणारें नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. आणि या दृष्टीनें ते दोन्ही पुरुष पूर्वींइतकेच आजलाही अनुकरणीय आहेत यांत संशय नाहीं. चिपळूणकरांची भावनाशालिता, योजकता, कार्यकुशलता, स्वीकृत कार्यास सर्वस्वीं वाहून घेण्याची तयारी, त्याचप्रमाणें रानडे यांची व्यापक दृष्टि, खोल विचार व थोर मन–यांचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवणें कधीं तरी अनुपयुक्त होईल काय ?

उभ्या आयुष्यांत रानडे व चिपळूणकर यांचा परस्परांशीं प्रत्यक्ष संबंध कधीं आला असल्याचा दाखला मिळत नाहीं. चिपळूणकरांनीं त्यांजवर आपल्या मालेंत टीका केली आहे ही गोष्ट मात्र सुप्रसिद्ध

आहे. चिपळूणकरांनीं तत्कालीन देशोद्धाराच्या खळबळीवर व 'आमचे नवीन विद्वान लोक' यांजवर मालेंत जी टीका वारंवार केली आहे तिचा कांहीं अंश अप्रत्यक्ष रीत्या रानड्यांच्या वाटेस जातो असें स्थूल-मानानें म्हटल्यास कांहीं चिंता नाहीं. तथापि चिपळूणकरांना रान-ड्यांच्या विषयीं जो आदर वाटत होता ( व जो त्यांनीं निबंधमालेंत प्रांजळपणें प्रकट केला आहे,) तो लक्षांत घेतां तत्कालीन कार्यकर्त्यांच्या उपहासांत रानड्यांनाही गोवणें सर्वत्रच त्यांना अभिप्रेत असेलसें वाटत नाहीं. शिवाय, ह्या टीकेपैकीं पुष्कळसे आरोप त्यांना लागू पडण्या-जोगेही नाहींत. तेव्हां हा अप्रत्यक्ष टीकेचा प्रांत सोडून प्रत्यक्ष टीकेचा जो एकच प्रसंग सबंध निबंधमालेंत आलेला आहे त्याविषयींच जरा विस्तारानें विचार करूं. या प्रसंगाचा विचार जरा कसोशीनेंच करणें जरूर आहे. कारण चिपळूणकरांच्या या टीकेवर रानड्यांचे चरित्रकार श्री. फाटक यांनीं जबरदस्त प्रहार केला असून त्याबाबत चिपळूण-करांवर भयंकर स्वरूपाचे आरोप केले आहेत.

कित्येकांची लेखणी निंदा करण्यांतच विशेष चपळाईनें चालते. साधा विषयप्रतिपादनाचा मार्ग कसा तरी नीरस रीतीनें आक्रमण करून त्यांची लेखणी निंदाप्रदेशाच्या टप्प्यावर आली म्हणजे तिला उत्साह येतो व लेखनाला बाळसें चढतें. श्री. फाटकांनीं लिहिलेल्या चरित्रांत अशीच टप्प्याटप्प्यांनीं टीकाविषयांची योजना झाली आहे असें आढ-ळून येतें. पहिल्याच टप्प्यावर ताज्या अवसानांतला जबर फटकारा फाटकांनीं विष्णुशास्त्र्यांना लगावला आहे. दुसरा टप्पा २३० व २४० या पृष्ठांच्या दरम्यान आलेला असून त्यांत मुख्य विषय दयानं-दांची मिरवणूक हा आहे व शेवटीं चिपळूणकरांनाही थोडासा प्रसाद मिळण्याची तजवीज केली आहे. तिसरें ठिकाण म्हणजे संमतिबिला-वरील वादविवादाच्या निमित्तानें टिळक, जिनसीवाले इत्यादिकांवर लेखणी चालविण्याची संधि साधून घेतली आहे तें होय ( पृष्ठ ४२८–

४४४ ). हा केवळ महत्त्वाच्या टप्प्यांचा उल्लेख केला; याशिवाय अनेक ठिकाणीं क्षुल्लक धक्केचपेटयांची योजना केली आहे ती निराळीच. आतां या सर्व प्रकाराची रानड्यांच्या चरित्रांत काय आवश्यकता होती असा मात्र प्रश्न उपस्थित होण्याजोगा आहे. चरित्रा-मध्यें प्रत्यक्ष चरित्रनायकाचीं कृत्यें, अनुभव व विचार आणि या सर्वांवर ज्यांचा कांहीं परिणाम घडून आला असेल अशा सभोंव-तालच्या परिस्थितींतील गोष्टी, इतक्यांचा समावेश झाला म्हणजे चरित्रकारानें आपलें काम उत्कृष्टपणें बजावलें. तत्कालीन इतर व्यक्तींना ओढून आणून त्यांजवर वाक्सुमनांजलि वाहणें हें चरित्राच्या हेतूस पोषक होईलच असें नाहीं. चिपळूणकरांबद्दल आपल्यास विचार कराव-याचा आहे; तर पहिल्या प्रथमच ७६–८२ पृष्ठांत त्यांच्यावर केलेली टीका आपण पाहूं. रानड्यांनीं ओरिएन्टल ट्रान्स्लेटरच्या जागेवर असतांना परशुरामपंत गोडबोले यांच्या ‘ केकादर्श ’वर सरकारी रीतिनें अभिप्राय लिहून पाठविला. त्यांत नुसतें केकादर्शाबद्दलचें आपलें मत न नमूद करतां मूळ केकावलीला लघुत्व आणणारी अशीही बरीच टीका त्यांनीं केली होती. चिपळूणकरांनीं आपला मोरोपंतांच्या कवितेवरील निबंध लिहिला त्यांत, त्या वेळेपर्यंत मोरोपंतांच्या कवितेवर आक्षेप काढणारे जे जे होऊन गेले होते त्यांचा परामर्श घेणें हा एक त्यांचा प्रमुख हेतु होता. तेव्हां मालेच्या ५२ व ५४,५५ या अंकांत, कृत्रिमत्व व परमेश्वराशीं केलेली अनुचित धृष्टपणाची सलगी, हे जे दोन दोषारोप माधवरावांनीं केकावलीवर केले होते त्यांचें चिपळूणकरांनीं खंडन केलें. या खंडनावर श्री० फाटक यांनीं टीका केली असून “ जातां जातां विष्णुशास्त्र्यांच्या विद्वत्तेविषयीं थोडी जास्त चर्चा ” ही केली आहे. आतां या सर्व धुमश्चक्रींत सहा सात पानें खर्च केल्यामुळें रानड्यांच्या चरि-त्राच्या कोणच्या भागावर अधिक प्रकाश पडला हें समजणें कठीण आहे. फाटकांना कदाचित् असें म्हणतां येईल कीं, चिपळूणकरांनीं रानड्यांवर

केलेली टीका चुकीची असल्यामुळें ती तशीच राहूं देणें म्हणजे रानड्यां-विषयीं त्यांनीं केलेला अन्याय तसाच कायम राखण्यासारखें होईल, यास्तव त्यांच्या टीकेचा उल्लेख करून त्याचें खंडन करणें प्राप्त झालें. वस्तुतः ही बाब लहानशीच असून त्यांत रानड्यांवर खरोखर कांहीं अन्याय झालेला नाहीं. तथापि त्या बाबीचा उल्लेख करून चिपळूणकरांची चूक दाखवून देणें इष्ट होतें असें क्षणभर कबूल केलें तरी तें काम थोडक्यांत उल्लेख करून सहज आटपून टाकतां आलें असतें. त्यासाठीं निंदेचा येवढा गदारोळ व तेवढ्यानेंही समाधान होईना, तेव्हां 'जातां जातां विष्णुशास्त्र्यांच्या विद्वत्तेविषयीं थोडी जास्त चर्चा' करण्याचें कांहीं कारण नव्हतें.

पूर्वीं दिग्विजय करण्याकरितां निघालेले वीर वेशींतून रणशिंग फुंकून प्रतिस्पर्ध्यांना आपल्या आगमनाची जाणीव करून देत असत. श्री. फाटकांनींही ज्या प्रकरणांत मालाकारांशीं झुंज मांडायची त्याच्या आधींच्या प्रकरणांत त्यांना सलामी ठोकून आपल्या आगमनाची सूचना देऊन ठेवली आहे. ६२ व्या पानांत फाटकांनीं रानड्यांच्या मराठी अभ्यासाची माहिती दिली आहे. 'ज्ञानेश्वरीचे सहा अध्याय,' 'नवनी-ताच्या कित्येक भागांचीं पारायणें' आणि 'मोरोपंतांच्या पुष्कळशा कवितांचें परिशीलन' इतकें अध्ययन माधवरावांनीं फेब्रुवारी व मार्च ( १८६४ ) या दोन महिन्यांत केलें, ही माहिती प्रथम माधवरावांच्या शब्दांनीं निवेदन करून पुढें "माधवरावांनीं परीक्षकाचा अधिकार संभाळण्याकरितां मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर, महीपति इत्यादि मराठी कवींच्या ग्रंथांचा उत्तम अभ्यास केला होता" असा चरित्रकारांनीं स्वतःच्या शब्दांत निर्वाळा दिला आहे. माधवरावांच्या मराठी अध्यय-नाची फाटकांनीं कितीही स्तुति केली असती तरी त्याबद्दल कोणास कांहीं म्हणण्याचें कारण नव्हतें. परंतु गुळचट स्तुतीला खमंग-पणा यावा म्हणून तिच्या शेजारीं प्रतिपक्षनिंदेची जी त्यांनीं योजना

केली आहे ती कितपत औचित्याची दर्शक आहे हा प्रश्न आहे. फाटक म्हणतातः—" माधवरावांना मराठी भाषेची माहिती कितपत आहे, असा एक अपवाद केवळ चुरचुरीत व महन्निंदाप्रचुर लेखनाच्या जोरावर महाराष्ट्रास झुलविणाऱ्या एका लेखकानें कालांतरानें उत्पन्न केला." आतां 'माधवरावांना मराठी भाषेची कितपत माहिती आहे?' हा जर साधा प्रश्नच असेल तर तो कांहीं 'अपवाद' होऊं शकत नाहीं. तेव्हां या प्रश्नाचा व्यंग्यार्थ 'माधवरावांना मराठी भाषेची माहिती नाहीं' असा केला म्हणजेच तो माधवरावांवर अपवाद घेतल्यासारखा होतो. हा अपवाद उपस्थित केल्याच्या आरोपाबद्दल आमचें म्हणणें इतकेंच कीं, ज्या महाराष्ट्रास झुलविणाऱ्या एका लेखकानें हा अपवाद उत्पन्न केला असें फाटक म्हणतात, त्यानें म्हणजे चिपळूणकरांनीं तो खास उत्पन्न केलेला नाहीं. निबंधमालेंत या विषयाचा उपन्यास करितांना रानड्यांविषयीं चिपळूणकरांनीं उद्गार काढले आहेत ते येणेंप्रमाणें:— " रावबहादुरांचा महाराष्ट्र कवितेवर कितपत व्यासंग आहे हें आम्हांस चांगलेंसें माहीत नाहीं; तरी निदान शोधकपणा व मार्मिकपणा हे गुण त्यांच्या अंगीं पूर्ण असून त्यांचा अभिप्राय,...कधीं लेचापेचा बाहेर पडावयाचा नाहीं, तर तो नेहमीं यथान्याय व पोक्त असाच असावयाचा, याविषयीं पहिल्यापासून प्रसिद्धि आहे. तेव्हां या ख्यातीवरून पाहतां वर त्यांनीं एकंदर महाराष्ट्र कवींविषयीं व मोरोपंताविषयीं जो एवढा निक्षून अभिप्राय दिला आहे त्याचा आम्हांस अत्यंत विस्मय होतो. त्यांच्यासारख्या बड्या विद्वानाच्या लेखावर आक्षेप घेणें हें कांहीं अंशीं मोठें साहसच होय; पण स्वपक्षाची चांगली बळकटी पाहूनच या साहसास आम्ही प्रवृत्त होत आहों. आतां इतकेंही करून आमची कोटी जर त्यांच्यावर लागू झाली नाहीं...तर आम्ही आपले आक्षेप माघारीं घेऊं." ( अंक ५२ ). हा मजकूर इतका प्रांजळपणाचा व प्रतिपक्षाविषयीं नितान्त आदर दर्शविणारा आहे कीं त्यायोगानें

लेखकानें रानड्यांवर कोणताही अपवाद घेतला आहे, असें कोणाही वाचकाच्या मनांत येणार नाहीं. ‘ रावबहादुरांचा मराठी कवितेवर कितपत व्यासंग आहे हें आम्हांस माहीत नाहीं, ’ असें जें म्हटलें आहे तें भावार्थीनेंच म्हटलें आहे. आणि असें म्हणण्याचें तरी कारण हेंच कीं रानड्यांनीं मराठी कवितेवरतीं प्रकट केलेलीं मतें इतकीं विलक्षण होतीं कीं त्या कवितेचा चांगला व्यासंग असलेला मनुष्य तशीं कधींही प्रकट करणार नाहीं असें त्यांस वाटलें. असो. ‘ सदर लेखकानें माधवरावांच्या बाबतींत दाखविलेली लघुमनस्कता पुढें या वृत्तान्तांत येणार’ असल्याचें सुचवून फाटकांची निंदेची ऊर्मि येथें लय पावली आहे. ही विष्णुनिंदा–प्रकरणाची प्रस्तावना झाली.

या प्रस्तावनेनंतर मुख्य विष्णुनिंदाध्यायाकडे वळूं. रानडे यांनीं केकावलीवर आपल्या ट्रान्स्लेटरी पेनाच्या सफाईत लिहिलेल्या शेऱ्यावर चिपळूणकरांनीं जी टीका केली तिच्यावर फाटकांचा मुख्य कटाक्ष आहे हें वर सांगितलेंच आहे. आतां या बाबतींत प्रथमपासून कसा हातचलाखीचा प्रकार फाटकांनीं केला आहे तें पाहण्यासारखें आहे. रानडे यांनीं आपल्या अभिप्रायांत दोन मुख्य आरोप केकावलीवर व सामान्यतः आमच्या मराठी कवितेवर केले आहेत. १ श्लेषमय व कृत्रिम रचना; व २ ज्याच्याविषयीं आदरयुक्त भीति बाळगावी अशा ईश्वराशीं अनिवार सलगी करणें. यांपैकीं पहिल्या आरोपाचें खंडन मालाकारांनीं ५२ व्या अंकांत केलें आहे व दुसऱ्या आरोपाचा समाचार त्यांनीं ५४ व्या अंकांत घेतला आहे. यापैकीं ५४ व्या अंकांतल्या मजकुराचें खंडन करण्याचा कांहीं प्रयत्न न करतां ‘ परंतु शास्त्रीबोवांना मोरोपंतांच्या मंडनांत माधवरावांच्या प्रार्थनासमाजाची झणझणीत हजेरी घेण्याचें कार्य साधावयाचें होतें. तें त्यांनीं साधलें ’ असें केवळ निंदाव्यंजक एक वाक्य लिहून रा. फाटकांनीं माधवरावांचा पक्ष बचावण्याचा यत्न केला आहे. काव्यांतील रससौंदर्याचें खरें ज्ञान ज्याला

आहे त्याला देवाशीं फाजील सलगी केल्याचा व त्यामुळें काव्यास निकृष्टपणा येत असल्याचा माधवरावांनीं जो आरोप केला आहे तो असमर्थनीय, इतकेंच नव्हे तर हास्यास्पद वाटेल. तेव्हां फाटक त्यावरच्या टीकेंतून माधवरावांचा बचाव करण्याच्या भानगडींत पडले नाहींत हें ठीकच आहे! आतां ५२ व्या अंकाकडे वळूं. या अंकांत मराठी कवितेवर, विशेषतः केकावलीवर, रानड्यांनीं ज्या उताऱ्यांत कृत्रिमतेचा व श्लेषमयतेचा दोषारोप केला आहे तो उतारा पहिल्या प्रथम दिलेला असून नंतर विल्सनसाहेबांचाही त्याच अभिप्रायाचा एक उतारा दाखल केला आहे. याप्रमाणें पूर्वपक्षाचा उपन्यास करून मग मालाकारांनीं उत्तरपक्ष करण्यास सुरवात केली आहे. त्यांत प्रथम रानड्यांचें खंडन करून नंतर विल्सनसाहेबांचें केलें आहे. मालाकारांनीं दाखल केलेल्या रानड्यांच्या उताऱ्यांतील मुद्द्याचीं वाक्यें (मालाकारांच्या भाषांतरासह) पुढीलप्रमाणें आहेतः—" But in works of art of our national poetry, like the one under consideration, it may be counted upon as a rule that the author did intend to be variously understood. This capacity of being diversely rendered is deemed to be a great merit and authors take very considerable pains to succeed in this line." "पण आमच्या देशांतील कवींचीं प्रस्तुतच्या सारखीं ('केकावली' सारखीं) जीं कृत्रिम काव्यें आहेत तीं वाचतांना हें आपलें नेहमीं लक्षांत ठेवावें कीं, कवींचा उद्देश केवळ एकच अर्थ आपल्या काव्यांतून निष्पन्न व्हावा असा नसायचाच, तर त्यांतून अनेक अर्थ निघावे अशाच बुद्धीनें तीं रचलेलीं! हा अनेकार्थसंभव म्हणजे कवितेचा मोठा गुण मानला असून एतद्देशीय कवींनीं तो साधण्याकरितां मोठी खटपट केलेली आढळते."

केकावलीवर व मराठी कवितेवर श्लेषमयतेचा आरोप ज्या उताऱ्यांत रानड्यांनीं मुख्यत्वेंकरून केला होता तो हाच उतारा होय; व याचेंच

खंडन मालाकारांनीं मुख्यतः केलें आहे. या उताऱ्यांत श्लेषमयतेचा अर्थात् कृत्रिमतेचा दोषारोप इतक्या उघड व धडधडीतपणें केला आहे कीं त्याविषयीं कांहीं एक संशय राहण्याजोगा नाहीं. मराठी कवितेवरील या कृत्रिमतेच्या व श्लेषमयतेच्या आरोपाला ५२ व्या अंकांत मालाकारांनीं प्रथम सविस्तर उत्तर दिलें आहे व शेवटीं मुख्य लेखाला उपोद्बलक असें एक रानड्यांचें वाक्य मालाकारांना आढळलें, तेंही त्यांनीं उद्धृत केलें आहे. हें वाक्य असें:—" As a work of art there is not another equal to it in the language " व त्याचा मालाकारांनीं केलेला अर्थ असा:—" चित्रकाव्याच्या दृष्टीनें पाहतां प्रस्तुत काव्याच्या तोडीचें महाराष्ट्रभाषेंत दुसरें कोणतेंही सांपडणार नाहीं. "

श्री० फाटक यांना जें घबाड सांपडल्यासारखें झालें आहे तें येथेंच. आपल्या हातांत एक अमोघ शक्ति आली असून तिनें आपण चिपळूणकरांना सहज चीत करूं असा भरंवसा त्यांना वाटूं लागला व त्या भरंवशाच्या बळावर त्यांनीं चिपळूणकरांवरील टींकेचा डोलारा उभारला आहे ! श्री० फाटकांचें म्हणणें असें आहे कीं, विष्णुशास्त्र्यांनीं work of art या शब्दांचें 'चित्रकाव्य' असें विपर्यासमूलक भाषांतर दिलें आहे. या एका मुद्द्याभोंवतीं त्यांनीं बरेंच वाक्तांडव केलें असून, "Art म्हणजे कृत्रिमता अशी समजूत करून घेतल्यामुळें त्यांस टीकेचा पसारा मांडतां आला. ही एकच समजूत त्यांच्या साहित्यशास्त्रविषयक ज्ञानाच्या भ्रमाचा भोपळा फोडून त्याचा निस्सीम पोकळपणा दाखविण्यास पुरेशी आहे... सन्मान्यांच्या मताचा विध्वंस करण्याची महत्त्वाकांक्षा ज्याच्या हृदयांत भडकली होती, त्यानें, माधवरावांनीं मोरोपंतांचें काव्य किंवा नवनीतांतलें एखादें आख्यान पाहिलें होतें कीं नाहीं, हा प्रश्न सोडविण्याच्या भरीस कां पडावें ? " "माधवरावांच्या मताची रेवडी उडविण्याकरितां धाकट्या चिपळूणकरांनीं लिहिलेल्या लेखांवरून विद्वत्ता, व्यासंग, चौकसपणा अथवा सत्यप्रियता यांपैकीं कोणत्याच गुणाची

प्रतीति येत नाहीं."—अशा तऱ्हेचा पुष्कळच भडिमार बिचाऱ्या चिपळूणकरांवर केला आहे.

येथें हें सांगितलें पाहिजे कीं, ‘ As a work of art there is not another egual to it in the language.’ या एकाच वाक्याला व ‘ work of art ’ या शब्दांना मुख्य कोटिक्रमाच्या दृष्टीनें फाटक भासवीत आहेत तितकें महत्त्व मुळींच नाहीं. वर सांगितलेंच आहे कीं, मालाकारांनीं हें वाक्य वर दाखल केलेल्या पहिल्या उताऱ्याला उपोद्बलक म्हणून आनुषंगिक रीतीनें शेवटीं दाखल केलें आहे. त्या वाक्याचें विष्णुशास्त्र्यांनीं दिलेलें भाषान्तर चुकलें असें जरी सिद्ध झालें तरी विष्णुशास्त्र्यांच्या मुख्य कोटिक्रमाला कांहीं बाध येत नाहीं. कारण श्लेषमूलक कृत्रिमतेचा आरोप रानडे आपल्या पहिल्याच लेखांत करून चुकले आहेत आणि त्या लेखाच्या अर्थाविषयीं मुळींच वाद नाहीं. तेव्हां त्या लेखांतील कृत्रिमतेचा आरोप व त्यावरील विष्णुशास्त्र्यांचें खंडन हीं अगदीं अढळ आहेत. केकावलीविषयीं व एकंदर मराठी कवितेविषयीं रावबहादुरांचीं मतें त्या काळीं ( सन १८६७ ) तरी निदान इतकीं कोतीं होतीं कीं, त्यांचे ते समज आजच्या काळीं हास्यास्पदच वाटतात. श्लेषयुक्ततेविषयीं तर त्यांचा कांहीं विलक्षणच आग्रह होता. मालाकार म्हणतातः—“ या दुटप्पी अर्थाविषयीं रावबहादुरांचा फार आग्रह दिसतो. असा अर्थ केकावलींत अवश्य असलाच पाहिजे, याविषयीं त्यांची पक्की खात्री असून रा० परशुरामपंत यांनीं तो दिला नाहीं, हा त्यांच्या ग्रंथाविषयीं त्यांचा ( रा० ब० चा ) काय तो मोठा मुद्दा आहे. ” तेव्हां असल्या विलक्षण दुर्ग्रहांचें विष्णुशास्त्री यांनीं जें खंडन केलें आहे तें आजही मान्य असून श्री० फाटकांनीं रानड्यांच्या मराठी वाचनाची जी स्तुति केली आहे किंवा विष्णुशास्त्र्यांच्या वर जो अनुचित हल्ला केला आहे त्यानें त्याला यत्किंचितही धक्का लागणें शक्य नाहीं.

आतां फाटकांच्या म्हणण्याप्रमाणें 'Work of art' याचा 'चित्रकाव्य' हा अर्थ प्रस्तुत वाक्यांत चुकीचा आहे कीं काय याचा विचार करूं. 'Art' याचा अर्थ सामान्यतः 'कला' असा होतो. अर्थात् 'Work of art' म्हणजे 'कलाकौशल्याचें काम' असा अर्थ केल्यास शोभेल. किंवा वाङ्‌मयी कृतीला उद्देशून हे शब्द लावले असल्यास 'कलाप्रधान ग्रंथ किंवा काव्य' असा त्यांचा अर्थ करावा लागेल. आतां 'कला' किंवा 'Art' याचा तरी खरोखर अर्थ काय, हें पाहूं गेल्यास या शब्दामध्यें कृत्रिमतेच्या कल्पनेचा नेहमींच थोडाबहुत अंतर्भाव होत असतो असें दिसून येईल. 'Art' म्हणजे Nature (सहजता) तर खास नव्हे. उलट 'Art' किंवा 'कला' हे शब्द 'Nature' किंवा 'सहजता' यांना विरोधी म्हणूनच नेहमीं वापरले जातात. 'कला' (Art) म्हणजे 'सुंदर वस्तूमध्यें दिसून येणारें मानवी रचनाकौशल्य' असें साधारणपणें म्हणतां येईल. अर्थात् कृत्रिमता त्यामध्यें थोडीबहुत अंतर्भूत असतेच. इंग्रजी कोशकारांनींही art चे अर्थ कौशल्याच्या कल्पनेपासून निवळ कृत्रिमतेपर्यंत पोचणारे असेच दिले आहेत. नुकत्याच आक्सफोर्ड येथें तयार झालेल्या इंग्रजी भाषेच्या मूर्धाभिषिक्त कोशांत art चे क्रमानें पुढील तीन अर्थ दिले आहेतः— (1) Skill as the result of knowledge and practice; (2) human skill; (3) artifice (कृत्रिमता). तेव्हां 'art' याचा अर्थ संदर्भानुसार 'कृत्रिमता' असाही होऊं शकेल, हें यावरून उघड होतें. आतां प्रस्तुत प्रकरणांतील संदर्भ पाहिला असतां तो 'कृत्रिमता' याच अर्थास निर्विवादपणें अनुकूल आहे असें दिसेल. ज्या केकावलि व इतर काव्यांना उद्देशून 'Work of art' हे शब्द रानड्यांनीं योजले आहेत तीं सर्व काव्यें श्लेषयुक्त अतएव कृत्रिम आहेत असा त्यांचा आग्रह आहे. But in works of art of our national poetry it may be counted upon as a rule that the author did intend to be variously understood. या वाक्यांत तर केलावली-

सारख्या त्यांच्या समजुतीनें कृत्रिम काव्यांनाच स्पष्ट Works of art असें म्हटलें आहे. तेव्हां अशा काव्यांना उद्देशून जेथें Works of art हे शब्द योजले आहेत तेथें त्यांचें भाषांतर ‘ चित्रकाव्य ’ असेंच करणें युक्त होय. शिवाय ‘ चित्रकाव्य ’ याचा अर्थही सर्वस्वीं ‘ कृत्रिम काव्य ’ असाच होतो असें फाटक मानतात तें खरें नव्हे. शब्दचमत्कृति किंवा अर्थचमत्कृति यांनीं युक्त असून ध्वनिरहित असलेलें तें चित्रकाव्य होय, असा साहित्यशास्त्रकारांचा आशय आहे. अर्थात् चित्रकाव्य म्हणजे चमत्कृतिपूर्ण किंवा कौशल्यपूर्ण घडणीचें काव्य असा अर्थ निष्पन्न होतो. तेव्हां ‘ Art ’ म्हणजे **कृत्रिमता** अशीही ( फाटकांनीं म्हटल्याप्रमाणें ) विष्णुशास्त्र्यांनीं समजूत करून घेतली नसून ‘Work of art’ याचें ‘ चित्रकाव्य ’ हें संदर्भानुकूल असेंच भाषांतर त्यांनीं केलें आहे हें दिसून येईल. असें करण्यानें विष्णुशास्त्र्यांच्या ‘ साहित्यशास्त्रविषयक ज्ञानाच्या भ्रमाचा भोपळा ’ मुळींच फुटण्याची भीति नसून तो फोडूं पाहणाऱ्याच्या ज्ञानाचा ‘ निस्सीम पोकळपणा ’ मात्र खासा दिसून येत आहे.

या वादविषयक वाक्याचें आणखी एका ठिकाणीं चिपळूणकरांनीं भाषांतर केलें आहे तेंही येथें अवश्य लक्षांत घेण्याजोगें आहे. फाटकांना बहुधा त्याचा उल्लेख करणें स्वतःच्या युक्तिवादास सोईचें वाटलें नसावें ! मालेच्या ५४ व्या अंकांत रानड्यांच्या केकावलीवरील अभिप्रायापैकीं देवाशीं अनिवार सलगी करण्याचा आरोप ज्यांत केलेला आहे तो सर्व भाग उतरून घेऊन त्याचें भाषांतर चिपळूणकरांनीं दिलें त्यांत ‘ As a work of art... ’ हें वाक्य शेवटीं आलें असून त्याचें भाषांतर चिपळूणकरांनीं येणेंप्रमाणें केलें आहे—“ काव्यरचनेच्या करामतीपुरताच विचार केला, तर याच्या तोडीचें काव्य महाराष्ट्र भाषेंत दुसरें नाहीं. ” येथील भाषांतर चुकीचें आहे किंवा कसें हें फाटकांनीं अवश्य सांगावयास पाहिजे होतें !

यानंतर चिपळूणरांनीं मालेंत एक दोन ठिकाणीं स्वतःच्या वाचनास अनुलक्षून जो प्रांजलपणाचा मजकूर लिहिला आहे त्याच्या आधारावर चिपळूणकरांच्या विद्वत्तेविषयीं थोडी जास्त चर्चा करण्याचा आव श्री. फाटक यांनीं घातला असून रानड्यांच्या व चिपळूणकरांच्या विद्वत्ते-मधील तफावत दाखविण्याचा यत्न केला आहे. हा सर्व मजकूर अत्यंत अप्रासंगिक, अप्रयोजक व रानड्यांच्या चरित्रकाराच्या ठायीं कधींही असूं नये अशा मनोवृत्तीचें प्रदर्शन करणारा झाला आहे. सामान्य सुशिक्षितांच्या मानानें चिपळूणकरांनीं केलेलें वाचन व संपादिलेली विद्वत्ता जरी केवळ अलौकिक होती तरी रानड्यांशीं तुलना करतांही त्यांचें वाचन जास्त विस्तृत ठरलें असतें असें कोणीच म्हणत नाहीं. मग रानड्यांशीं तुलना करण्याचा आव घालून फाटकांनीं काय मिळाविलें हें त्यांचें त्यांसच माहीत ! वाचन अफाट नसलें तरी चिपळूणकरांच्या ठायीं अलौकिक रसिकता वसत होती. त्यांची बुद्धि अतिशय मार्मिक असून वर्ण्य विषयाशीं समरस होऊन जाऊन त्याचें हार्द तेव्हांच ग्रहण करण्याची त्यांची शक्ति अवर्णनीय होती. तसेंच समरसतेनें विषयाचें ग्रहण केल्यावर त्याचें अत्यंत रसाळ व परिणामकारक वाणीनें वर्णन करण्याचीही त्यांची हातोटी निरुपम होती. टेंपेस्ट नाटक आपण वाचलेलें नाहीं असें चिपळू-णकरांनीं स्वतःच कबूल केलें आहे. परंतु असें असतांही त्या नाटकाच्या मराठी भाषांतराचें जें त्यांनीं परीक्षण केलें आहे तें किती तरी मार्मिक झालें आहे. मूळ पुस्तक समग्र वाचलें नसतांही त्याच्या भाषांतरावर इतका सुंदर व यथार्थ अभिप्राय देण्याचें हें चिपळूणकरांचें कौशल्य कोणीकडे व चारचारदां केकावलीसारखें काव्य वाचूनही त्याच्या श्लेष-मयतेविषयीं व देवाशीं फाजील सलगी करण्याविषयीं विचित्र व अयथार्थ मतांचें प्रतिपादन करणें ही अभ्यासजडता कोणीकडे !

प्रस्तुत लेखकाच्या मनांत रानड्यांच्या विषयीं निरतिशय पूज्यभाव

जागृत आहे. श्री० फाटकांनीं हा विषय मुद्दाम उकरून काढला नसता तर रानड्यांच्या विषयीं अशा तऱ्हेनें लिहिण्याचें त्याच्या मनांत देखील आलें नसतें. परंतु मराठी कवितेवर रानड्यांनीं जेव्हां मिनिट लिहिलीं तेव्हांचे त्यांचे विचार आणि मतें पाहिलीं तर त्यांच्या दूषित ग्रहांचा व अभ्यासजडत्वाचाच त्यांत प्रत्यय येतो, असें म्हणणें भाग पडतें. १८६७ सालींच त्यांनीं सबंध मराठी वाङ्मयाच्या स्थितीवर मिनिट लिहिलें आहे. त्यांत ते म्हणतात:—There can be no mistake that to any one who looks at it from a stranger's standpoint our existing literature will appear for the most part either superstitious or childish. Many centuries of earnest efforts are needed before this reproach can be washed away. 'आमचें आजपर्यंतचें वाङ्मय वेडगळ भ्रमांनीं भरलेलें व पोरकट आहे. शेंकडों वर्षें आपण अगदीं मनापासून प्रयत्न केले तरच हा डाग ( वाङ्मयाच्या नालायकीचा ) धुऊन टाकतां येणें शक्य आहे.' ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकारामादि साधुसंतांच्या जिवंत वाणीनें व दिव्य काव्यामृतानें भरलेल्या आमच्या वाङ्मयाविषयीं परिपक्व व समतोल विचारांच्या रानड्यांनीं काढलेले हे उद्गार आहेत ! सर्व मराठी वाङ्मयाविषयीं जो हा रानड्यांनीं अभिप्राय दिलेला आहे, त्यालाच साजेसा त्यांचा केकावलीवरील अभिप्राय आहे. सर्व वाङ्मय जेथें वेडगळ, भ्रामक व पोरकट तेथें केकावलि हें अत्यंत कृत्रिम व देवाशीं अप्रशस्त सलगी करणारें काव्य ठरणार, हें ओघानेंच येतें ! असल्या दुर्ग्रहांचें विष्णुशास्त्र्यांनीं खंडन केलें, तेव्हांपासून ते पुनः डोकें वर काढणार नाहींत अशी व्यवस्था झाली. परंतु अजूनही श्री० फाटकांसारखे कित्येक लेखक शिळ्या कढीला ऊत आणण्याचा प्रयत्न करीत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. वर सांगितल्याप्रमाणें विष्णु-

शास्त्र्यांना मनसोक्त पुष्पांजळी वाहून फाटक शेवटीं कृत्रिम समाधानाच्या स्वरानें म्हणतातः—" परंतु दिवसानुदिवस विद्वानांचें मताधिक्य या बाबतींत माधवरावांच्या बाजूस झुकत असल्याचें सिद्ध होत चाललें आहे. " येथें फाटकांनीं आपल्या हेत्वाभासाच्या मंदिरावर खरोखर कळसच चढविला आहे असें म्हणणें भाग येतें. 'आमचें वाङ्मय पोरकट व वेडगळ समजुतींनीं भरलेलें, आमच्या राष्ट्रांतील कविता बहुतेक सर्व श्लेषमय व कृत्रिम आहेत. आणि त्यांतलें चांगलें म्हणून नांवाजलेलें मोरोपंतांचें केकावलि काव्य तर देवाशीं अप्रशस्त सलगी केल्यामुळें उच्च दर्जाच्या वाचकांना मान्य होण्यास अगदीं अपात्र होय'. हीं सर्व रानड्यांचीं मतें अलीकडच्या विद्वानांना मान्य होत चाललीं आहेत असें फाटकांचें खरोखरीच म्हणणें आहे काय ? हीं मतें मान्य असणारे हे अजब विद्वान् कोण आहेत, त्यांना नांवनिशीवार अवगुण्ठनांतून बाहेर काढावें अशी आमची श्री० फाटक यांना सप्रेम विनंती आहे. म्हणजे चिपळूणकरांसारख्या ' सन्मान्यांच्या मतांचा विध्वंस करणाऱ्या ' ' लघुमनस्क ' माणसांचें म्हणणें खरें मानून मराठी वाङ्मयाविषयीं अभिमान बाळगणाऱ्या खुळसट लोकांना या ' मताधिक्य ' वाल्या विद्वानांच्या पायाशीं बसून खऱ्या मतांची समजूत घेण्यास बरें पडेल.

प्रतिपक्षाविषयीं अनुदार टीकेचा हा जो मासला रा० फाटक यांनीं दाखविला आहे त्याचें परीक्षण येथवर केलें तें बस्स झालें. आणखी एकदोन ठिकाणीं मालाकारांचा फाटकांनीं उल्लेख केला आहे; परंतु विशेष चर्चा करण्याजोगतें त्यांत महत्त्व नाहीं.

श्री. फाटक यांनीं रानड्यांच्या कैवारानें चिपळूणकरांवर केलेली टीका कशी चुकीची व भ्रमोत्पादक आहे हें येथवर दाखविलें. चिपळूणकरांनीं रानड्यांवर केलेल्या टीकेंतील मुद्दे घेऊन सरळपणानें फाटकांनीं त्यांचें खंडन केलें असतें तर त्यांजवर अनुदारपणाचा आरोप कोणी केला नसता. मतभेदास्तव दुसऱ्यावर टीका करणें हा प्रत्येकाचा जन्म-

सिद्ध हक्कच आहे. परंतु टीका करितांना फाटकांनीं जी हातचलाखी केली आहे व चिपळूणकरांवर जो भयंकर आरोप केला आहे त्यामुळें त्यांची टीका हीन दर्जाची व निषेधार्ह झाली आहे असें म्हणणें भाग पडतें. त्यांनीं हातचलाखी जी केली आहे तिचें स्वरूप वर उघड केलेंच आहे. तें असें कीं, चिपळूणकरांच्या टीकेंतील मुख्य अंश व महत्त्वाचे मुद्दे बाजूस ठेवून मूळ मुद्द्यांना थोडीशी पुष्टि देण्याकरितां म्हणून चिपळूणकरांनीं ज्या एक दोन गोष्टी आपल्या विवेचनाच्या शेवटीं उद्धृत केल्या आहेत त्यांचें खंडन करण्याचा प्रयत्न करून चिपळूणकरांच्या सर्व युक्तिवादाचें खंडन केल्याचा आभास मात्र त्यांनीं उत्पन्न केला आहे. रानड्यांवरील टीका मालेच्या ५२ व ५४,५५ या अंकांत आलेली आहे. पैकीं ५४,५५ अंकांतील टीकेला अनुलक्षून, 'माधवरावांच्या प्रार्थनासमाजाची झणझणीत हजेरी घेण्याचें कार्य ( चिपळूणकरांना ) साधावयाचें होतें,' येवढ्या एका निंदागर्भ वाक्याखेरीज त्यांनीं कांहींही लिहिलें नाहीं. प्रार्थनासमाजीय मतांची हजेरी घेण्याचा चिपळूणकरांचा हेतु होता असें जरी वादाकरितां मान्य केलें तरी तेवढ्यामुळेंच चिपळूणकरांची टीका व्यर्थ किंवा खोटी कशी ठरते ? माधवरावांनीं केकावलि काव्यावर मत देतांना आपलीं प्रार्थनासमाजीय मतें अभिप्रायांत घुसडून देण्यास जर मागें पुढें पाहिलें नाहीं, तर चिपळूणकरांनीं त्याचें खंडन करितांना समाजीय मतांची हजेरी घेतली यांत गैर तें काय झालें ? त्याशिवाय त्यांना माधवरावांचें खंडण करितांच आलें नसतें. फाटकांनीं मात्र चिपळूणकरांच्या प्रतिपादनाचें एका अक्षरानेंही खंडन न करितां या वाक्याच्या योगानेंच चिपळूणकरांच्या टीकेचें खंडन केल्याचा आभास उत्पन्न केला आहे व धूलिप्रक्षेपाचें आपलें कार्य साधून घेतलें आहे. बावन्नाव्या अंकांतील टीकेच्या बाबतींतही त्यांनीं अशीच हातचलाखी केली आहे. त्यांत रानड्यांच्या, केकावलीवर स्पष्ट शब्दांत श्लेषमयतेचा आरोप करणाऱ्या उताऱ्याचें खंडन चिपळूणकरांनीं मुख्यत्वें-

करून केलें असतां त्याविषयीं फाटक अगदीं मूग गिळून बसले आहेत. आणि Work of art चें भाषांतर व अष्टोत्तरशतरामायणें रानड्यांनीं पाहिलीं नसल्याबद्दलचा उल्लेख, या दोन आनुषंगिक गोष्टींवरच आपलें शरसंधान करून 'जितं मया' असा त्यांनीं आव आणिला आहे! बावन्नावा अंक नुसता वरवर जरी चाळून पाहिला तरी कोणाच्याही लक्षांत येईल कीं रानड्यांच्या श्लेषमयतेच्या आरोपावरील चिपळूणकरांची टीका ५-५॥ पानें असून उपर्युक्त दोन गोष्टींसंबंधाचा मजकूर, टीपा धरून, अवघा १॥ पान भरेल इतका आहे. असें असतांही 'Art म्हणजे कृत्रिमता अशी समजूत करून घेतल्यामुळेंच त्यांस **टीकेचा पसारा** मांडतां आला;' 'अखेरपर्यंत या विधानाच्या भुसभुशीत पायावरच **आपल्या टीकेची इमारत रचीत नेली आहे**'—अशी वाचकांचा हमखास गैरसमज करून देणारीं वाक्यें त्यांनीं बेधडक लिहिलीं आहेत! रानड्यांच्या चरित्राचा वाचक त्यांतील खंडनपर मजकूर यथार्थ आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां मुद्दाम निबंधमाला उघडून थोडाच पाहावयास बसला आहे! वाचकांची विश्रब्ध वृत्ति हीच अशा लेखकांची प्राणधारक चिच्छक्ति होय.

या संबंधानें लिहितांना 'सन्मान्यांच्या मतांचा विध्वंस करण्याची महत्त्वाकांक्षा ज्याच्या हृद्यांत भडकली होती' इत्यादि मजकूर लिहून फाटकांनीं चिपळूणकरांवर एक भयंकर आरोप केला आहे. माधवरावांसारख्या बड्या सन्मान्य गृहस्थांच्या मतांचें देखील आपण खंडन करितों, असा मोठेपणा मिरविण्याकरितां त्यांनीं हा मजकूर लिहिला असा फाटकांच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे. असाच आरोप इतर कित्येक टीकाकारांनींही चिपळूणकरांवर, विशेषतः याच लेखास अनुलक्षून, केला आहे. 'मोरोपंताची कविता' याच लेखांत चिपळूणकरांनीं आपल्या वडिलांस अनुलक्षून थोडासा मजकूर लिहिला आहे, त्याबद्दलही 'आपल्या वडिलांवरही टीका करावयास आपण भीत नाहीं अशी ऐट मिरविण्याकरितां

चिपळूणकरांनीं हें लिहिलें ' असें एका टीकाकारानें कुत्सितपणाचें विधान केलें आहे. परंतु या सर्व आरोपांमध्यें कांहीं एक तथ्य नाहीं. चिपळूणकरांनीं केलेली टीका यथार्थ आहे कीं नाहीं तें पहा. सरळपणानें त्या टीकेला तोंड न देतां तिला नानातऱ्हेचे अश्लाघ्य हेतु चिकटवीत बसणें म्हणजे आपल्या दुबळ्या चिरचिरेपणाचें प्रदर्शन करणें होय. असे हेतु चिकटविणाऱ्यांनीं आपल्या म्हणण्याच्या सिद्ध्यर्थ पुरावा कांहींच दिलेला नाहीं. त्यांना देवासमान पूज्य व प्रमादरहित वाटणाऱ्या व्यक्तींवरही चिपळूणकरांनीं टीका केली; तेव्हां ती दुष्ट हेतूंनीं केली असलीच पाहिजे, ही त्यांची अनुमानपद्धति ! ह्या अनुमानपद्धतीनें आणि ती वाचकांच्या गळीं उतरविण्याकरितां कराव्या लागलेल्या धूळफेकीनें कांहीं थोडे वाचक थोडा काळ फसले तरी सरते शेवटीं हें सर्व प्रकरण अंगलट आल्या-खेरीज राहत नाहीं हें त्यांस समजेल तो सुदिन !

स्वतःस समतोल व विचारी समजणाऱ्या कांहीं थोड्या लोकांमध्यें, चिपळूणकरांनीं केलेली टीका चुकीची, अतिशयोक्तिपूर्ण, मोठमोठ्या लोकांवर विनाकारण घसरा करणारी आहे अशी मानण्याची आजकाल एक फॅशनच पडून गेली आहे. भाषेच्या चमचमाटाखालीं चिपळूणकरांनीं असत्य गोष्टी दडपून दिल्या आहेत, भ्रामक युक्तिवाद साजरे करून दाखविले आहेत, असें मानण्यानें स्वतःची सत्यप्रियता सार्थकीं लागली असें हे लोक समजतात. अशा लोकांपैकीं कोणीही चिपळूणकरांनीं रानड्यांवर केलेली टीका एकंदरीने चुकीची अगर अतिशयोक्तिपूर्ण आहे, असें कोणत्याही निःपक्षपाती काव्यमर्मज्ञासमोर सिद्ध करून द्यावें, असें आह्वान निबंधमालेचा कोणताही सत्यान्वेषी वाचक मोठ्या विश्वासानें देऊं शकेल. अपलाप, छपवाछपवी, दुष्ट हेतूंचा आरोप या गोष्टी आतां पुरे झाल्या. आक्षेपकांना आपल्या मतांची चाड असेल तर त्यांनीं सरळपणानें आपलें म्हणणें शाबीत करण्यास सिद्ध झालें पाहिजे. श्री. फाटकांनीं असा सरळपणाचा मार्ग स्वीकारिलेला नाहीं म्हणून

त्यांचें लेखन पाहून मन विषण्ण होतें. रानड्यांसारख्या धीरप्रशांत, समदृष्टीच्या महापुरुषास असा कलुषित दृष्टीचा चरित्रलेखक मिळावा ही दुर्भाग्याची गोष्ट होय. आजच्या घटकेस रानड्यांचा चरित्रलेखक कांहीं तरी खुसपटें काढून चिपळूणकरांवर प्रहार करण्यांत आनंद मानतो. परंतु चिपळूणकरांनीं त्यांच्यावर आजन्म टीका केली असतां रानड्यांनीं त्यांच्याविरुद्ध तोंटावाटे एक ब्र देखील काढला नाहीं, इतकेंच नव्हे तर चिपळूणकरांची योग्यता ते पूर्णपणें जाणून होते, ही गोष्ट लक्षांत ठेवण्याची त्यास आवश्यकता वाटत नाहीं. विष्णुशास्त्र्यांची निधनवार्ता ऐकतांच माधवरावजींची कशी शोकविह्वल स्थिति झाली याबद्दलची आठवण एका गृहस्थानें पुढीलप्रमाणें लिहून ठेवली आहे. " ती सकाळची वेळ होती. मुंबईस आंग्र्यांचे वाडींत माधवराव खुर्चीवर बसून श्मश्रु करवीत होते व भोंवतालीं मित्रमंडळी गोष्टी बोलत वेत्रासनावर बसली होती...इतक्यांत पुण्याहून रात्रीचे गाडीनें आलेला एक गृहस्थ तेथें अवचित आला, व त्यानें शास्त्रीबुवांची निधनवार्ता सांगितली ! त्याबरोबर बसलेल्या मंडळीस एकदम धक्का बसल्यासारखें झालें ! सर्वांचीं मुखें ग्लान झालीं !—माधवरावजींच्या नेत्रांतून टपटप अश्रुबिंदु पडले ! तें मला पक्कें स्मरत आहे ! त्यांच्या मुखांतून जो पहिलाच उद्गार निघाला तो हा—' He had no business to die so soon.' ( सुधारक, ता. २५ फेब्रुवारी १९०१ ). " ही माधवरावजींची अलौकिक गुणग्राहकता आणि अंतःकरणवृत्ति ज्याप्रमाणें प्रसंगानें प्रकट झाली, त्याप्रमाणें विष्णुशास्त्र्यांनींही त्यांजविषयीं आदरोद्गार अनेक ठिकाणीं काढले असून एका खासगी पत्रांत रानड्यांची योग्यता " The first man of the age " अशा सार्थ शब्दांनीं वर्णन करून आपल्या मनाचें लोकोत्तर औदार्य प्रकट केलें आहे हें प्रसिद्ध आहे. इतर अनेक मंडळींवर केलेल्या टीकेच्या

मानानें रानड्यांवर टीका करतांना विष्णुशास्त्र्यांची लेखणी योग्य मर्यादा व आदर राखूनच चालत असे ही गोष्टही निबंधमालेच्या मार्मिक वाचकांच्या सहज लक्षांत येण्याजोगी आहे. एकमेकांचा आयुष्यक्रम अगदीं विरुद्ध दिशांनीं चालला असतां त्या उदारधी पुरुषांनीं परस्परांची योग्यता पूर्णपणें ओळखलेली होती, तर आज चाळीस वर्षांमागून येणाऱ्या चरित्रकारास दोघांचीही योग्यता लक्षांत ठेवून दोघांविषयीं आदरभाव दाखवितां येऊं नये काय ?

गुणग्राही व उदारमनस्क लेखकाला रानड्यांनीं व विष्णुशास्त्र्यांनीं एकमेकांविषयीं काढलेले हे उद्गार रानड्यांच्या चरित्रांत देतां आले असते. मालाकारांनीं मालेंत केलेल्या टीकेचा उल्लेख करून त्याच्यावर पानेंच्या पानें खरडणें किंवा त्यांच्या विद्वत्तेविषयीं चर्चा करण्याच्या मिषानें निंदेची लालसा पुरवून घेणें यापेक्षां परस्परांनीं परस्परांविषयीं काढलेल्या या गौरवपूर्ण उद्गारांचा रानड्यांच्या चरित्राशीं किती तरी अधिक संबंध आहे ! परंतु ज्यांत चुकूनसुद्धां विष्णुशास्त्र्यांविषयीं बरे शब्द येतील अशा हकीकतीचा फाटकांनीं उल्लेख कसा करावा ?

प्रत्यक्ष नामोल्लेख करून रानडे यांच्यावर चिपळूणकरांनीं आणखी एकाच प्रसंगानें टीका केलेली दृष्टीस पडते. ती टीका निबंधमालेंत आलेली नसल्यानें लोकांच्या लक्षांत सध्यां वागत असलेली दिसत नाहीं. श्री. फाटकांनींही रानडे चरित्रांत तिचा उल्लेख केलेला नाहीं. निःपक्षपाती चरित्रकारानें खरोखर तिचा उल्लेख केला असता; कारण सध्यांच्या काळांत अत्यंत उपयुक्त व आवश्यक अशा बोधाची तिजपासून प्राप्ति झाली असती. ज्या विषयाला अनुलक्षून चिपळूणकरांनीं ही टीका केली त्याचा उल्लेख फाटकांनीं केला नाहीं असेंही नाहीं. तो करूनही त्यावरील चिपळूणकरांच्या अत्यंत मार्मिक, बोधप्रद, अनुभवसिद्ध व प्रसंगोचित टीकेचा उल्लेख करण्याचें मात्र त्यांनीं टाळलें आहे !

फाटकांनीं टीकेचा उल्लेख कां केला नाहीं याचें कारण त्यांसच माहीत ! परंतु कोणत्याही प्रकारची टाळाटाळी करण्याचें आपणांस कांहींच कारण नसल्यानें आपण टीकाविषयीभूत प्रसंग व त्यावरील चिपळूणकरांची टीका यांची थोडक्यांत माहिती करून घेऊं. माधवराव रानडे व गोपाळराव हरि देशमुख या जोडीनें मिळून 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' नांवाची एक संस्था १८७८ च्या प्रारंभीं काढली. दोन तीन वर्षें कसें तरी संस्थेचें काम रेटल्यावर १८८१ सालाच्या प्रारंभीं तिच्या एकंदर कारभाराची हकीकत रावबहादूरद्वयानें जाहीर सभा भरवून लोकांस निवेदन केली. संस्थेच्या या त्रैवार्षिक वृत्तांतावरून जे विचार सुचले ते सर्व खुलासेवार रीतीनें केसरी पत्रामधून लहान लहान नऊ लेखांमधून चिपळूणकरांनीं निवेदन केले आहेत. ही लेखमाला मार्मिक असून आपल्यांतील लेखक, प्रकाशक व वाङ्मयाच्या उजागरी-साठीं परिश्रम करणाऱ्या व्यक्ति व संस्था यांस आजही अतिशय बोध-प्रद वाटेल अशी आहे. चिपळूणकरांचें मनुष्यस्वभावाचें मार्मिक ज्ञान, व्यावहारिक दृष्टि व कार्यकुशलता यांचा या लेखमालेवरून उत्कृष्ट प्रत्यय येतो व बड्या रावबहादुरांच्या नांवाखालीं चाललेल्या कार्यांमध्यें कित्येक वेळां केवढा सावळा गोंधळ माजलेला असतो याचें ज्ञान होऊन क्षणभर मोठी मौज वाटते.

'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी'ची तीन वर्षांतच इतकी दुर्दशा झाली कीं, ती बंद करावी कीं काय, असा प्रश्न तिच्या चालकांच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. मंडळीला ही निकृष्टावस्था प्राप्त होण्यास काय कारणें झालीं याचें चिपळूणकरांनीं विवेचन केलें आहे. त्यांत पहिली गोष्ट त्यांनीं ही दाखवून दिली कीं मंडळीच्या व्यवहाराचे नियम जे तिच्या चालकांनीं ठरविले ते इतके भोपळसुती व अव्यवहार्य होते कीं तशा नियमांच्या आधारावर कारभार चालविणें कृतयुगांत किंवा रामराज्यां-तही अशक्य व्हावें. बरें, नियम केलेले कसेही असोत, त्यांची अंमल-

बजावणी तरी नीट व्हावी ? तर तेंही नाहीं. मंडळीचा वर्गणीदार होणाऱ्यानें वर्षाचा आकार पांच रुपये भरावा असा नियम केला. परंतु ज्या आठशें लोकांनीं वर्गणीदार म्हणून नांवें नोंदविलीं त्यांपैकीं पहिल्या वर्षीं शेंकडा दहा जणांकडून, दुसऱ्या वर्षी पांचांकडून व तिसऱ्या वर्षीं तर एकाकडून वर्गणी आली ! "तेव्हां अशा खोगीर-भरतीच्या आश्रयदात्यांवर भिस्त ठेवून, 'वाऱ्यावर वरात व भुशावर चिठ्ठी' असा जो प्रकार आमच्या दोघां रावबहादुरांनीं केला, तो त्यांजकडून मोठा प्रमाद घडला," असें म्हटल्यावाचून चिप-ळूणकरांस राहवलें नाहीं. बरें मंडळीचें काम करण्यास कारभारी नेमला तो तरी नीट असावा. तोही अप्रामाणिक निघाला ! तेव्हां दोघां रावबहादुरांनीं मोठ्या आशेनें सुरू केलेलें हें कार्य सर्वच बाजूंनीं असें पेचांत सापडलें कीं ज्याचें नांव तें !

रावबहादुरांच्या कार्य करण्याच्या पद्धतीचा हा बहारीचा देखावा पुढें असतांही चिपळूणकरांनीं त्याचा फारसा उपहास न करतां हें कार्य कसें सुधारावें याविषयीं आपण होऊन अत्यंत उपयुक्त अशा विधायक सूचना केल्या आहेत. वाङ्मयाचें कोणतेंही कार्य म्हटलें कीं तें त्यांस जिवाहूनही प्यारें वाटे; तें उजागराला यावें ही त्यांची अंतःकरणांतील तळमळ त्यांस स्वस्थ बसूं देईना. संस्थेच्या व्यवहाराचे भोपळसुती नियम काढून टाकून चांगले खंबीर नियम केले पाहिजेत, वगैरे गोष्टी तर उघड उघड दिसतच होत्या. परंतु चिपळूणकरांनीं दोन तीन विशिष्ट सूचना रावबहादुरांस केल्या आहेत त्यावरून त्यांची मार्मिकता व कार्यकुशलता दिसून येते. त्यांची पहिली सूचना अशी कीं, 'वाग्देवतेचें कोमल स्वरूप ज्यांत प्रकट झालें असतें असे जे काव्यनाटकादि मनो-रंजक ग्रंथ त्यांचा तिरस्कार मंडळीनें बिलकुल करितां उपयोगी नाहीं.' मंडळीनें अशा ग्रंथांस मज्जाव ठेवला होता. तें त्यांचें करणें रास्त नव्हतें हें उघडच आहे. त्याचप्रमाणें जुन्या ग्रंथांचा व मासिकांतील दुर्मिळ

झालेल्या लेखांचा जीर्णोद्धार करण्याविषयींही त्यांनीं मंडळीला आग्रहाची सूचना केली आहे. तिसरी महत्त्वाची गोष्ट चिपळूणकरांनीं सुचविली ती ही कीं वर्गणीदारांच्या वर्गणीवरच विसंबून न राहतां या कामासाठीं कोठून तरी भरभक्कम पैसा चालकांनीं जमवावा. त्याशिवाय हें कार्य निभणार नाहीं. सरकारांत अर्ज करून त्यांजकडून ग्रांट मिळवावी; तें न जमल्यास लोकांकडून कसोशीनें देणगीच्या रूपानें रकम जमा करावी; अगर तेंही न जुळल्यास कांहीं काल तरी **स्वतः घस सोसून काम चालवून दाखवावें.** ह्या सूचना केवळ 'ग्रंथोत्तेजक मंडळी' संबंधाच्या झाल्या. याशिवाय प्रस्तुत लेखांत मधून मधून चिपळूणकरांनीं वाङ्मयव्यवहाराविषयीं सामान्यतः जे विचार प्रदर्शित केले आहेत ते फार मार्मिक असून सध्याच्या काळींही वाचण्याजोगे आहेत हें वर सांगितलेंच आहे. असो.

चिपळूणकरांनीं सूचना केल्या त्या रावबहादुरांच्या दृष्टिपथावर अर्थात् गेल्या असतीलच. त्यांचा त्यांच्या मनावर परिणाम कितपत झाला हें निश्चित समजण्यास मार्ग नाहीं. परंतु 'ग्रंथोत्तेजक मंडळी' पुढें लवकरच नामशेष झाली, यावरून रावबहादुरांकडून त्या सूचनांचा अव्हेर झाला असावा असेंच बळकट अनुमान होतें.

रानड्यांच्या वर चिपळूणकरांनीं ज्या दोन प्रसंगांनीं टीका केली त्यांची हकीकत येणेंप्रमाणें आहे. क्वचित् आलेलें एखादें अतिशयोक्तीचें अगर विनोदाचें विधान वगळलें तर या दोन्ही प्रसंगीं चिपळूणकरांचेंच म्हणणें बरोबर होतें व रानडे यांचे उद्गार व कृत्यें प्रमादग्रस्त होतीं हें कोणाही प्रांजळ मनाच्या निरीक्षकास कबूल करावें लागेल. एकेश्वरी मताच्या कसोटीवर केकावलीला घासून पाहण्याची कल्पना किंवा आठशें गृहस्थांच्या कोरड्या सह्यांच्या आधारावर वाङ्मयप्रसार करूं पाहण्याची कल्पना ह्या दोन्ही सारख्याच अकुशलतेच्या द्योतक होत. फाटकांसारखे अनन्यभक्त वगळले तर इतर कोणीही रानड्यांच्या

ह्या उक्तिकृतींचें समर्थन करण्यास सरसावेल असें वाटत नाहीं! हीं उदाहरणें धडधडीत डोळ्यांपुढें दिसत असूनही चिपळूणकर हे विकार-वश, वृथा निंदा करणारे, टवाळखोर लेखक, असें ज्यांस म्हणावयाचें असेल त्यांचें तोंड कोण धरूं शकेल ?

जगामध्यें प्रमादराहित्याचा चांद कोणाही व्यक्तीस मिळालेला नाहीं. कांहीं अनन्यभक्तांनीं रानड्यांना सर्वज्ञतेच्या, सर्वगुणसंपन्नतेच्या व प्रमादराहित्याच्या पदवीवर अधिष्ठित करण्याचा प्रयत्न केलेला असला तरी त्यामुळें इतरांनीं बिचकून थबकण्याचें कांहींच कारण नाहीं. योग्य विचार न केल्यामुळें व कार्यव्यापृतत्वामुळें दुर्लक्ष झाल्याकारणानें त्यांस एक साधी वाङ्मयसंस्था नीट रीतीनें चालवितां आली नाहीं, हा निष्कर्ष 'ग्रंथोत्तेजक मंडळी'च्या वरील हकीकतीवरून सहज निघत असलेला दिसतो. परभारें युक्ति, मसलत किंवा विचार सांगणें हें निराळें आणि स्वतःच्या जबाबदारीवर संस्था काढून ती यशस्वी करून दाखविणें निराळें. ही दुसऱ्या प्रकारची कामगिरी रानड्यांच्या हातून फारशी झाली नाहीं असें त्यांच्या आयुष्याचें अवलोकन करतां दिसून येतें. प्रत्यक्ष जबाबदारी स्वतःवर न घेतां स्वतःच्या उपदेशाचा व मसलतीचा फायदा त्यांनीं अनेक संस्थांना दिला. याच्या उलट चिपळूणकरांनीं जीं जीं कार्यें केलीं अगर आरंभिलीं तीं पूर्णपणें स्वतःच्या हिंमतीवर व जबाबदारीवर. उपर्युक्त लेखांतही, "आमच्या देशांत सध्यां अशी स्थिति आहे कीं, कोणास जर कांहीं उद्योग करणें असेल, तर तो त्यानें, आपल्या अंगमेहनतीनें किंवा स्वतःच्या पैशाच्या जोरावर, जेवढा होईल तेवढाच करावा," असा अनुभवसिद्ध उपदेश त्यांनीं मोठ्या आग्रहानें केला आहे. त्यांच्या लहानशा आयुष्यांत, त्यांनीं स्थापिलेल्या अनेक संस्थांमध्यें त्यांच्या कार्यकुशलतेची कसोटी पाहण्याजोगे आणी-बाणीचे प्रसंग फारसे आले नाहींत, हें खरें. तथापि कार्यमालिका सुरू करितांना त्यांनीं जी योजकता दाखविली व तीन चार वर्षांच्या

काळांत स्वतःच्या संस्थांना त्यांनीं जें भरभराटीचें स्वरूप आणिलें त्यावरून अव्वल दर्जाची कार्यकुशलता त्यांच्या अंगीं वसत होती असें सहज अनुमान होतें. ज्या ज्या संस्थांशीं त्यांचें नांव संस्थापक या नात्यानें निगडित झालें आहे त्या एकूण एक आजवर एकसारख्या भरभराटींत आहेत, कोणाचेंही पाऊल मागें म्हणून नाहीं, ही एक बाब कांहींशी योगायोगाची असली तरी अत्यंत संतोषकारक म्हणून येथें नमूद केल्याखेरीज राहवत नाहीं.



## ४

# आधुनिक धर्मपंथ व चिपळूणकर

परंपरागत हिंदुधर्म नकोसा झाल्यामुळें जे नवीन धर्मपंथ निरनिराळ्या प्रवृत्तींच्या लोकांनीं एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सुरू केले त्यांचें व चिपळूणकरांचें विळ्याभोपळ्याइतकें उजू होतें हें सुप्रसिद्धच आहे. या धर्मपंथांवर बहुधा जेथें संधि सापडेल तेथें चिपळूणकरांनीं उपहासामिश्रित टीका केलेली आहे आणि त्यायोगानें आपल्या आक्षेपकांना त्यांनीं हें एक निरंतरचेंच खाद्य पुरविलें आहे. चिपळूणकरांची टीका नेहमींच उपहास, विनोद, व्याजोक्ति, यांनीं मिश्रित असल्यामुळें तिच्या मधील युक्तिवादाकडे सामान्य वाचकाचें दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. याचा फायदा घेऊन आक्षेपकांना त्यांच्या टीकेविरुद्ध सहज काहूर उठवितां येतें; आणि वरवर दृष्टिक्षेप करणाऱ्या वाचकांना, चिपळूणकरांनीं ज्या अर्थी उपहासावरच पुष्कळसें काम भागविलें आहे त्या अर्थी त्यांच्या टीकेंत खरोखरच फारसें तथ्य नसावें असें वाटूं लागतें. अशा रीतीनें ज्या टीकापद्धतीनें चिपळूणकरांना त्यांच्या स्वतःच्या काळीं अपूर्व यश मिळवून दिलें तीच टीकापद्धति आतां एका परीनें त्यांना बाधक होईल कीं काय अशी शंका येऊं लागली आहे. यास्तव या वादांतील मुद्द्यांचें एकदां स्पष्ट विवरण करून सत्य कोणाच्या बाजूस कितपत झुकतें आहे याचा अंदाज घेणें अवश्य झालें आहे.

या नूतन धर्मपंथांपैकीं आर्यसमाजाविषयीं येथें फारसें लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. प्रस्तुत पुस्तकांतील पूर्वगामी प्रबंधांत ( पृ. ८८,८९ ) या संबंधानें जें विवेचन केलें आहे तें यथास्थित असून त्यांत मुद्द्याच्या

दृष्टीनें फारशी भर घालण्याची जरूरी नाहीं. दयानंदांच्या संबंधानें निबंधमालेंत जो मजकूर लिहिला आहे तो चिपळूणकरांनीं स्वतःच्या प्रत्यक्ष अनुभवानें लिहिलेला असून त्यांत त्या स्वामींच्या उथळ वक्तृत्वाच्या व अश्लील कोट्यांच्या ज्या गोष्टी लिहिल्या आहेत त्या मिथ्या आहेत असें कोणीही शाबीत केलेलें नाहीं. शेंकडो लोकांनीं डोळ्यांनीं पाहिलेल्या व कानांनीं ऐकलेल्या गोष्टींच्या संबंधांत, कोणताही लेखक कितीही खोडसाळ असला तरी, धडधडीत खोटा मजकूर लिहील हें अगोदर संभवनीय नाहीं. त्यांतून असल्या अश्लील कोट्या स्वतःच्या कल्पनेनें खोट्याच बनवून त्या दयानंदांसारख्या सुप्रसिद्ध व्यक्तीच्या नांवावर दडपण्याचें भयंकर धाडस कोणी करील व तसें केल्यास तें त्याला पचेल, ही गोष्टच सर्वथैव अशक्य आहे. अर्थात्, चिपळूणकरांनीं स्वामींच्या बाबतींत लिहिलेला मजकूर खरा असला पाहिजे हें उघड होतें आणि तो जर खरा असेल तर तो लिहून प्रसिद्ध केल्याबद्दल चिपळूणकरांस दोष देणें म्हणजे असत्याचें पक्षपातित्व त्यांनीं करावयास पाहिजे होतें असें म्हणण्यासारखें होय. दयानंदांच्या आर्यसमाजास पुढें अत्युज्ज्वल स्वरूप प्राप्त झालें तें लक्षांत घेतां चिपळूणकरांची टीका गैरशिस्त ठरते, असें जें बाळकृष्ण नारायण देवांसारख्या कित्येक टीकाकारांनीं प्रतिपादन केलें आहे तें अगदींच अप्रयोजकपणाचें होय. भविष्यकाळीं, किंबहुना स्वतःच्या मृत्यूनंतर घडणाऱ्या गोष्टी देखील, लक्षांत घेऊन टीकाकारानें आपली टीका करावयास पाहिजे होती असा फलितार्थ ज्यांतून निघेल असे आक्षेप घेण्यापर्यंत ज्यांची मजल गेली, त्यांनीं चिपळूणकरांना सर्व बाबतींत किती अन्याय केला असला पाहिजे, हें कोणाच्याही लक्षांत आल्याखेरीज राहणार नाहीं.

शिवाय दुसरा मुद्दा हा लक्षांत ठेवला पाहिजे कीं चिपळूणकरांच्या टीकेचा अर्धा अधिक अंश दयानंदजींच्या कच्छपीं लागलेल्या पुण्यां-

तील पुढाऱ्यांस अनुलक्षून आहे आणि या पुढाऱ्यांची वृत्ति व वागणूक लक्षांत घेतां तो केवळ रास्तच नव्हे तर असावा त्यापेक्षां सौम्य आहे, असेंच कोणाही निष्पक्षपाती मनुष्यास वाटल्याखेरीज राहणार नाहीं. स्वामींचें अनुयायित्व गाजविणारे कित्येक बडे गृहस्थ खरोखर प्रार्थना-समाज मताचे असून आपल्या मतांशीं दयानंदांचीं आर्यसमाजी मतें जुळण्याजोगीं नाहींत हें त्यांस पूर्णपणें माहीत होतें. असें असतांही ज्या अर्थी ते स्वामींच्या पुरस्कारांत व त्यांच्या शेवटच्या मिरवणुकींतही सामील झाले, त्या अर्थी परंपरागत हिंदुधर्मास शिव्या देणारी ही आयती दणदणीत असामी भेटली आहे, घ्या हिचा तेवढ्यापुरता उप-योग करून, अशा भावनेनें हे महाभाग स्वामींस जाऊन मिळाले असा चिपळूणकरांचा ग्रह होऊन त्यांस संताप कां येऊं नये ? स्वामी पुण्यांतून निघून जातांच हे आपले पुनः वेदांस भिरकावून देऊन निराकार देवाची उपासना करावयास मोकळेच ! बरें, दुसरे जे महाभाग स्वामींचे अनन्य भक्त बनून आर्यसमाजाच्या स्थापनेची धुरा मानेवर घेते झाले त्यांचीही निष्ठा व हिंमत इतकी दांडगी कीं स्वामींची पाठ वळतांच त्या आर्यसमाजाची गठडी वळून ती फेकून देण्यास त्यांस दिक्कत वाटली नाहीं ! इतकेंही सर्व पुरवलें असतें. परंतु या सर्व प्रकारावर कळस म्हणूनच कीं काय, ही सर्व मंडळी दयानंदां-नंतर लवकरच पुण्यनगरीं प्राप्त झालेले, परंपरागत हिंदुधर्माचे व मूर्ति-पूजेसारख्या असन्मार्गांचे कट्टे कैवारी जे सत्यपराक्रम स्वामी त्यांच्याही पदरजीं लोळण घेती झाली ! चांचल्याचा, थिल्लरपणाचा व पोरकट-पणाचा इतका अश्लाघ्य नमुना दृष्टीस पडल्यावरही त्याची चीड येऊं नये इतके स्थितप्रज्ञ चिपळूणकर बनलेले नव्हते हें त्यांच्या समर्थ-कांसही कबूल करणें भाग आहे !

तेव्हां दयानंदांच्या बाबतींत काय, किंवा त्यांच्या पुण्यपत्तनस्थ अनुयायांच्या बाबतींत काय, चिपळूणकरांची टीका रास्त होती हें

मान्य केल्याखेरीज गत्यंतर उरत नाहीं. आतां प्रार्थनासमाजाकडे वळून त्यावरील चिपळूणकरांच्या टीकेचें परीक्षण करूं. प्रार्थनासमाज वि. चिपळूणकर या मुकद्दम्यांत कोणचे मुद्दे निघतात ते एकामागून एक घेऊन त्यांच्या संबंधानें चिपळूणकरांनीं केलेलें प्रतिपादन सत्याच्या कसोटीस कितपत उतरतें तें स्वतंत्र पुराव्याच्या आधारें तपासून पाहावयाचें अशी पद्धति येथें योजिली आहे. निबंधमालेंतील सर्व वर्णनें खरीं मानून त्यांच्याच आधारानें वादग्रस्त प्रश्नांचा निर्णय चिपळूणकरांचे स्तुतिपाठक करीत असतात असा प्रतिपक्षाचा एक आरोप आहे. तरी मालेंतील मजकूर आधारास न घेतां इतर ठिकाणच्या पुराव्यांच्या आधारानेंच सत्यासत्याचा निर्णय करण्याचा आपण प्रयत्न करूं.

चिपळूणकरांनीं केलेल्या आरोपांपैकीं एक महत्त्वाचा आरोप हा कीं प्रार्थनासमाज हा ख्रिस्ती धर्माच्या अनुकरणाचा एक प्रकार आहे. हा आरोप केवळ चिपळूणकरांनींच केलेला नसून आजपर्यंत अनेकांनीं अनेकवार केलेला आहे व त्या आरोपाचा प्रतिकार करण्याचा समाजाच्या कैवाऱ्यांनीं कितीही प्रयत्न केला असला तरी सामान्य हिंदुधर्मीयांची समजूत आजवर तशीच चालत आली आहे, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. प्रार्थनासमाज स्थापन झाल्यानंतर लगेच 'ज्ञानप्रकाश' पत्रानेंही अशाच तऱ्हेचा आरोप त्यावर केला होता हें समाजाच्या अधिकृत रीतीनें लिहिलेल्या इतिहासांत ( पृ. ४६, ४७ ) नमूद आहे.

आतां या आरोपांत तथ्य कितपत आहे, हें पाहावयाचें. प्रथमतः ही गोष्ट अगदीं उघड आहे कीं हा निराळा पंथ काढण्याची प्रेरणा कांहीं मंडळींच्या मनांत जी उद्भवली ती परंपरागत हिंदुधर्म नकोसा वाटूं लागल्यामुळेंच उद्भवली. तसें नसतें तर हा नवीन पंथ काढण्याचें खरोखर कांहींच कारण नव्हतें. परंपरागत हिंदुधर्म या मंडळींस नकोसा

वाटूं लागला तो ख्रिस्ती धर्माच्या परिचयामुळेंच वाटूं लागला हेंही अगदीं स्पष्ट आहे. याविषयींच्या खाणाखुणा संस्थापक मंडळींच्या प्रसिद्ध झालेल्या चरित्रांतून कोठें कोठें नजरेस येतात. समाजाच्या संस्थापकांपैकीं एक व समाजाचे प्रथमपासूनचे अध्यक्ष डॉ. आत्माराम पांडुरंग हे रेव्हरेंड नेसबिट नामक मिशनऱ्याच्या धर्मशिक्षणाच्या वर्गास जात असत व तेथील शिक्षणाचा त्यांच्या मनावर फार परिणाम झाला होता. खुद्द माधवराव रानडे यांनीं एल्फिन्स्टन विद्यालयांतील धर्मवर्गांत आपलें नांव घातलें असून त्यांजवर बिशप बटलरच्या धर्मग्रंथांचा फार परिणाम झाला होता हें त्यांच्या चरित्रकारानेंच नमूद केलें आहे. याशिवाय त्या काळीं मिशनऱ्यांचा धर्मप्रचार व उपदेश फारच जोरांत चालत असल्यामुळें इतर संस्थापक मंडळींनाही ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें व त्यांची प्रार्थनापद्धति यांचा चांगलाच परिचय झालेला असला पाहिजे असें अनुमान काढण्यास कांहींच हरकत नाहीं. या परिचयामुळेंच नूतन-पंथस्थापनेची कल्पना त्यांच्या मनांत उद्भवली व नवीन पंथ स्थापितांना त्यांतील तत्त्वें व उपासनापद्धति हीं बऱ्याच अंशीं ख्रिस्ती धर्माच्या वळणावरच आखण्यांत आलीं. सगुण परंतु निराकार असा एकच ईश्वर आहे हें तत्त्व, मूर्तिपूजेच्या निषेधाचें तत्त्व व सामाजिक प्रार्थनेची पद्धत या सर्व गोष्टी ख्रिस्ती धर्मावरून जर समाजाच्या संस्थापकांस सुचल्या नाहींत तर त्या त्यांनीं कोठून उचलल्या हें अनुकरणाच्या आरोपाचा इनकार करणाऱ्यांनीं दाखवून द्यावें.

आतां या सर्व गोष्टी ख्रिस्ती धर्मावरून सुचल्या असल्या म्हणून त्या गैर ठरतात असें मात्र नाहीं. ख्रिस्ती धर्मांतील उपर्युक्त प्रकार त्यांच्या बुद्धीला पटले असतील, तेच आत्मोन्नतीला साधक आहेत अशी त्यांची पूर्ण विचाराअंतीं खात्री झाली असेल, म्हणूनच त्यांनीं त्यांचा अंगीकार केला हें उघड आहे. अनुकरण केलें हें एकदा मान्य झालें म्हणजे चिपळूणकर पक्षाचें म्हणणें सिद्ध झालें. तसें अनुकरण

करणें इष्ट कीं अनिष्ट, हा अगदीं वेगळा प्रश्न आहे. आज सगळे हिंदुधर्मी, किंबहुना सनातनी देखील, इंग्रजांच्या आचरणांतील शतशः प्रकारांचें अनुकरण सररास करीत आहेत ही गोष्ट न सांगतांच कोणाच्याही लक्षांत येण्याजोगी आहे. खुद्द चिपळूणकरांना स्वतःला हें अनुकरण अनिष्ट वाटत होतें तरी ज्यांना निष्ठापूर्वक त्याचा अवलंब करावयाचा असेल त्यांच्या विरुद्ध त्यांचा मुळींच कटाक्ष नव्हता हें त्यांच्या उद्गारांवरूनच उघड होत आहे. ( पुढें पृ. ३०२ पहा. )

अनुकरणाचा हा आरोप जसा फार पूर्वींपासून करण्यांत येत आहे तसा त्याचा इनकारही तितक्याच आग्रहानें करण्यांत येत आहे. अनुकरणाचा आरोप आपल्यावर शाबीत होणें फारच लांछनास्पद आहे असें समाजाच्या कैवाऱ्यांस वाटत असल्याकारणानें या आक्षेपाविषयीं त्यांचीं मनें इतकीं हळुवार बनलीं आहेत कीं काय कोण जाणे ! परंतु खरोखर तसें वाटण्याचें कांहीं एक कारण नाहीं हें वर स्पष्ट केलेंच आहे. चांगल्या गोष्टींचें अनुकरण करण्यांत, आणि तें केलें हें प्रांजळपणानें कबूल करण्यांत लाज कसली ? आतां समाजानें अनुकरण केलें नाहीं हें दाखविण्याकरितां जीं प्रमाणें पुढें आणण्यांत येतात तीं पाहूं. ‘महाराष्ट्रांतल्या संतकवींनीं जो भक्तिमार्ग व भागवत धर्म प्रचलित केला त्याचेंच प्रार्थनासमाज हें १९ व्या शतकांतील प्रगत व परिणत स्वरूप आहे,’ असें प्रतिपादन कित्येकांकडून करण्यांत येत असतें. त्याचप्रमाणें, ‘समाजाच्या आद्य पुरस्कर्त्यांनीं आपल्या मतांच्या सार्वजनिक आविष्कारांत वेदान्त ग्रंथांचाच बहुमान केला आहे,’ असें म्हणून समाजाची स्थापना व त्याच्या मतांची घडण आमच्यांतील वेदान्त ग्रंथांच्या अनुकरणानेंच घडून आली, असें कांहींनीं भासविण्याचा यत्न केला आहे. परंतु ह्या दोन्ही कल्पना वस्तुस्थितीशीं जुळत नाहींत. १८६७ सालीं ज्या मंडळींनीं समाज स्थापिला त्यांपैकीं कोणीही संतमंडळींच्या पासून मिळालेल्या स्फूर्तीनें

प्रेरित झाला होता असें आढळत नाहीं. भिकोबा दादा चव्हाण, बाळ मंगेश वागळे, भास्कर हरि भागवत, डॉ. आत्माराम पांडुरंग, मामा परमानंद, यांपैकीं कोणीच ग्यानबा–तुकारामांच्या संगतींत रंगणारा नव्हता. तसेंच यांपैकीं कोणीही आमच्या जुन्या वेदान्त ग्रंथांचा खोल अभ्यास केला नव्हता. संतकवींची भक्ति अगर वेदान्तसूत्रें व गीता यांचें तत्त्वज्ञान प्रार्थनासमाजांत आणिलें असल्याचीं विधानें जीं करण्यांत येतात, तीं करतांना भांडारकर, मोडक व रानडे या व्यक्ति विधानकर्त्यांच्या डोळ्यांसमोर उभ्या असतात. परंतु, एक तर ही मंडळी समाजाची आद्य संस्थापक नव्हेत; शिवाय दुसरें असें कीं यांच्या मनावर हिंदु-तत्त्वज्ञानाचा व भागवत धर्माचा परिणाम होऊन त्यांनीं प्रवचनांच्या व लेखांच्या द्वारें ती विचारसंपत्ति प्रार्थनासमाजाच्या मंदिराच्या गाभाऱ्यांत आणून सोडली तो काळ थोडा पुढचा आहे. या बाबतींत भांडारकर यांची ‘ईश्वरविषयक ज्ञान’ ही लेखमाला अगर रानडे यांचीं संतकवींवरील व्याख्यानें यांचा उल्लेख नेहमीं करण्यांत येतो. परंतु हे सर्व लेख व व्याख्यानें साधारणतः १८७८ नंतर म्हणजे चिपळूणकरांच्या टीका होऊन गेल्यानंतर प्रकट झालेलीं आहेत. याच्या उलट रानडे यांनीं १८७० पूर्वीं लिहिलेली व समाजमतांचें संकलन जींत उत्कृष्ट रीतीनें झालें आहे असें मानण्यांत येतें ती ‘एकेश्वरनिष्ठाची कैफियत’ (Theist's Confession of Faith) पाहिल्यास तिजमध्यें आमचे संतकवि अगर जुने वेदान्त ग्रंथ यांचा मागमूस कोठें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. हीं सर्व उलट सुलट प्रमाणें लक्षांत घेतल्यास त्यांवरून हीच गोष्ट निश्चयेंकरून फलित होते कीं प्रार्थना-समाजाचें तत्त्वज्ञान प्रारंभींच्या काळीं तरी आमच्या वेदान्तग्रंथांपासून अगर संतकवींपासून घेतलेलें नसून त्याचा उगम ख्रिस्ती धर्माच्या Butler's Analogy सारख्या तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांतच बहुधा शोधावा लागेल. पुढें कांहीं वर्षें लोटल्यानंतर मात्र

भांडारकर, मोडक व रानडे या तिघांनींही भारतीय तत्त्वज्ञान व भक्तिमार्ग यांची भर समाजाच्या पूर्वागत विचारसामग्रीमध्यें टाकली व तिला अधिक संपन्न बनविलें.

परंतु समाजावर परकीयानुकरणाचा जो आरोप नेहमीं येतो तो त्याच्या तत्त्वज्ञानासंबंधानें येतही नाहीं. तत्त्वज्ञान हें अमूर्त असतें. लोकांच्या डोळ्यांना प्रत्यक्ष आचारप्रणालीच दिसते व तिचाच परिणाम त्यांच्या मनावर अधिक होतो. अर्थात् अनुकरणाचा आरोप आहे तो बाह्य आचार, उपासनापद्धति व तिला विशिष्ट स्वरूप देणारीं मूर्तिपूजानिषेधासारखीं तत्त्वें यांच्या संबंधानेंच विशेषतः आहे. आणि यांतील पुष्कळ गोष्टी ख्रिस्तधर्मीयांच्या आचारविचारांवरून घेतलेल्या होत्या हें स्पष्टच आहे. अनुकरणाच्या आरोपाचा हा खरा रोख लक्षांत न घेतां तत्त्वज्ञानाकडे बोट दाखवून निसटूं पाहणें, ही हातचलाखी होय.

समाजावरील दुसरा आरोप अनावश्यकतेचा होय. आपला धर्म आहे तो खरोखर कांहीं वाईट नाहीं. ‘हवी तितकी सुधारणा होण्यास सध्यांचा हिंदुधर्म मोठासा बाधक आहे असें नाहीं,’ तेव्हां नवीन धर्मपंथ काढून लोकांचा बुद्धिभेद करणें व समाजांत फूट पाडण्यास कारण होणें, हें गैरशिस्त होय, असें एकंदर या आरोपाचें स्वरूप आहे. या आरोपाचा सांगोपांग विचार करणें झाल्यास बरेंच खोलांत शिरावें लागेल, यास्तव दोन्ही बाजूंच्या विचारांच्या दिशा थोडक्यांत सांगून आटपतें घेणें इष्ट होईल.

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत महाराष्ट्रामध्यें, विशेषतः मुंबई, पुणें या शहरांमध्यें धर्माचें स्वरूप बरेंच मलिन झालें होतें व खुळसट समजुतींचा सुळसुळाट होऊन समाजस्थिति बिघडून गेली होती. अशा स्थितींत इंग्रजी शिक्षणानें जे विचारी बनले त्यांच्या मनास आपला अंधपरंपराग्रस्त हिंदुधर्म नकोसा वाटून नवीन शुद्ध धर्माची स्थापना करावी असें वाटणें अगदीं साहजिक होतें, ही गोष्ट समाजवाल्यांच्या

बाजूनें अवश्य लक्षांत ठेवली पाहिजे. परंतु यावर उलट बाजूचें म्हणणें असें पडतें, व तें चिपळूणकरांनीं अनेक ठिकाणीं प्रतिपादिलेंही आहे, कीं या सुधारणेच्छु मंडळींनीं थोडा धिम्मेपणा पतकरून स्वतःच्याच धर्मांत राहून आपल्याला पाहिजे त्या सुधारणा हळू हळू घडवून आणण्यास सुरवात करावयास पाहिजे होती. निराळें नांव व निराळी घटना न करितां आपणास शुद्ध वाटणारे आचार एकामागून एक हळू हळू अमलांत आणण्याचा यत्न केला असता तर हिंदुसमाजांतच राहून वाटेल त्या गोष्टी त्यांस पचवितां आल्या असत्या. धर्म ही एक सामाजिक संस्था आहे; अर्थात् इतर सर्व सामाजिक संस्थांप्रमाणें ती लवचीक आहे; प्रयत्नांच्या योगानें बदलतां येणार नाहीं असा तिच्यांत कोणताच अंश नाहीं. शिवाय, मूलतः हिंदुधर्माचें स्वरूप इतकें व्यापक व संग्राहक आहे कीं त्याच्यांत राहूनच आत्मोन्नतीचे व समाजसुधारणेचे सर्वोत्कृष्ट मार्ग अवलंबितां येण्याजोगे आहेत. चिपळूणकर पक्षाचें म्हणणें अशा तऱ्हेचें होतें. परंतु इतक्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन आपल्या धोरणाची दिशा ठरविण्याइतकी व्यापक व सखोल दृष्टि समाजाच्या संस्थापकांची नव्हती. नानातऱ्हेच्या खुळया व अंध रूढींमध्यें मग्न झालेला अज्ञ समाज आपल्या डोळयांसमोर पाहून त्यांचें मन विटलें होतें. अशा विटलेल्या मनःस्थितींतच ही एकेश्वरी धर्माची पताका फडकविली गेली. पुढें भांडारकर व रानडे या तत्त्वज्ञांनीं या नवप्रणीत धर्मास तत्त्वज्ञानाची भूमिका पुरविली. अनावश्यक असा हा पंथ काढून तुम्हीं लोकांचा बुद्धिभेद करितां, या आक्षेपास अप्रत्यक्षतः उत्तर देण्याचा त्यांनीं यत्न केला. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा दिसतो कीं प्रार्थनासमाज हा हिंदुधर्मांतून फुटून निघालेला एक नवा पंथ, असें त्याचें वर्णन करणें बरोबर नाहीं. सध्याच्या परंपरागत धर्मांत अर्थहीन विधींचें व कर्मकांडाचें जें स्तोम माजलें आहे

त्याचा निरास करून आपल्या धर्माचें शुद्ध, उदात्त व उन्नत स्वरूप समाजाच्या डोळ्यांसमोर आदर्श रूपानें सतत धरणारा असा हा एक प्रगत विचारांच्या व्यक्तींचा समूह आहे. रानड्यांचें हें मतही पुष्कळांना संमत होईल असें वाटत नाहीं. कट्टे सनातनी तर प्रार्थना-समाजाचीं तत्त्वें व आचार यांस सर्वस्वीं भ्रान्त व चुकीचे समजतील. परंतु चिपळूणकरांची भूमिका सनातनीची नव्हती. शिवाय तत्त्वाच्या भूमिकेवर येऊन त्यांनीं कधीं वाद केलाच नाहीं. समाजाचीं तत्त्वें चुकीचीं आहेत अतएव तो त्याज्य, असें त्यांनीं म्हटलें नाहीं. समाजाचा निषेध करण्याचीं त्यांचीं कारणें निवळ सामाजिक व व्यावहारिक होतीं. व्यावहारिक उन्नतीचे उद्योग न करितां धर्मसुधारणेच्या खटाटोपांत हे सर्व विद्वान् लोक विनाकारण पडताहेत, असें त्यांस वाटे.

त्यांतूनही या धर्मसुधारणेच्या कार्यास स्वतःला सर्वस्वीं वाहून घेऊन चिकाटीनें त्याचा पिच्छा पुरविणारे निष्ठावंत कार्यकर्ते जर या समाजानुयायांत अनेक निघाले असते तर मतविरोध असूनही चिपळूणकरांनीं त्यांचें कौतुकच केलें असतें. परंतु या गुणांचीच तर समाजाच्या प्रस्थापकांमध्यें व पुरस्कर्त्यांमध्यें उणीव होती. कार्योन्नतीला अवश्य लागणाऱ्या निष्ठा, चिकाटी, त्याग, कष्टाळूपणा इत्यादि गुणांचा अभाव हाच चिपळूणकरांचा समाजानुयायांवर तिसरा व सर्वांत महत्त्वाचा आरोप होय. या नवीन धर्मपंथाच्या पुरस्कर्त्यांचें विष्णुशास्त्र्यांनीं वर्णिलेलें शोचनीय दुबळेपण पहा—" कारण जो ' आर्यसमाज ' आज चार दिवसांत चारदां ढांसळला, व स्थापनेच्या वेळेस ज्यास पांच सात ठरीव भक्तमंडळीखेरीज जास्ती कोणी मिळेचना; तसेंच ज्या ' प्रार्थना-समाजा ' च्या पहिल्याच महोत्सवाच्या दिवशीं त्याच्या मंदिराचे स्तंभ एकमेकांवर कोसळूं लागून प्रथम मंगल दिवशींच अत्यंत अमंगल झालें, त्यांचा टिकाव किती काळ निघेल याचें अनुमान कोणासही सहज होणारें आहे ! " जर या धर्मसंस्थापकांना आपल्या नवप्रणीत धर्मतत्त्वांबद्दल

खरी कळकळ वाटत होती व देशांत सर्वत्र झालेल्या धर्मग्लानीमुळें यांचें अंतःकरण तिळतिळ तुटत होतें, तर शिळोप्याच्या वेळीं व्यासपीठावरून प्रवचनें झोडणाऱ्या या प्रवर्तकांमधून एक तरी हरीचा लाल असा निघायचा होता कीं, ज्यानें आपल्या सर्वस्वावर पाणी सोडलें असून धर्मतत्त्वांच्या प्रसारार्थ आपला देह, आपलें आयुष्य व आपला उत्साह अर्पण केला आहे ! असा कोणी महात्मा या प्रतिष्ठितांमधून निघाला असता, तर तत्त्वांबद्दल मतभेद असूनही विष्णुशास्त्र्यांनीं आपल्या उज्ज्वल वाणीनें त्याचे धन्यवाद गायिले असते. ते स्वतः प्रत्यक्ष असेंच म्हणताहेतः— " आतां यावर आमचें म्हणणें इतकेंच आहे कीं, कोणाचीं धर्मसंबंधीं मतें कशींही असलीं, तरी त्यांविषयीं आमचें कांहीं बोलणें नाहीं.... हें तर काय, पण कोणास, विद्यमान धर्म अत्यंत दुष्ट असून त्यास अनुसरल्यानें आपल्या देशबांधवांचें फार अकल्याण होत आहे, असें मनापासून वाटून, तो सुधारण्याचें किंवा तो नष्ट करून टाकून नवा प्रवृत्त करण्याचें जर तो मनांत आणील व त्याकरितां बुद्धिपुरस्सर निर्मल अंतःकरणानें झटेल, तर त्याचा अत्यंत प्रखर द्वेष करणाऱ्या त्याच्या प्रत्यक्ष शत्रूसही त्याची योग्यता वाखाणावी लागेल. " आणि याप्रमाणें कार्यतत्परता, उत्साह, स्वार्थत्याग, चिकाटी वगैरे गुणांची वाखाणणी करण्यास सदैव तयार असल्याचें बोलून दाखवूनच विष्णुशास्त्री राहिले नाहींत. आपल्या या मानसिक औदार्यास अनुसरून त्यांनीं राममोहन राय, केशवचंद्र सेन यांची निबंधमालेंत स्तुतिच केली आहे.

चिपळूणकरांनीं केलेल्या या आरोपाची यथार्थता शाबीत करण्यास आपल्याला फार लांब जावयास नको. प्रार्थनासमाजाचे चिटणीस व 'सुबोधपत्रिके'चे संपादक श्री. द्वा० गो० वैद्य यांनीं लिहिलेल्या 'प्रार्थनासमाजाचा इतिहास' या ग्रंथांत आपल्याला याबद्दल भरपूर पुरावा आढळेल. समाजाची स्थापना झाल्यापासून पुढें सालोसाल त्याच्या सभासदांची संख्या किती होती त्याचे आकडे श्री. वैद्य यांनीं

दिलेले नाहींत. ते जर दिले असते तर समाजाचे पुरस्कर्ते कितपत नेटानें समाजमतांच्या प्रसारासाठीं झटतात हें आजमावण्यास तें एक साधन झालें असतें, परंतु त्याच्या अभावीं आपलें विशेष नडेल असें नाहीं. समाजानुयायांच्या दुबळेपणाचीं कांहीं उदाहरणें प्रस्तुत पुस्तकांतील पूर्वगामी प्रबंधांत (पृ. ९०–९१) दिलेलीं आहेत. त्यांशिवाय आणखीही कित्येक उदाहरणें उपर्युक्त इतिहासांतून दाखल करितां येतील. या दृष्टीनें या इतिहासांतील 'धर्मानुष्ठान व ध्येयपालन' (पृ. २२५–२४३) हें प्रकरण सर्वच वाचण्याजोगें आहे. त्यांत खुद्द लेखक पुढील-प्रमाणें खेदोद्गार काढतात:—"हेतु ठरवितांना जो निग्रह दाखविण्यांत आला, त्याच निग्रहानें पुढें सभासदांचें वर्तन झालें किंवा नाहीं हें पाहतां मनाचा विरस होतो असें येथें म्हणणें भाग आहे." "आमचा धर्म आचाराच्या कक्षेंत निग्रहानें आणणारा व केवळ **ब्राह्म धर्माला वाहिलेला गृहस्थ समाजस्थापकांच्या अगर त्यांच्या नंतरच्याही पिढींत कोणी झाला नाहीं**, हें येथें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे." खुद्द समाजाच्या प्रमुख कार्यकर्त्यांची ही कबुली आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे तिचें महत्त्व निराळें वर्णन करण्याची जरूरी नाहीं. दुबळेपणा, निष्ठेचा व धैर्याचा अभाव, कदाचित् कित्येकांमध्यें असलेला दांभिकपणा—इ० चिपळूणकरांनीं आरोपिलेले सर्व अवगुण या उद्गारांच्या योगानें समाजाच्या कार्यकर्त्यांनींच मान्य केल्यासारखे होतात. तेव्हां याविषयीं अधिक लिहिण्याची जरूरी नाहीं.

वस्तुस्थिति अशी असतांही फाटकांसारख्यांनीं कांहीं अनुकूल गोष्टींचेंच फुगवून वर्णन करून समाजाच्या पुढाऱ्यांच्या व अनुयायांच्या कार्यतत्परतेविषयीं भलताच आभास उत्पन्न करण्याचा जो यत्न केला आहे तो सिद्धीस जाण्यासारखा नाहीं. प्रार्थनासमाजाचींच मतें आजकालच्या सर्व सुशिक्षितांना मान्य होत चाललेलीं असून त्यांच्या आचरणांतही तीं बह्वंशानें येत चाललीं आहेत, हा प्रार्थनासमाजाचा एक मोठा

विजयच आहे, असें प्रतिपादण्याकडे कांहीं लेखकांचा कल दिसतो. परंतु हें प्रतिपादनही हेत्वाभासमूलक आहे. अगोदर समाजमतें सर्वच प्रचलित झालीं आहेत किंवा होत आहेत हें म्हणणें फारसें खरें नाहीं. पूर्वीच्या रूढि व कर्मठपणाचे विधि कमी झाले असतील परंतु मूर्तिपूजेसारख्या तत्त्वांचा पगडा सुशिक्षित जनतेच्या मनावरूनही कमी झालेला नाहीं, असें सत्यनारायणपूजा, गणपत्युत्सव, वगैरेंच्या वाढत्या प्रचारावरून दिसून येतें. निराकार ईश्वराची सामाजिक उपासना करण्याचें जें प्रार्थनासमाजाचें मुख्य तत्त्व त्याचा हिंदुसमाजानें अंगीकार केला आहे असें मुळींच दिसत नाहीं. स्त्रीशिक्षण, बालविवाह, जातिभेद, सोवळें ओवळें, स्पर्शास्पर्श इ० सामाजिक बाबतींत जो फेरबदल घडून आलेला आहे त्याचें श्रेय प्रार्थनासमाजानें आपल्याकडे घेणें म्हणजे टिट्टिभ पक्ष्यानें आपण पाय वर करून निजलों म्हणून आकाश वरच्यावर सावरलें असा स्वतःचा महिमा गाण्याप्रमाणें होय. वरील बाबतींत आजपर्यंत जी सुधारणा घडून आलेली आहे ती बरीचशी कालाच्या प्रभावामुळें व कांहींशी प्रचलित हिंदुधर्मांतच राहून सुधारणा करण्यासाठीं झगडणाऱ्या समाजसेवकांच्या प्रयत्नांमुळें झाली आहे. आगरकर, हरिभाऊ आपटे, कर्वे, भाटे इत्यादि विख्यात सुधारकांनीं केलेल्या कार्याचें श्रेय प्रार्थनासमाजाच्याच अंगीं चिकटवावयाचें कीं काय ? समाजाच्या सदस्यांपैकीं रानडे, भांडारकर व शिंदे यांनींही समाजसुधारणेचें कार्य मोठ्या प्रमाणांत केलें आहे हें खरें; परंतु तें देखील हिंदुसमाजाचा एक घटक या नात्यानेंच त्यांजकडून घडून आलें; प्रार्थनासमाजाचा त्या कार्याशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध दिसत नाहीं. समाजाच्या अभावींही त्यांच्या हातून—एक शिंदे वगळले असतां—तें कार्य घडून आलें असतें असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय वाटत नाहीं. पंढरपूरच्या अनाथगृहासारखीं जीं कित्येक कार्यें खुद्द समाजानें केलीं आहेत त्यांचें श्रेय मात्र कोणीही समाजासच देईल हें उघडच आहे.

समाजमतांच्या प्रसाराविषयीं वर जो अभिप्राय व्यक्त केला आहे तसाच अभिप्राय खुद्द डॉ. भांडारकरांनींही आपल्या एका लेखांत नमूद केला आहे. "एकंदरींत, ब्राह्मसमाज आणि प्रार्थनासमाज यांचे मताचा प्रसार फार जोरानें होत आहे असें बिलकूल म्हणतां येणार नाहीं. नवीन सुशिक्षित आणि प्रचलित हिंदुधर्मापासून पराङ्मुख अशा सर्वांचा यामध्यें प्रवेश होईल अशी जी आशा होती ती नष्ट झाली. ब्राह्मसमाजाविषयींच नव्हे तर यावत् सर्व धर्मांविषयीं नवीन शिकलेल्या मंडळींत फारच उपेक्षा आहे. परंतु इंग्रजी विद्या प्राप्त जरी झाली, तथापि धर्मसंबंधीं मतें बदललीं नाहींत असेही बरेच आहेत." (मनोरंजन, दिल्ली दरबार अंक, डिसेंबर १९११) समाजाच्या खुद्द अध्वर्यूंची ही कबुली लक्षांत घेतां, त्याचें वकीलपत्र घेऊन तिऱ्हाईतपणें पोकळ युक्तिवाद करणाऱ्यांच्या लेखांवर वाचकांनीं कितपत भिस्त ठेवावी याचा निकाल सहजच होतो.

एवंच, प्रार्थनासमाजावर चिपळूणकरांनीं जे आक्षेप घेतले त्यांचें यथार्थत्व तत्कालीन इतिहास पाहिल्यास आपल्या पूर्ण प्रत्ययास येतें. त्यांतील कोणताही आक्षेप त्यांनीं विनाकारण आकसानें घेतला आहे असें म्हणण्यास बिलकुल आधार सापडत नाहीं. विशेषतः, स्वतःला कार्यास वाहून घेऊन जोरकसपणानें, धडाडीनें त्याचा प्रसार न करण्याबद्दल जो त्यांनीं सामाजिकांस दोष दिला आहे तो खुद्द सामाजिकांनाच नेत्रोन्मीलनकारक होण्याजोगा नाहीं काय? श्री. विठ्ठल रामजी शिंदे किंवा खुद्द वैद्य यांच्यासारखे निष्ठावंत कार्यकर्ते त्या वेळेस कितीसे निपजले होते? त्या वेळेस जे कार्यकर्ते होऊन गेले त्यांजवर सर्वगुणसंपन्नतेचा आरोप करून त्यांची पोकळ स्तुति करीत न बसतां, तारतम्यानें गुणदोष मापण्याचा धारवाडी काटा जर खुद्द समाजांतील लोकच लावतील तर कार्यैकनिष्ठ पुरुषांची निपज झाली असूनही त्यांचा चिपळूण-

करांनीं गौरव केला नाहीं, असें उदाहरण कोणाच्या बाबतींत घडलें आहे तें दाखवा, असें आह्वान चिपळूणकरांच्या वतीनें सहज कोणीही देऊं शकेल.

आतां 'याच्यावर तोंड टाक, त्याच्या नाशाचा उद्योग कर,' 'रात्रीच्या समयीं शरीरसुखसाधनाच्या ठिकाणीं गुप्त प्रवेश करावयाचा!' इत्यादि उल्लेख कोणत्या व्यक्तींस अनुलक्षून आहेत हें आज आपल्या ध्यानांत येत नाहीं हें खरें, पण म्हणून ते अजीबात खोटे आहेत असें मानण्याचें कांहींच कारण नाहीं. यांपैकीं कांहीं व्यक्ति कदाचित् आजही लक्षांत आल्या तरी त्यांची परिस्फुटता करून आज विनाकारण वाद व वितुष्ट माजविण्याचें कांहीं कारण नाहीं. यासारख्या उद्गारांची उपेक्षा करूनही प्रार्थनासमाजावरचे मुख्य आक्षेप शिल्लकच राहतात आणि ते सर्व भक्कम पुराव्यानिशीं शाबीत होऊं शकतात हें वर स्पष्ट केलेंच आहे.

नूतन धर्मपंथांपैकीं तिसरा जो 'सत्यशोधक समाज' त्याच्याकडे आतां वळावयाचें. परंतु पूर्वगामी प्रबंधांत (पृ. ९१–९३) याच विषयावर केलेल्या विवेचनापेक्षां प्रस्तुत लेखकास या स्थळीं अधिक कांहीं सांगावयाचें नसल्यामुळें प्रस्तुत प्रबंधाचा हा भाग येथेंच संपविणें योग्य वाटतें.



# लोकहितवादी व चिपळूणकर

प्रस्तुत विषयावर लिहितांना लेखकास बरेंच हायसें वाटत आहे. प्रस्तुत प्रबंधाचें पूर्वस्वरूप जें 'रत्नाकर' मासिकांतील लेखमालेच्या रूपानें प्रकट झालें त्यांत लोकहितवादीसंबंधानें श्री. माडखोलकर यांनीं व्यक्त केलेल्या मतांचा बऱ्याच निर्भीडपणानें परामर्श घेण्याचें कर्तव्य प्रस्तुत लेखकास करावें लागलें होतें. त्याचप्रमाणें त्यांच्या प्रार्थना-समाजावरील विवेचनावरही विरुद्ध टीका करणें भाग पडलें होतें. परंतु आज तसा परामर्श दोन्ही विषयांच्या बाबतींत घेण्याची जरूरी उरलेली नाहीं, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट नमूद करण्यास संतोष वाटतो. प्रस्तुत ग्रंथांत छापण्यासाठीं श्री. माडखोलकर यांनीं आपल्या प्रबंधाचें जें पुनर्लेखन केलें तें करितांना प्रार्थनासमाज आणि लोकहितवादी यांच्या संबंधींच्या मजकुरांत त्यांनीं प्रस्तुत लेखकास सर्वस्वीं इष्ट असा फेरबदल फार मोठ्या अंशानें केलेला दृष्टोत्पत्तीस येतो. त्यामुळें त्यांचें लेखन प्रस्तुत लेखकाच्या मतांशीं इतकें जुळण्याजोगें झालें आहे कीं त्यावर आतां टीका करण्याची जरूरी तर फारशी राहिली नाहींच, परंतु उलट त्यांच्या लेखनावर हवाला देऊन आपलें स्वतःचें लेखन वाचविण्याची खाशी सोय प्रस्तुत लेखकास उपलब्ध झाली आहे. असा हवाला मागील विभागांतील आधुनिक धर्मपंथांवरील विवेचनांत अनेकवार त्यानें दिला आहे व प्रस्तुत विभागांतही तसाच हवाला देऊन तो आपलें काम साधून घेणार आहे.

प्रस्तुत लेखकानें पूर्वींची लेखमाला लिहिली त्या वेळीं त्यानें लोक-हितवादींचा 'शतपत्रसंग्रह' पाहिलेला नव्हता. आतांचें लिखाण, शतपत्रसंग्रहाचा बराचसा, जरूर तितका, भाग वाचून तो लिहीत आहे.

तो अवाढव्य लेखसंग्रह चाळून व वाचून त्याच्या मनावर विरोधाभासा त्मक असा दुहेरी परिणाम झाला. एकीकडे लोकहितवादींविषयींचा त्याचा आदर व प्रेमभाव द्विगुणित झाला, तर दुसरीकडे चिपळूणकरां बद्दलचा आदरही वृद्धिंगत होऊन त्यांनीं केलेली टीका किती यथार्थ व उचित आहे याची प्रत्यक्ष खात्री पटली. ह्या आपाततः परस्पर विरोधी विधानांची संगति लावणें वाचकांस अशक्य वाटेल व लेखक विक्षिप्त पणाच्या लहरींत कांहीं तरी लिहीत आहे असा त्यांचा समज होईल. परंतु सार्वजनिक कार्यकर्त्यांकडे व्यापक दृष्टीनें पाहण्याची मनाची तयारी ठेविल्यामुळें विरोधी प्रवृत्तींच्या कार्यकर्त्यांची समन्वयदृष्टीनें देशकार्याच्या मालिकेंत गुंफण करण्याची ज्यास संवय आहे, त्यास या विधानांचें आश्चर्य वाटणार नाहीं.

लोकहितवादींच्या ‘ महासागराएवढ्या लेखांच्या साठ्या ’कडे पाहिलें म्हणजे मन स्तिमित होऊन जातें. इतका उत्साह, इतकी तळमळ, इतकी मनाची उचंबळ त्यांनीं कोठून पैदा केली ?—असा प्रश्न मनांत उद्भवून मन गुंगून जातें. असले सडेतोड, निष्ठुर लेख लिहून स्वजनां शींच वैरी होण्याचा उपद्व्याप त्यांस कोणी सांगितला होता ? त्यांचीं मतें त्यांनीं मिशनरींच्या बडबडीवरून बरींचशीं उचललीं असतील. परंतु स्वजनांच्या कानीं कपाळीं एकसारखा आक्रोश करीत बसण्याला व लोककार्याच्या नाना तऱ्हेच्या धडपडी आयुष्यभर करण्याला त्यांना मिशनरींनीं किंवा इंग्रज अंमलदारांनीं खास शिकविलें नव्हतें. ती स्फूर्ति त्यांची स्वतःची होती. म्हणूनच ती अभूतपूर्व, लोकोत्तर वाटते. त्यांच्या देशहितबुद्धीचा उगम परिस्थितीमध्यें सांपडत नाहीं. वडिलांपासून, पुढाऱ्यांपासून, समवयस्कांपासून, अगर थोर वाङ्मयापासून त्यांना स्फूर्ति मिळाली असें म्हणतां येत नाहीं. असें असूनही तमोमय परि- स्थितीमध्यें देशबांधवांच्या जागृत्यर्थ ( मुंबईबाहेरच्या महाराष्ट्रामध्यें ) आक्रोश करण्यास हा एकटा पुरुष आरंभ करितो व चाळीस पन्नास

वर्षें आपला निरपेक्ष उद्योग अव्याहत चालू ठेवतो हा विलक्षण चमत्कार नव्हे काय ? त्यांची देशहितबुद्धि, त्यांची कळकळ, त्यांचा उत्साह, सर्व कांहीं त्या काळाच्या मानानें पाहतां अपूर्व होतें. परंतु—

त्यांच्या उपर्युक्त गुणांवर दोन मोठ्याच 'परंतू'चें, म्हणजे दोषांचें, विरजण पडलें होतें. ह्या दोन दोषांमुळेंच त्यांच्या उद्गारांना व कृत्यांना भलतीच दिशा लागली आणि त्यांचा देशहितार्थ म्हणण्यासारखा उपयोग होऊं शकला नाहीं. पहिला दोष **उथळपणा** हा होय. उथळपणामुळेंच 'उथळ पाण्याला खळखळ फार' या न्यायानें भरमसाट लिहिणें आलें. खोल व मूलग्राही विचार करण्याचें सामर्थ्य त्यांच्या बुद्धींत होतें असें दिसत नाहीं. वरवर विचार करणाऱ्या मनुष्यालासुद्धां पुष्कळवेळां मार्मिक विचार सुचतात. तसेच ते त्यांनाही सुचत व त्यांच्या लेखांत प्रकट होत. परंतु या मधून मधून क्वचित् दिसणाऱ्या मार्मिक विचारांबरोबरच चुकीचे, अतिशयोक्तिपूर्ण, एकांगी असे विचार त्यांच्या लेखांत इतके भरले आहेत कीं त्यांच्या मार्मिक व हितकारक विचारांबद्दल त्यांचें कौतुक करावें अशी भावना उपस्थित झालीच तर ती तावडतोब जिरून जाते. त्यांनीं आपल्या नं. १५ च्या पत्रांत जातीजातींच्या विवाहाचा विचार सध्यां न करितां देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे या पोटजातींमध्यें सररास विवाह करावा असें सुचविलें आहे; २१ व्या पत्रांत ब्राह्मणांत गृहस्थ व भिक्षुक हा भेद कसा पडला याची योग्य उपपत्ति लावून दाखविली आहे; २२ व्या पत्रांत पूर्वी मनुष्यांच्या जातींमध्यें फेरफार होत असे हें सांगितलें आहे; ७ व्या पत्रांत लग्नासारख्या स्वसत्तेंतील कामांत **सरकारचा हात शिरूं नये, स्वइच्छेनें अशा सुधारणा व्हाव्या,** हें तत्त्व प्रतिपादन केलें आहे;—याप्रमाणें त्या काळाच्या मानानें पाहतां मार्मिक व प्रगत वाटणारे अनेक यथार्थ विचार त्यांनीं प्रकट केले आहेत.

तात्पर्य, चिपळूणकरांनीं त्यांच्या लेखसमूहावर दिलेला पुढील अभिप्राय मनाला तंतोतंत पटतो. "आतां एवढें खरें आहे, कीं वरील समूहांतही माहितीच्या गोष्टी जागोजाग बऱ्याच सांपडतील, कांहीं ठिकाणीं मार्मिकपणाचें लिहिणें आढळेल, आणि शुद्ध मराठी भाषा व सुबोध भाषापद्धति यांचाही लाभ होईल. पण एवढ्या सागरांत डुंबल्याचें चीज एकंदरींत पहातां फारच थोडें होईल यांत संशय नाहीं."

उथळपणामुळें चंचलपणा मनुष्याच्या अंगीं येतो. आणि तो लोकहितवादींच्या अंगीं किती होता हें येथें सांगण्याची जरूरी नाहीं. आयुष्यभर शेंकडों तऱ्हा व लटपटी त्यांनीं केल्या. आज पुनर्विवाह, उद्या आर्यसमाज, परवां ग्रंथोत्तेजन—अशा अनेक चळवळी त्यांनीं आयुष्यभर केल्या परंतु त्यांतील एकीसही ते चिकटून राहिले नाहींत—हें सर्व त्यांच्या उथळपणाचेंच निदर्शक होय.

त्यांच्या अंगचा दुसरा मोठा दोष म्हणजे कुशलता, सारासार विचार, योजकता इत्यादि शब्दांनीं जो गुण दर्शविला जातो त्याचा अभाव, हा होय. हें विधान अर्थात् त्यांच्या खासगी आयुष्यास लागू नसून सार्वजनिक जीवनास अनुलक्षून आहे असें समजावयाचें. आपण इतका अट्टाहास कशासाठीं करितों, आपलें ध्येय काय, कोणत्या विशिष्ट सुधारणा लोकांकडून घडवून आणावयाच्या, त्यासाठीं कोणत्या दिशेनें कसे प्रयत्न करावयाचे इत्यादि अत्यवश्यक गोष्टींची नीटशी कल्पना त्यांची त्यांस होती असें दिसत नाहीं. त्यामुळें त्यांचें लिहिणें म्हणजे सुकाणूं नसलेल्या भडकलेल्या तारवाप्रमाणें दिशारहित झालें. नुसता लोकांनीं विचार करावा, सुधारावें, शहाणें व्हावें, येवढाच काय तो हेतु त्यांस आपल्या शतपत्रांच्या शेवटीं प्रदर्शित करतां आला. त्यांचे उद्गार कोणतीही विशिष्ट प्रेरणा लोकांच्या मनांत उत्पन्न करूं शकले नाहींत.

कुशलतेच्या व सारासारविचाराच्या अभावामुळेंच ते स्वजनाधिक्षेपास प्रवृत्त झाले. स्वजनांचा उपहास व तेजोभंग त्यावेळचे बहुतेक सर्वच कार्यकर्ते करीत होते. परंतु त्यांत लोकहितवादींची सर्वांच्या वर कडी होती. त्यांच्या इतक्या बेफामपणानें व निष्ठुरपणानें स्वजातीयांची व स्वदेशबांधवांची निंदा करणारा लेखक अखिल पृथ्वीतलावर दुसरा सांपडणें कठीण पडेल. आपण लिहितों हें कशासाठीं, त्यायोगानें आपल्याला काय कार्य साधावयाचें आहे, आपल्या लिहिण्याचा परिणाम काय होईल, वगैरे गोष्टींचा नीट विचार न करितां मनास येईल तें भरमसाटपणें ते लिहीत सुटले. अर्थात् त्यांच्या अकुशलतेमुळेंच त्यांच्या हातून स्वजनांची अतिरिक्त निंदा करण्याचा हा अविचार घडला. त्यांनीं केलेल्या स्वजनांच्या निंदेचें व तेजोभंगाचें वर्णन श्री. माडखोलकर यांनीं आपल्या प्रबंधांत केलेंच आहे (पृ. १२८–१४५). त्याची पुनरुक्ति येथें करून जागा अडवीत नाहीं. त्यांच्या पत्रांतून निंदात्मक उद्गारांचे कांहीं नमुने मात्र येथें दाखल करितों:—

१. " इंग्रज लोकांतील साधारण मनुष्य जरी असला तरी हिंदु लोकांपेक्षां तो सहस्रगुणांनीं श्रेष्ठ आहे. " पत्र ९.

२. " सांप्रत इंग्रजलोक हिंदुलोकांपेक्षां शंभरपट शाहणे झाले आहेत व तें शाहाणपण हिंदुलोकांस प्राप्त व्हावें एतदर्थीं ईश्वरानें हा मुलूख त्यांचे ताब्यांत दिला आहे; हें स्पष्ट दिसत आहे......असे मूर्ख लोकांमध्यें मला वाटतें कीं असेंच परकी राज्य चांगलें...शंभर वर्षें सुख भोगिलें आणि तेव्हां कांहीं ज्ञानसंपादनाचा व आपलें राज्य नीट चालविण्याचा यत्न केला नाहीं. म्हणून आतां ५०० वर्षें इंग्रजांचे अमलांत राहावें लागेल. आणि आतां ५०० वर्षांत जें शहाणपण मिळवूं तें दोन हजार वर्षेपर्यंत पुरेल. तेव्हां याजवरून इंग्रजांचें राज्य पेशव्यांपेक्षां बरें. " पत्र १२.

३. "मला वाटतें कीं ब्राह्मणासारिखा गर्विष्ठ दुसरा कोणी नसेल. कारण त्यांनीं जरी आपला धर्म व कर्म सर्व सोडलें. किती एक लबाड लुच्चे आहेत, किती एक मूर्ख आहेत, किती एक भडवेपणाचे रोजगार करितात, किती एक रांडांच्या मागें तबले वाजवितात. असे असे निर्लज्ज झाले आहेत...त्यांचा मुख्य गूण काय ती विद्या व तिचें तर त्यांचे मध्यें शून्य पडून काळें झालें आहे...ब्राह्मण कोणाचें ऐकावयाचे नाहींत. ब्राह्मणांस गर्व फार याजमुळें ते सर्वांस तुच्छ मानतात. ब्राह्मण आपल्या लोकांशीं द्वेष करितात व परक्याचे गुलाम होतात." पत्र २०.

४. "हे भट शुद्ध टोणपे दिसतात. यांस कांहींच ज्ञान नाहीं. जसें बैरागी अंगास राख लावून भीक मागतात तसें कोणत्या तरी वेषानें हे पोट भरितात...हे ब्राह्मण फार दुष्ट आहेत,...लुटारू आहेत." पत्र २२.

अशाच रीतीनें तारतम्यशून्य बुद्धीनें त्यांनीं स्वजनांची निंदा करण्याचा किंबहुना त्यांस बेफामपणें शिव्याशाप देण्याचा कहर केला आहे. इंग्रजांसारखें शाहाणें होऊन त्यांच्यासारखी आपल्यांत सुधारणा करावी, या एका विचाराखेरीज दुसरा कोणताही व्यापक व राष्ट्रोन्नतीचा विचार त्यांस सुचत नाहीं. प्रसंगविशेषीं त्यांनीं इंग्रज अंमलदारांचेही दोष काढण्यास कमी केलेलें नाहीं हें खरें; परंतु त्यांनीं देखील आपले दोष टाकून सुधारावें, इतकाच त्यांचा हेतु तसें करण्यांत दिसून येतो. राष्ट्राभिमान, राष्ट्रीय दृष्टि, देशोन्नतीची व्यापक कल्पना यांचा त्यांस गंध असलेला दिसत नाहीं. सध्यांच्या काळीं लोकहितवादींविषयींच्या सहानुभूतीचा पारा बराच वर चढलेला आहे. गेल्या दहा वर्षांत त्यांचीं दोन चरित्रें प्रसिद्ध झालीं असून त्यांच्या चरित्रलेखकांनीं व इतरांनींही त्यांच्या उद्गारांचें व कृतींचें समर्थन करण्याचा बराच प्रयत्न चालविला आहे. परंतु निःपक्षपाती दृष्टीनें पाहिल्यास त्यांच्या प्रतिपादनांत ग्राह्यांश असा फार थोडा दिसतो. स्वतःच्या कालापुढें ज्यांची दृष्टि जात नाहीं,

अशा तऱ्हेचे संकुचित व उथळ बुद्धीचे ते गृहस्थ होते. पांचशें वर्षे इंग्रजांच्या अंमलांत राहून आपणांस शहाणपण मिळवावें लागेल, इतकी हीन कल्पना त्यांची स्वदेशबांधवांच्या कर्तबगारीविषयीं होती ! १८६०-७० पूर्वींची गोष्ट एक असो; परंतु बहुतेक एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत जीवमान असून सुद्धां १८७० नंतर महाराष्ट्र ज्या नवशक्तीनें व ओजस्वी विचारानें स्फुरूं लागलें होतें त्या शक्तीचा व विचाराचा लेशही ग्रहण करण्यास त्यांचें मन समर्थ झालें नाहीं. आपलीं जुनीं जरठ मतेंच त्यांनीं १८७७ नंतर लिहिलेल्या आपल्या 'स्वाध्याय' नामक ग्रंथांत पुनः एकदा सांगितलीं आहेत. "त्यांच्या प्रतिपादनांतील अतिशयोक्तीचा भाग जर काढून टाकला, तर त्यांचे विचार काळाच्या कसोटीला बहुंशीं उतरले आहेत, असेंच म्हणावें लागेल," हें माडखोलकरांचें लिहिणें सत्याच्या कसोटीला उतरेल असें वाटत नाहीं. कारण, त्यांच्या प्रतिपादनांत अतिशयोक्तीच सर्वत्र भरलेली आहे; ती काढून टाकल्यास खालीं शिल्लक फारसें कांहींच उरणार नाहीं असा अंदाज होतो. अर्थात् चिपळूणकरांनीं लोकहितवादींच्या ज्या तीन लेखांचें खंडन केलें आहे त्यांचें समर्थन करण्याचा माडखोलकरांनीं जो प्रयत्न केला आहे, तो फारसा सिद्धीस गेला आहे असें वाटत नाहीं.

पहिला लेख 'नाना फडणीसाचें शहाणपण' हा आहे. नाना फडणिसाच्या बद्दल लोकहितवादींनीं जी अद्वातद्वा लेखणी चालविली आहे तिचें समर्थन अलीकडील इतिहाससंशोधकांच्या मतांचा हवाला देऊन माडखोलकर करूं पाहत आहेत. परंतु 'नाना फडणीसाचें शहाण-पण' या लेखांतील सर्व विधानें, उदाहरणार्थः 'आतां इंग्रज लोकांमध्यें सहस्रशः नानापेक्षां शहाणे आहेत,' 'त्यास राज्याबाहेर कोण अंमल करितो याची खबर बिलकूल नव्हती' 'या लोकांचें कोणतेंही कल्याण त्याचे हातून झालें नाहीं,' 'कालाच्या योगानें इंग्रेज त्या वेळेस फारसे इकडे आले नव्हते. यामुळें हें राज्य चाललें, नाहीं तर असें लुटारू,

अडाणी लोकांचें राज्य निभूं नये,' 'आतां जर नाना फडणीस असता तर लोक त्यांस वेडा म्हणूं लागते व तो पळूनही जाता यांत संशय नाहीं',—अशा तऱ्हेचीं मुक्ताफळें इतिहाससंशोधकांना मान्य होतील याबद्दल जिम्मा घेण्यास ते तयार आहेत काय? अलीकडच्या इतिहास-संशोधकांना शोधाअंतीं व विचाराअंतीं नाना फडणिसाच्या व पेशवाईंतील इतर मुत्सद्द्यांच्या कारभारांत पुष्कळ दोष दिसूं लागले असतील, म्हणून अथपासून इतिपर्यंत स्वजननिंदाव्रत धारण करणाऱ्या लोकहित-वादींचे ते अनुयायी बनले आहेत असें प्रतिपादन करणें वस्तुस्थितीस अनुसरून होणार नाहीं. लोकहितवादी नानाप्रमाणेंच अव्वलपासूनच्या सर्व मराठमंडळाला व शिवाजीलाही 'एरंडोऽपि द्रुमायते' या न्यायानें मंढवाड्यावर अंमल गाजविणाऱ्या मूर्खांत काढतात. त्याप्रमाणें हल्लींचे संशोधक करावयास तयार आहेत काय? माडखोलकरांनीं स्वतः केलेलें नानाच्या कर्तबगारीचें विवेचन दोषदृष्टीनेंच केलें आहे. तें कोणाही निःपक्षपाती इतिहासज्ञास पसंत पडणार नाहीं. कोणीं कांहीं म्हटलें तरी नाना फडणीस हा त्याच्या स्वतःच्या काळच्या हिंदुस्थानांतला अव्वल दर्जाचा मुत्सद्दी होऊन गेला. लोकहितवादी म्हणतात त्यापेक्षां इंग्रजांच्या कारभाराची त्याला फारच जास्त माहिती होती व पंचवीस वर्षेपर्यंत जयिष्णु इंग्रजांची लाट त्यानें आपल्या मनसुब्याच्या तरवारीच्या जोरावर थोपवून धरली होती यांत शंका नाहीं. आपले हेतु सिद्धीस नेण्यासाठीं लागणारें धोरण व मुत्सद्दीपणा त्याच्या अंगीं भरपूर होता व ज्या राज्याचा कारभार तो हाकीत होता त्या राज्याचा अभिमानही त्याच्या अंगीं पूर्ण होता. नानाच्या अमदानींत व्यक्त झालेले मराठेशाहीचे दोष त्यानें निर्माण केलेले नसून त्या सर्वांचीं बीजें पूर्वींच रुजत घातलेलीं होतीं. त्या दोषांचा निरास करून राष्ट्रीय सद्गुणांचें उद्भावन करण्याची युगकर्त्या पुरुषाची कर्तबगारी त्याच्या अंगीं नव्हती, किंबहुना तत्कालीन कर्ते पुरुष ज्या दोषांनीं ग्रस्त झालेले होते त्यांपैकीं

बरेच खुद्द नानाच्या निकाणींही वसत होते, ही गोष्ट खरी आहे. परंतु या मर्यादित विधानामध्यें आणि लोकहितवादींच्या भरमसाट निंदेमध्यें जमीन अस्मानाचें अंतर आहे. रियासतकार सरदेसाई यांस नानाचे पक्षपाती असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं. त्यांनीं इंग्रज मराठ्यांच्या युद्धांत नानानें जी कामगिरी बजाविली तिचें पुढील शब्दांत गौरव केलें आहे.—" वरील सात वर्षांच्या या युद्धांत आंवळ्यांची मोट बांधून केवळ अकलेच्या जोरावर जी राष्ट्रसेवा नानानें केली, ती महाराष्ट्रास सदैव अभिमानास्पदच वाटेल. त्यानें शेंकडो, हजारों माणसांना या राष्ट्रसेवेंत राबविलें. नाना वचनाचा सच्चा; लबाडीचें किंवा खोटें असें त्याचें एकही कृत्य दाखवितां येणें शक्य नाहीं. " नानाच्या मृत्यूनंतर त्याच्या योग्यतेचा आढावा काढतांना बरेंचसें प्रतिकूल वर्णन करून सुद्धां सरदेसायांस नानाच्या अंगचे, मराठी राज्याचा अभिमान, इंग्रजांना दूर ठेवण्याचीं शैली, राज्यकारभाराची दक्षता, इत्यादि अनेक गुण मान्य करणें भागच पडलें आहे.

'सांप्रतच्या पंडितांचें ज्ञान' व 'भटांनीं लावून दिलेलें वेड' ह्या लेखांतही लेखकाच्या विकारवशतेचेंच प्रदर्शन झालेलें आहे, ही गोष्ट, अर्धवट कां होईना, कबूल करणें माडखोलकरांस भाग पडलें आहे. खरोखर पाहिलें असतां ते लेख आचरट विधानांनीं भरलेले असून त्यांत तथ्यांश असा फारच थोडा आहे. आणि जो कांहीं तथ्यांश आहे तो अजाणतां त्यांत उतरला आहे असें लेखकाच्या भरमसाट लेखनपद्धतीवरून म्हणावेंसें वाटतें.

तेव्हां असल्या कोत्या व स्वाभिमानरहित विचारसरणीच्या पायावर ज्यांचीं मतें रचलेलीं होतीं. त्या लोकहितवादींच्या मतांचा उच्छेद विष्णुशास्त्री यांनीं केला यांत कांहीं वावगें झालें, असें कोणासही वाटण्याचें कारण नाहीं. लोकहितवादींचे लेख समाजाचा तेजोभंग

करणारे होते. त्यांच्या वेळेस समाजास उद्दीपक, उत्तेजक व स्वाभिमानाची प्रेरणा करणाऱ्या विचारांची जरूरी होती. लोकहित-वादींच्या राष्ट्राचा तेजोभंग करणाऱ्या विचारांचा निरास करून चिपळूण-करांनीं तेजस्वी विचारांची प्रेरणा राष्ट्रास केली हें माडखोलकरांस मान्यच आहे व इतर विचारी विवेचकांसही तें मान्यच होईल यांत शंका नाहीं.

सरतेशेवटीं एकच मुद्दा उरतो. लोकहितवादींचीं मतें टाकाऊ व चुकीचीं होतीं; तथापि चिपळूणकरांच्या वेळेस तीं अगोदरच निर्मा-ल्यवत् ठरलीं असल्यामुळें त्यांचें खंडन करण्याच्या भरीस पडून उगीच मृतमारणाचें काम चिपळूणकरांनीं केलें हें योग्य झालें नाहीं, असें कित्येक लोक प्रतिपादन करितात. यास उत्तर एवढेंच कीं, एक तर लोकहितवादींची विचारसरणी चिपळूणकरांच्या वेळेस अगदीं निर्माल्यवत् झालेली नव्हती. त्यांच्या मतांचा समाजामध्यें मान कमी झाला होता हें खरें, तरी त्यांनीं केलेला तेजोभंग व उत्साहभंग अजून तसाच कायम होता. लोकहितवादींसारख्या लेखकांनीं आपल्या लेखांनीं पुष्ट केलेली हीनतेची जाणीव ( Inferiority Complex ) चिपळूण-करांच्या वेळेस जरी दबलेली असली तरी पूर्ण नाहींशी झालेली नव्हती, हें मागें निदर्शित केलेंच आहे. खुद्द रानडे यांचीं मतें म्हणजे लोक-हितवादींच्या मतांचीच सुधारलेली आवृत्ति होती. ( पृ. १४१-४२ पहा ) रानड्यांनीं १८७८ सालीं दिलेल्या एका व्याख्यानांतील कांहीं उतारे येथें सादर केले आहेत, त्यांवरून त्यांचीं त्या काळचीं मतें म्हणजे लोकहितवादींच्याच मतांचा सौम्य भाषेंत केलेला अनुवाद होय हें लक्षांत येईल.

“ आपल्या विद्या व युरोपियन विद्या ह्यांची जर आपण तुलना केली, तर आपल्या विद्या अगदीं भरभराटीच्या काळांतही केवळ बाल्यावस्थेंत होत्या व सांप्रतची युरोपियनांची विद्या तारुण्य दशेंत आहे, असें सहज

दिसून येईल....तेव्हां अशा विद्येचा व राष्ट्राचा काय उपयोग ? वास्तविक म्हटलें तर विद्या शिकून आपण कोण, आपलें कर्तव्य काय ? व आपणास या जगांत काय करावयाचें आहे ? वगैरे गोष्टी मनुष्यमात्रास अवश्य समजल्या पाहिजेत; त्या ज्या विद्येच्या कोटि ग्रंथांपासून देखील समजत नाहींत ती विद्या कोठली ? व तिचा काय उपयोग ?........सांप्रत जरी आपली विद्या अगदीं लयास पोचत आहे, तरी तिचा ऐन भरभराटीचा म्हणजे रामराज्यांतील जरी काल धरिला तरी त्या वेळेसही ह्या विद्येच्या संसर्गानें लोकांच्या मनाची स्थिति अगदीं बाल्यावस्थेंत होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.......तेव्हां अशा समजुतीच्या राष्ट्रास कोणची अवस्था द्यावी ह्याची देखील पंचाईत वाटते. आम्हांस तर ह्या अवस्थेस बाल्यावस्था म्हणण्यापेक्षां वृद्धावस्था व त्यांतही अगदीं आसन्नावस्था म्हटल्यास चिंता नाहीं असें वाटतें. पण ही स्थिति ज्या विद्येच्या आकंठ सेवनानें प्राप्त होणार तीसही नांव देणें म्हणजे कांहीं सुचत नाहीं."

( रानडे चरित्र, पृ. २०२–२०४ )

ह्या उद्गारांवर निराळें भाष्य करण्याची जरूरी नाहीं. ते जितके तेजोभंग करणारे तितकेच असत्य व अयथार्थ आहेत, हें आमच्या राष्ट्रांतील विद्यांची चौदाव्या पंधराव्या शतकांपर्यंत जी स्थिति होती असें इतिहास सांगतो, तिजवरून सहज शाबीत करतां येण्याजोगें आहे. ऐतिहासिक दृष्टीचा त्यांत पूर्ण अभाव दिसून येतो. तरी देखील चिपळूणकरांनीं अशा मतांचें अयथार्थत्व दाखवून त्यांचा निरास केला ह्याबद्दल चिपळूणकरांवर कांहीं विद्वन्मन्य मंडळींचा राग आहेच !

लोकहितवादींच्या स्मृतीला तजेला आणण्याचा बराच खटाटोप सुमारें दहा वर्षांमागें झाला. 'डेक्कन व्हरन्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी'नें लोकहितवादींच्या 'शतसांवत्सरिका'च्या निमित्तानें निबंध मागविला. प्रो० गणेश हरि केळकर यांनीं निबंध लिहून त्यांत

लोकहितवादींची मनसोक्त स्तुति केली; त्यानंतर त्यांचें दुसरेंही एक चरित्र प्रसिद्ध झालें, त्यांतही तोच प्रकार दिसून आला. या सर्व गोष्टी ठीक चालल्या आहेत. त्यांबद्दल आमचें कांहीं म्हणणें नाहीं. कांहीं ठिकाणीं लोकहितवादींच्या मतांचें सणंग भरकिंमतीस खपावें म्हणून उलटीसुलटी घडी करून खोटे पदर लपविण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो, तिकडेही आम्ही डोळेझांक करूं. लोकहितवादींनीं ज्या लेखांत पुराणांस शिमगा म्हणून त्यांची हेटाळणी केली त्या लेखाचा उल्लेखही न करतां भांडारकरांनीं पुराणांची योग्यता समजावून देऊन चांगली कानउघाडणी केल्यानंतर पुराणांविषयींचें लोकहितवादींनीं सुधारून तयार केलेलें मत मात्र निबंधकारांनीं सविस्तर दाखल केलें आहे. अशा तऱ्हेचा चरित्रनायकाची बाजू संभाळण्याचा जो प्रयत्न प्रोफेसर केळकर यांनीं केला आहे त्याबद्दलही आम्ही कांहीं म्हणत नाहीं. परंतु सप्रमाण विवेचन न करितां बिचाऱ्या मालाकारांवर जातां जातां जे त्यांनीं दोषारोप केले आहेत त्यांची लोकहितवादींच्या मतांचा उपन्यास करतांना काय जरूर होती हें मात्र आम्हांस समजत नाहीं. त्याचप्रमाणें विविधज्ञानविस्तारकारांनीं माड-खोलकरांच्या निबंधाचें परीक्षण करितांना विष्णुशास्त्र्यांवर यथेच्छ गालिप्रदान करण्याची हौस पुरवून घ्यावी यांतील हेतु काय असावा याचाही बोध होत नाहीं. मालाकारांच्या निंदेशिवाय लोकहितवादींच्या स्तुतीची सांगताच होऊं नये असा कांहीं शास्त्रार्थ ठरला आहे कीं काय ?

---:o:---

## ६

# कांहीं ठळक आक्षेपांचा विचार

आजपर्यंत अनेक दूषकांनीं चिपळूणकरांच्या अंगच्या अनेक दोषांचें वर्णन मोठ्या उल्लासानें केलें आहे. त्यांमध्यें **विकारवशता** हा एक दोष सर्वांनीं प्रामुख्यानें उल्लेखिलेला आढळतो. विकारांचें प्राबल्य असलें म्हणजे विचाराचा, मननशीलतेचा अभाव हा त्याबरोबर आलाच. व्यापक व खोल विचार करण्याची पात्रताच त्यांच्या अंगीं नव्हती असें म्हणण्याचा कित्येक आक्षेपकांचा रोख दिसतो. तर, ही पात्रता अंगीं असूनही सामान्य जनसमाजाच्या मनाला गुदगुल्या होऊन तो बेहद्द खूष होईल अशा तऱ्हेचें उथळ व कुचेष्टेखोर लिखाण लिहिण्याच्या नादीं लागल्यामुळें त्यांनीं आपल्या विचारशक्तीचा उपयोग न करितां तिला बुद्धिपुरस्सर दाबून टाकलें, असा आरोप कित्येकांनीं, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, केलेला आढळतो. हा आरोप अपात्रतेच्या आरोपापेक्षां भयंकर होय. कारण चिपळूणकरांनीं लोकप्रियतेच्या नादीं लागून लोकांची वंचना केली व जाणूनबुजून त्यांस चुकीच्या मार्गास लाविलें असा या आरोपांतून फलितार्थ निघतो. श्री. फाटकांनीं इतके स्पष्ट शब्द कोठें वापरले नसले तरी त्यांनीं चिपळूणकरांस उद्देशून एकंदरीनें जें लिखाण केलें आहे, त्यांत वारंवार हाच आरोप ध्वनित केला आहे.

जाणून बुजून असो, नकळत असो, वा स्वाभाविक अपात्रतेमुळें असो, चिपळूणकरांनीं जें उथळ व उत्तेजक लिखाण लिहिलें त्यामुळें फार मोठे अनिष्ट परिणाम घडून आले असें आक्षेपकांचें म्हणणें आहे. लोकाभिरुचीस अनिष्ट वळण लागलें, स्वाभिमानाचा अतिरेक होऊन दुरभिमानांत त्याचें पर्यवसान झालें, स्वतःचे व राष्ट्राचे दोष दिसेनातसे होऊन चुकीचीं एकांगी मतें समाजामध्यें रूढ झालीं, असे अनेक दुष्परिणाम आक्षेपकांनीं वर्णिले आहेत. बाळकृष्ण नारायण देव यांनीं राजाराम-

शास्त्री भागवत यांजवर जो प्रबंध लिहिला आहे त्यांत चिपळूणकरांची भागवतांशीं तुलना करितांना त्यांच्या लेखांतील प्रमाद व त्यांच्यामुळें झालेले अनिष्ट परिणाम साकल्यानें कलमवार नमूद केले आहेत. या आरोपमालिकेंतील गाभ्याचा भाग पुढें उद्धृत केला आहे.

" मालालेखांपासून विकारवश विचारजागृति उत्पन्न झाली. वैयक्तिक गुणावगुणावरून सार्वजनिक व सर्वव्यापक अशी अनुमानपद्धति प्रचारांत आली. परकी अंमल व अवनति यांच्या कार्यकारणभावाचा विपर्यास झाला. ही राष्ट्रीय अवनति आकस्मिक ( accidental ) किंवा विकृतिरूप पावली. वस्तुतः ती स्वाभाविक किंवा प्रकृतिरूप (character) होती. तिचें नुसतें राजकीय अंगच विकृत आहे बाकी सर्व कांहीं सुस्थित आहे, असें प्रतिपादन मालेंत आहे. पण याहून जास्त असत्य गोष्ट दुसरी नसेल. जुन्यांतील दोषांकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं. पूर्वकालीन स्तौत्य व वीरपूजा यांचा कडेलोट झाला.

" दोघांचीही ( चिपळूणकर व भागवत यांची ) दृष्टि वस्तुस्थितीच्या उगमकारणाच्या शोधनापर्यंत बिनचूक जाऊन पोंचली नव्हती. त्यामुळें विचारांप्रमाणें मालेंतही सत्यासत्याचें मिश्रण, सत्यावरणाच्छादित असत्य, सत्याभास, अशुद्ध सत्य, निर्भेळ सत्य, यांची गर्दी होऊन, त्यापासून सामान्य वाचकांच्या सत्यान्वेषक विचारशक्तीचा कोंडमारा होतो; त्यास दिशाभूल पडते, त्यायोगें गोंधळून **विचाराच्या ऐवजीं तो विकारासच कवटाळतो.** "

हा उतारा उपलक्षणार्थ दिला आहे. यांत नमूद केलेले व इतर आक्षेपकांनीं इतरत्र प्रतिपादिलेले परंतु साधारणतः याच प्रकारांत समाविष्ट होणारे सर्व आरोप लक्षांत घेऊन त्यांचा लघुतम साधारण विभाज्य काढिला असतां जे दोषारोप फलित होतात त्यांचा येथें विचार करूं.

सर्वांत मूलगामी आरोप विकारवशतेचा होय. विकार व भावना हीं एकाच मनोव्यापाराचीं दोन नांवें होत. हा मनोव्यापार ज्याप्रमाणें

अधोगामी व अनिष्ट स्वरूपाचा असूं शकतो त्याचप्रमाणें तो इष्ट व उन्नत स्वरूपाचाही असलेला दिसून येतो. यांपैकीं उन्नत स्वरूपाला भावना हें नांव देऊन व अधोगामी स्वरूपाला विकार असें म्हणून दोन्ही शब्दांच्या अर्थामध्यें कित्येक लोक फरकही करतात. चिपळूणकरांची प्रकृति भावनाशालिनी होती; त्यांनीं आपल्या लेखांनीं जनतेच्या भावना उद्दीपित केल्या, हें आपण मागें ( पृ. २५४–२६० ) पाहिलेंच आहे. त्यांच्या अंगीं असलेल्या किंवा त्यांनीं जनतेमध्यें उत्पन्न केलेल्या भावना इष्ट व उन्नत स्वरूपाच्याच होत्या हेंही त्याच वेळेस आपल्या नजरेस आलेलें आहे. अर्थात् विकार व भावना हे शब्द समानार्थक मानल्यास, चिपळूणकरांचें लिखाण विकारप्रेरित व विकारप्रेरकही होतें ही गोष्ट चिपळूणकरांच्या समर्थकांना सर्वस्वीं मान्यच आहे. अर्थात् ही गोष्ट गैर मुळींच नसून चिपळूणकरांना ती भूषणास्पदच आहे असा समर्थकांचा निश्चित अभिप्राय आहे.

परंतु आक्षेपकांचा अभिप्रेतार्थ हा नाहीं. विकार हा शब्द 'भावना' ( emotion ) याच अर्थीं ते वापरतात किंवा कसें हें जरी त्यांच्या प्रतिपादनावरून स्पष्ट होत नसलें तरी विकारवशता हा चिपळूणकरांचा अवगुण म्हणूनच त्यांनीं वर्णन केला आहे. विचाराचें अधिष्ठान सुटून चिपळूणकर केवळ विकारांच्या अधीन झाले; त्यामुळें, ते ज्या विकारांच्या अधीन झाले ते वस्तुगत्या जरी इष्ट व उन्नत स्वरूपाचे असले तरी पुढें त्यांचा अतिरेक होऊन लोकांच्या मनावर त्यांचा परिणाम अनिष्ट झाला;—असा देव प्रभृति आक्षेपकांच्या म्हणण्याचा आशय दिसतो. एखादा विकार मुळांत जरी चांगला असला तरी त्यावरचा विचाराचा अंकुश नाहींसा झाला म्हणजे तो भडकून अतिरेकास जातो. यास उदाहरण स्वाभिमान या मनोविकाराचेंच देतां येईल. स्वाभिमानाला किंवा देशाभिमानाला सारासारविचारानें नियमित केलें नाहीं तर त्याचें दुरभिमानांत तेव्हांच

पर्यवसान होतें व चिपळूणकरांच्या बाबतींत तसें झालें असल्याचा आक्षे-पकांचा आरोपही आहेच. तरी अशा तऱ्हेची निरंकुश विकारवशता चिपळूणकरांच्या ठायीं होती कीं काय याचा आपण विचार करूं.

तीन तऱ्हांनीं या प्रश्नाचा आपणास विचार करितां येईल. प्रथमतः खुद्द चिपळूणकरांच्या प्रकृतिस्वभावांत अशी विकारवशता दिसून येते कीं काय हें आपणास पाहतां येईल. नंतर त्यांच्या वाङ्मयांत सारासार-विचारशून्य विकारवशता कोठें दिसून येते कीं काय याचा शोध घेणें उचित ठरेल. आणि सरतेशेवटीं, त्यांच्या लेखांमुळें लोकांमध्यें विकार-वशता व तदनुषंगिक इतर दोष निर्माण झाले कीं काय, याची पाहणी करणेंही रास्त ठरेल. परस्परसंलग्न अशा या तीन्ही प्रांतांमधील संशो-धनांत विकारवशतेचा वास जर प्रत्येक ठिकाणीं येऊं लागला तर चिपळूणकर सहजच दोषी ठरतील. याच्या उलट तीन्ही ठिकाणीं या दोषाचीं बीजें आढळलीं नाहींत तर त्यांस दोषमुक्त म्हणून सोडून देण्यास कांहींच हरकत नाहीं. एखाद्या ठिकाणीं दोषाचें प्राबल्य, तर दुसऱ्या ठिकाणीं त्याचा अभाव, अशी स्थिति जर आढळून आली तर तिचा समन्वय कसा करावयाचा याचा मात्र पुनः प्रश्नच पडेल. परंतु अशी स्थिति आढळून येणें बहुधा असंभवनीय होय, हें थोडा विचार केल्यास कोणाच्याही लक्षांत येईल. नहून असा कांहीं प्रकार आढळल्यास त्याचा विचार आपण नंतर करूंच.

व्यक्ति या नात्यानें चिपळूणकर स्वभावतः विकारवश होते कीं काय, याचा विचार करूं लागल्यास विकारवशतेचे पुरावे त्यांच्या आयुष्यांत कोठेंच आढळत नाहींत. त्यांच्या भावना जोमदार व प्रबळ होत्या, परंतु सारासार विचाराचा पगडा त्यांजवर योग्य प्रमाणांत होता, असें त्यांच्या आयुष्यांतील प्रसंगांचें निरीक्षण करितां दिसून येतें. देशाभिमानाच्या प्रबळ भावनेनेंच नोकरी सोड-ण्याचा कानमंत्र त्यांना दिला. परंतु देशाभिमानाच्या व स्वातंत्र्याच्या

ऊर्मीसरशीं नोकरीला लाथ मारून पुढें तोंडघशीं पडण्याचा उतावीळपणा त्यांनीं केला नाहीं. त्यांनीं विवेक केला, मागेंपुढें पाहिलें, पुढील कर्तव्याची दिशा ठरविली आणि मगच नोकरीचा त्याग केला. ह्या विवेकाबद्दलही अर्थातच फाटकांसारख्यांनीं त्यांना नांवें ठेविलीं आहेतच. तथापि तें कसेंही असलें, तरी चिपळूणकर विकारांच्या सर्वस्वीं अधीन नव्हते हें यावरून उत्कृष्ट रीतीनें सिद्ध होतें. निबंधमालेचें कार्य संपलें असें दिसून येतांच ती त्यांनीं बंद केली, वडिलांच्या मृत्यूनंतर आपल्या चुलत्याशीं वागतांना खंबीर धिमेपणा दाखविला, हीं सर्व त्यांच्या विचारशीलतेचींच उदाहरणें होत. भावनावश मनुष्य असता तर तो या प्रत्येक प्रसंगीं अगदीं निराळ्या रीतीनें वागता. याच्या उलट, भावनेच्या लाटेसरशीं ते कांहीं तरी भलतेंच करून बसले, असें उदाहरण त्यांच्या सबंध आयुष्यांतून एकही काढून देतां येत नाहीं. तस्मात् त्यांचा व्यक्तिस्वभाव विकारवश, उतावळा, अतिरेकी असा नव्हता असेंच सिद्ध होतें.

त्यांच्या लेखांमध्येंही विकारांचा वरचष्मा कोठें झाला आहे असें दिसत नाहीं. विकारवश मनुष्य एककल्ली व अतिरेकी बनतो. जी भावना त्याच्या मनांत उचंबळली असेल तिजखेरीज त्यास दुसरें कांहीं दिसत नाहीं. क्रोध येण्यास कारण दिसल्यास तो सर्वस्वीं क्रोधाच्याच अधीन होईल, शोककारण घडून आल्यास तो तीव्र शोकांत मग्न होऊन जाईल. मुद्द्यास धरून सुसंगत युक्तिवाद करणें त्यास बहुधा साधणार नाहीं. आतां निबंधमालेच्या लेखकाचें जें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें राहतें तें अशा विकारवश मनुष्याचें असतें काय ? चिपळूणकरांचे पुष्कळसे लेख सुसंगत व मुद्देसूद युक्तिवादांचीं उत्तम उदाहरणें आहेत, ही गोष्ट आक्षेपकांपैकींही पुष्कळांना मान्य होईल. शिवरामपंत परांजपे किंवा अच्युतराव कोल्हटकर यांच्याप्रमाणें चिपळूणकरांच्या लिखाणांत भाव-

नांचें प्राधान्य नाहीं. त्यांचा लिखाणाचा साकल्यानें परिणाम कांहीं विशिष्ट भावना उद्दीपित करण्यांत होत असला तरी लेख वाचतांच मन थरारून जावें इतकी भावनांची उचंबळ त्यांच्या कोणत्याच एका लेखांत दिसून येत नाहीं. सर्व विषयांच्या दोन्ही बाजू त्यांस दिसत असत. प्रतिकूल टीका करितांनाही टीकाविषयाचें गुणग्रहण केल्याखेरीज ते कधीं राहिले नाहींत. खुद्द लोकहितवादींचें गुणवर्णन ३४ व्या अंकांत त्यांनीं इतक्या वेचक व मार्मिक रीतीनें केलेलें आहे कीं तसें त्यांच्या स्तुतीसाठीं चंग बांधलेल्या त्यांच्या चरित्रकारांसही भाराभर लिहून करतां आलेलें नाहीं. त्याचप्रमाणें इंग्रज लोकांचे गुणही त्यांनीं अनेक ठिकाणीं ( मालेचा ४१ वा अंक व केसरींतील 'अनुकरण' हा निबंध पहा ) मुक्तकंठानें वर्णिले आहेत. तेव्हां विकारवशता किंवा तदुद्भूत एककलीपणा यांचा चिपळूणकरांच्या लेखांत आढळ होत नाहीं, असाच निकाल कोणाही निःपक्षपाती निरीक्षकास देणें भाग पडेल.

आपल्या पूर्वींच्या पिढींतील पुढाऱ्यांची व त्यांनीं आरंभिलेल्या कार्यांची त्यांनीं सतत जी निंदा वा चेष्टा केली आहे ती तरी त्यांच्या विकारवशतेची व एककलीपणाची द्योतक नाहीं काय ?—असा प्रश्न येथें उपस्थित केला जाईल. त्यास उत्तर 'नाहीं' असेंच ठाम आहे. याचें कारण आतांपर्यंतच्या विवेचनांत अनेकवार दिग्दर्शित झालेंच आहे. तें हेंच कीं, त्यांनीं केलेला व्यक्तींचा वा कृत्यांचा उपहास बहुतांशीं रास्त आहे. ही गोष्ट खुद्द सुधारणापक्षीय लेखकांच्या उताऱ्यांवरून माग ( पृ. २३५–२३६ ) सिद्ध केलीच आहे. तेव्हां चिपळूणकरांनीं त्यांच्या एक-सारख्या केलेल्या उपहासाचें कारण चिपळूणकरांची विकारवशता नसून त्यांचें दोषबाहुल्य हेंच होय. त्यांतून, ज्यांच्या अंगीं वर्णन करण्या-सारखे गुण होते त्यांचें गुणवर्णन त्यांनीं केलें आहे, हें लोकहितवादी, रानडे वगैरे व्यक्तींच्या उदाहरणावरून सिद्ध होतच आहे.

आणखी एका गोष्टीकडे लक्ष पुरविल्यास चिपळूणकरांची विकार-

वशता नाशाबीत ठरते. त्यांच्या निबंधांचे विषय पहा. लेखनशुद्धि, ग्रंथांवर टीका, वक्तृत्व, इ० विषय किती भावनाशून्य व साधे ! भावनामय किंवा रोमांचकारी असा भाग त्यांत कोठेंच नाहीं. खरें भावनामय लिखाण कसें असतें हें 'काळां' तील परांजपे यांचे निबंध ज्यांनीं वाचले आहेत त्यांसच कळेल. गोपाळराव आगरकर यांच्या लिखाणावरही विकारवशतेचा छाप अतोनात उमटलेला आढळतो. चिपळूणकरांचें लिखाण हें रसिकताजनित सौंदर्यानें आणि उपहासगर्भ विनोदानें मन मोहित करतें, भावनांच्या उसळणाऱ्या लाटांनीं आंदोलित करीत नाहीं.

तात्पर्य, चिपळूणकरांच्या प्रकृतींत भावनांचा संनिवेश असला, तरी ते भावनांच्या अधीन कधींच होत नसत. त्यांची भावना सारासार विचारानें नियमित झालेली असल्यामुळें तिच्या द्वारा इष्ट अशींच कार्यें घडून आलीं. अर्थात् आक्षेपक म्हणतात तशा प्रकारची विकारवशता त्यांच्या अंगीं नव्हती व ती त्यांच्या लेखनांतही कधीं प्रकट झाली नाहीं हाच सिद्धान्त ग्राह्य ठरतो.

त्यांच्या लेखनांत जर विकारवशता नव्हती तर वाचकांच्या मनांत तरी परिणामरूपानें ती कशी उत्पन्न होणार ? अर्थात् मालालेखांनीं 'विकारवश विचारजागृति' होण्याच्या ऐवजीं विचारवश विकारजागृति होण्याचाच संभव अधिक. परंतु हें नुसतें कारणावरून कार्याचें केलेलें अनुमान झालें. खरा प्रकार प्रत्यक्ष काय घडून आला हें जर पाहिलें, तर चिपळूणकरांच्या वाङ्मयाचा परिणाम दुरभिमानयुक्त एककली विचारसरणी निर्माण करण्यांत झाला असा आभास होण्याजोगी परिस्थिति आपणास आढळून येते, हें मात्र खरें. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या विचारांचा वारसदार म्हणून जो संप्रदाय पुढें आला त्याच्यामध्यें चिपळूणकरांनीं निर्माण केलेल्या भावनांचा अतिरेक होऊन त्यांस कांहींसें विकृत व एकांगी स्वरूप प्राप्त झालें, हें आपण मागें पाहिलेंच आहे. आणि त्यांचे आक्षेपक बा. ना. देव यांनीं याच बाबीवर विशेष जोर देऊन

त्यांच्या परंपरेंतील अनुयायांच्या अतिरेकाबद्दल त्यांस जबाबदार धरलें आहे. परंतु 'शिष्यापराधे गुरोर्दण्डः' असा न्याय या ठिकाणीं लावूं पाहणें बरोबर होणार नाहीं. उत्तरकालीन पुराणमताभिमानी संप्रदायानें जुनें तें सर्व चांगलें असें मानून 'पूर्वकालीन स्तौत्य व वीरपूजा' यांचा अतिरेक केला, त्याचप्रमाणें राजकीय बाबतींवांचून बाकी सर्व कांहीं सुस्थित आहे ही एककल्ली विचाराची दिशा उपदेशिली, हें खरें. परंतु या अतिरेकाचा व एककल्लीपणाचा उगम चिपळूणकरांपासून झाला असें म्हणण्यास कांहीं एक आधार नाहीं. चिपळूणकरांच्या लेखांतील प्रतिपादन सर्वथैव समतोल-पणाचेंच आहे. पुराणमताभिमानी संप्रदायांत जें जें बरें वाईट दिसेल त्याचा आरोप चिपळूणकरांवर करण्यांत कित्येक लेखकांची मोठीच चूक होत असते. त्या संप्रदायाची मनोभूमिका, मतें व कार्यपद्धति हीं अनेक कारणांमुळें बनत गेलीं. चिपळूणकरांचें वाङ्मय हें त्यांपैकीं केवळ एक कारण होतें. त्या संप्रदायांत दिसणाऱ्या अनिष्ट गोष्टींचा या एकाच कारणावर आरोप करणें असमंजसतेचें होय. पुराणाभिमानी संप्रदायाचे अध्वर्यु जिनसीवाले, नातू, नारायण बापूजी कानिटकर, किंब-हुना खुद्द टिळक यांच्या मनोभूमिका चिपळूणकरांच्या उदाहरणानें अगर निबंधमालेच्या वाचनानें बनल्या होत्या असें मुळींच दिसत नाहीं. हे सर्व चिपळूणकरांचेच समकालीन होते. इतर अनेक वैयक्तिक व सामा-जिक कारणांमुळें त्यांच्या मनोभूमिका विशिष्ट प्रकारच्या बनल्या होत्या. त्यांनीं जीं मतें प्रतिपादिलीं त्यांची जबाबदारी चिपळूणकरांवर लादणें हें वड्याचें तेल वांग्यावर काढण्याप्रमाणें होय. आपली परंपरा अगर संप्रदाय निर्माण करून त्याची विचारांची दिशा ठरविणें—या गोष्टींची कल्पना स्वप्नांत देखील चिपळूणकरांच्या मनांत त्यांच्या अल्पकालिक आयुष्यांत आली असणें शक्य नाहीं. पुढें एखादा संप्रदाय निर्माण होईल, त्यांत अमुक व्यक्तींचा अंतर्भाव होईल, त्या व्यक्ति आपल्या वाङ्मयास विशेष मान देतील व कदाचित् स्वतःच्या अतिरेकी मतांसाठीं

आपण लिहिलेल्या लेखांचा आधार घेतील, या सर्व प्रकाराची कल्पनाही चिपळूणकरांस असणें शक्य नव्हतें. तेव्हां त्या अनुयायांच्या अतिरेकी मतांची जबाबदारी पर्यायानें सुद्धां चिपळूणकरांवर येत नाहीं.

समाजांतील आंदोलनांना लंबकाच्या झोक्याची उपमा देऊन कित्येक लेखक असें प्रतिपादितात कीं, चिपळूणकरांनीं प्रत्यक्षतः जरी अतिरेकी मतांचें प्रतिपादन केलेलें नसलें तरी त्यांनीं पूर्वीचा ओघ थांबवून त्याला उलट दिशेनें, थोडी कां होईना, कलाटणी दिली; तेव्हां पुढें तो त्या दिशेनें अगदीं टोकास गेला त्याची जबाबदारी चिपळूणकरांवरच येते. परंतु हेंही प्रतिपादन हेत्वाभासावर अधिष्ठित आहे. अगोदर सामाजिक स्थित्यंतरांस लंबकाची उपमा देणें, अलंकाराच्या दृष्टीनें मनोहर असलें, तरी वस्तुस्थितीच्या दृष्टीनें चूक आहे. लंबकाचीं आंदोलनें एकदां सुरू झालीं म्हणजे सृष्टिनियमानुसार होत असतात. त्यांस पुनः पुनः चालना देण्याची जरूर असत नाहीं. सामाजिक विचारांतर किंवा स्थित्यंतर हें सर्वस्वीं मनुष्यकृत असतें. एखाद्या मनुष्यानें एकदा गति दिली म्हणजे तें स्वभावधर्मानें घरंगळत दुसऱ्या टोकापर्यंत जाईल असें मानणें चुकीचें आहे. चिपळूणकरांनीं स्वाभिमान, देशाभिमान इत्यादि वृत्ति निर्माण केल्या हें खरें; परंतु त्या वृत्ति त्यांच्या मृत्यूनंतर आपल्या स्वभावधर्मानेंच अतिरेकास गेल्या व स्वाभिमानाचें अंध पुराणाभिमानांत व देशाभिमानाचें दुरभिमानांत आपोआप पर्यवसान झालें, अशी समजूत करून घेणें, ' याहून जास्त असत्य गोष्ट दुसरी कोणतीही नसेल. ' देशाभिमानाची विचारसरणी प्रत्यक्ष स्वप्रयत्नानें अतिरेकास नेणाऱ्या जिनसीवाले, कानिटकर, नातू, पुणें-वैभवकार, इत्यादि व्यक्ति निर्माण झाल्या म्हणूनच ती अतिरेकास गेली; एरवीं कदापि गेली नसती. आणि ह्या सर्व व्यक्ति स्वयंभू असून चिपळूणकरांच्या तालमींत मुळींच तयार झालेल्या नव्हत्या. तेव्हां या उत्तरकालीन अतिरेकाच्या जबाबदारीचें लोण चिपळूणकरांपर्यंत नेऊन पोंचविणें सर्वथैव अन्यायाचें आहे.

शिवाय, हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं या संप्रदायानें कांहीं बाबतींत आपलीं मतें जरी अतिरेकाला नेलेलीं असलीं तरी त्यागाच्या जोरावर त्यानें केलेली देशसेवेची कामगिरी इतकी उज्ज्वल व महनीय आहे कीं त्याच्या पुराणप्रियतेचा दोष त्या उज्ज्वलतेंत लोपूनच्च जातो. पोक्त विवेचनाचा आव घालणाऱ्या सुखस्थित टीकाकारांनीं त्याच्यावर लेखणी उचलावी यासारखें धाष्टर्य कोणतेंच नाहीं.

तेव्हां विकारवशता व तिच्या अनुषंगानें येणारे अंध पुराणाभिमान, राजकीयेतर बाबींकडे दुर्लक्ष, इत्यादि आरोप चिपळूणकरांवर मुळींच लागू पडत नाहींत. चिपळूणकरांचें लिखाण पाहिलें तर राजकीयेतर बाबतींकडेच त्यांनीं अतोनात लक्ष पुरविलेलें आढळून येतें. 'लोकभ्रम' या लेखांत सामाजिक दोषांचेंच उद्घाटन केलें आहे. 'जॉन्सनचें चरित्र,' 'वक्तृत्व' इत्यादि निबंधांतील प्रतिपादनाचा रोख सामाजिक सद्गुणांची वाढ करण्याकडे आहे. 'आमच्या देशाची स्थिति' या निबंधांत सार्वत्रिक ज्ञानप्रसाराचा जोरदार पुरस्कार केला आहे. केसरींतील बहुतेक लेख ('आमच्या देशांतील सभा व मंडळ्या,' 'अनुकरण' इ०) सामाजिक विषयांवरच आहेत. तात्पर्य, सुधारकांस आवडत्या अशा, विधवाविवाह, जातिभेद, बालविवाह इत्यादि विषयांवर जरी त्यांनीं आपली लेखणी चालविली नसली तरी समाजामधील आंतरिक सद्गुणांचें वर्धन करून त्याची खरी उन्नति करण्याकडे त्यांचें सर्वस्वीं लक्ष होतें हें उघड दिसतें.

सरतेशेवटीं देवांच्या आक्षेपांतला एक मुद्दा उरतो. तो '(माला-लेखांपासून) ही राष्ट्रीय अवनति आकस्मिक किंवा विकृतिरूप पावली. वस्तुतः ती स्वाभाविक किंवा प्रकृतिरूप होती' अशा शब्दांत त्यांनीं व्यक्त केला आहे. या दुर्बोध वाक्याचा अर्थ सुलभ करून सांगितला पाहिजे. चिपळूणकरांनीं आपल्या लेखांत आपल्या देशाच्या स्थितीसंबंधानें एक महासिद्धान्त वारंवार प्रतिपादिलेला आढळतो. तो त्यांच्याच शब्दांत येथें नमूद करणें उचित होईल.—

“ आमच्या देशास कांहींएक झालें नाहीं. त्याची नाडी अद्याप साफ चालत असून शरीरप्रकृतीस म्हणण्यासारखा कांहीं एक विकार नाहीं. यास्तव आमच्या अर्वाचीन पंडित मंडळींनें एकावर एक जालीम दवे सुरू करून व शस्त्रक्रियेचे तीव्र प्रयोग करून त्याची जी हलाखी मांडली आहे, ती सर्व सोडून देऊन साधारण पौष्टिकाचे उपचार त्याजवर सुरू झाले असतां तो लवकरच पुनः पहिल्यासारखा सशक्त व तेजस्वी होईल, याविषयीं आम्हांस बिलकूल संशय नाहीं. हल्लीं जी आमच्या राष्ट्रास विपत्तीची स्थिति प्राप्त झालेली आहे ती आमच्या अंगच्या कांहीं अनिवार्य दोषांमुळें आली नसून ती यदृच्छेनें कोणत्याही देशास येण्यासारखी आहे व आजपर्यंत आलीही आहे. इंग्रज लोक हे आम्हांहून अनेक प्रकारांनीं बलिष्ठ असल्यामुळें व आमचें दैव फिरल्यामुळें हल्लींच्या अवस्थेंत आम्ही येऊन पडलों आहों. ”

या सिद्धान्तावरच देवांचा मोठा आक्षेप आहे. आमची अवनतावस्था यदृच्छेनें ( accidental ) अगर आमचें दैव फिरल्यामुळें प्राप्त झाली, हें म्हणणें अगदीं चुकीचें असून ती आमच्या राष्ट्राच्या प्रकृतींत मुरलेल्या अनिवार्य दोषांमुळेंच प्राप्त झाली आहे, असा देवांच्या वरील वाक्याचा आशय आहे. आपल्या विद्या अगदीं कुचकामाच्या असून आपल्या राष्ट्राची सध्यां अगदीं आसन्नावस्था आहे अशा अर्थाचा रानड्यांच्या एका व्याख्यानांतील उतारा मागें ( पृ. ३१७ ) सादर केला आहेच. आपलें राष्ट्र अनेक भयंकर दोषांनीं ग्रस्त झालें आहे अशी समजूत चिपळूणकरांच्या पूर्वीच्या बहुतेक सर्व पुढाऱ्यांची होती. हीच समजूत देवांस मान्य असून चिपळूणकरांचा समज चुकीचा व विकारवशतेचा द्योतक होय असें त्यांचें म्हणणें आहे.

या दोन परस्परविरोधी सिद्धान्तांपैकीं खरा कोणचा हें ठरविणें जितकें महत्त्वाचें तितकेंच बिकट काम आहे. या प्रश्नाचा खोलवर व सांगोपांग विचार करावयाचा म्हटल्यास एक स्वतंत्र ग्रंथच

लिहावा लागेल. प्रस्तुत स्थलीं, सत्य हें कोणत्या बाजूस कितपत वसत आहे हें थोडक्यांत दिग्दर्शित करून या मुद्द्याचा समारोप करणें उचित होईल. सत्य हें बहुधा दोन टोकांमध्यें वसत असतें असें म्हणतात, तोच न्याय प्रस्तुत प्रश्नासही लागू पडतो. 'आमच्या देशास कांहीं एक झालें नसून त्यास म्हणण्यासारखा विकार नाहीं' हें म्हणणें सत्यापासून जितकें दूर आहे तितकेंच 'आमचा देश आसन्नावस्थेस जाऊन पोंचला आहे' हें म्हणणेंही सत्यास सोडून आहे. आपल्या देशास बऱ्याच जबर व्याधींनीं पछाडलें आहे ही गोष्ट खरी, परंतु त्याची प्रकृति अजून खंबीर असून काळजीपूर्वक उपचार केल्यास तो लवकरच खडखडीत बरा होईल, याविषयीं संशय घेण्याचें कांहीं कारण नाहीं. याप्रमाणें खरी स्थिति आहे.

चिपळूणकरांनीं स्वदेशाच्या प्रकृतीविषयीं इतकें निर्धास्तपणाचें विधान केलें तें पन्नास वर्षांपूर्वीच्या काळीं एका दृष्टीनें युक्तच होतें. कारण जनतेला उत्तेजित करून तिजमध्यें आशावादाचा प्रसार करण्याची त्या काळीं फार जरूरी होती. सध्यां सार्वजनिक कार्यांची प्रगति सर्व दिशांनीं इतकी झाली आहे कीं निर्भीडपणें स्वदोषाविष्करण करण्यास हरकत वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. शिवाय गेल्या पन्नास वर्षांच्या काळांत पाश्चात्य संस्कृतीच्या जलाल रसायनानें आमच्या राष्ट्राचें अंतरंग ढवळून जाऊन त्यांतून जी खळमळ बाहेर पडत आहे तिजमुळें आपल्या दोषांची तीव्र जाणीव आपणास प्रत्यक्ष रीतीनें आतां होऊं लागली आहे. चिपळूणकरांच्या काळीं मूठभर सुशिक्षितांखेरीज बाकीचा लोकसमाज थंड असून सर्व कांहीं सुस्थित होतें. त्यामुळें आपल्या राष्ट्राच्या प्रकृतींत मुरलेल्या दोषांची त्यांस नीटशी कल्पना आली नाहीं यांत नवल नाहीं.

अशा कांहीं गोष्टींची चिपळूणकरांस नीटशी कल्पना आली नाहीं व एकंदरीनें राष्ट्राच्या स्थितिगतीसंबंधानें व्यापक व गहन असे तात्त्विक

विचार त्यांनीं प्रदर्शित केले नाहींत, यावरून त्यांच्या अंगीं पोक्तपणा, मननशीलता, गांभीर्य, गहन विचार प्रसविण्याची शक्ति, इत्यादि गुण नव्हते असा आरोप बहुधा सर्व आक्षेपकांकडून करण्यांत येतो. पांढऱ्या वस्तूच्या अंगीं काळेपणा नाहीं, किंवा सूर्याच्या अंगीं चंद्राचें शीतलत्व नाहीं, असें म्हणण्याइतपतच हा आक्षेप समंजस आहे. चिपळूणकरांची प्रकृति भावनाशालिनी होती; तिला अनुसरून उदात्त भावनांचा प्रसार करणें हें त्यांचें जीवितकार्य होतें. तें त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें बजाविल्या-नंतर त्यांच्या अंगीं अमुक नव्हतें, तमुक नव्हतें म्हणून दूषणें देत बसणें हें बाष्कळपणाचें ठरतें. त्यांच्या पूर्वीच्या देशभक्तांत विचारीपणा पुष्कळच होता. भावनांचे तेजःकिरण प्रसारित करण्याचीच त्या काळीं मुख्यतः जरूर होती. ती, दुसऱ्या कोणाकडूनही न भागणारी जरूर चिपळूणकरांनीं भागविली ही कामागिरी काय कमी महत्त्वाची आहे ? मी स्वतः मोठा तत्त्वज्ञ आहें, असा चिपळूणकरांनीं कधींच आव आणिला नाहीं. ज्या गोष्टी आपणांस साधणार नाहींत असें त्यास वाटलें त्यांस त्यांनीं कधींही हात घातला नाहीं. असें असतांही त्यांजवर अशा तऱ्हेचे निष्फळ आरोप कां केले जावे हें समजणें कठीण आहे.

महाजनस्थ दोषदर्शनाची लालसा, प्रतिपक्षास वाटेल त्या उपायांनीं नामोहरम करणें, वगैरे जे अनेक दोषारोप चिपळूणकरांवर केले जातात ते त्यांच्या प्रतिपक्ष्यांच्या चिडलेल्या मनःस्थितीचे द्योतक होत. चिपळूण-करांना जेथें जेथें म्हणून दोष दिसून आले तेथें तेथें त्यांनीं त्यांजवर प्रहार केला, हें खरें. परंतु हा त्यांचा दोष नसून गुणच होय. सार्वजनिक कार्याच्या आखाड्यांत उतरल्यानंतर हा बडा, तो छोटा इत्यादि भिडेचे विचार मनांत आणून 'तेरी बी चूप मेरी बी चूप' असा प्रकार कोणी करावा ? ज्यास स्वतःचा कांहीं लंगडेपणा लपवा-वयाचा आहे त्यानें. चिपळूणकरांसारखा खंबीर व अंतर्बाह्य निरपवाद असा पुरुष निर्भीडपणानें टीका करण्यास पुढें सरसावला व त्यानें

आपल्या वाणीच्या जोरकस प्रवाहानें उदात्त विचारांच्या आवरणाखालीं लपलेली पूर्वींची सर्व खळमळ धुवून काढली हें आपल्या महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्यक्षेत्राच्या शुद्धीच्या दृष्टीनें अत्यंत इष्ट असें कृत्य झालें.

परंतु या चिपळूणकरांच्या कृत्यामुळेंच बड्या धेंडांचें अनुयायित्व मिरविणाऱ्यांची काकदृष्टि चिपळूणकरांकडे वळली. त्यांतील पुष्कळांची कल्पनाशक्ति व शोधकदृष्टि तितपतच असल्यामुळें खुद्द चिपळूणकरांच्या वागणुकींत कांहीं दोष काढण्यास त्यांस जागा सांपडलेली नव्हती. परंतु फाटकांसारख्या जबरदस्त शोधकाला अशक्य असें काय आहे ? चिपळूणकरांनीं सरकारी नोकरी पतकरली हीच अगोदर मोठी लांछनास्पद गोष्ट असें ठरवून त्यांनीं त्याबद्दल चिपळूणकरांचा खूप उपहास केला आहे ! तरी बरें कीं फाटकांच्या पूज्यपाद गुरुवर्यांची सर्वच्या सर्व मालिका सरकारी अधिकारांचे चांद धारण करणारी होती. सरकारी नोकरी न पतकरितां देशसेवेस वाहून घेण्याची प्रथा चिपळूणकरांनीं पाडिली हें खरें. परंतु जो पुरुष कोणताही नवीन प्रचार सुरू करितो तो जुन्या परिस्थितींतूनच निर्माण झालेला असतो ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. चिपळूणकरांनीं आपल्या पूर्वींपासून चालत आलेल्या सुशिक्षितांच्या रूढीप्रमाणें प्रथम नोकरी पतकरली. परंतु पुढें स्वतंत्र होण्याच्या लालसेनें नोकरी सोडून देऊन त्याग प्रेरित देशसेवेच्या नवीन युगाची प्राणप्रतिष्ठा केली. यांत चिपळूणकरांच्या योग्यतेला कमीपणा आणणारें सरळ मनाच्या मनुष्यास कांहींच दिसणार नाहीं. चिपळूणकरांस नोकरीचा तिटकारा होता तर वडील वारल्याबरोबरच त्यांनीं नोकरीचा राजीनामा कां दिला नाहीं, पुढें वर्ष दीडवर्ष पर्यंत ते नोकरीस कां चिकटून राहिले, असाही आक्षेप पुढें आणिला गेला आहे. अपमान सोसूनही जे नोकरीस चिकटून राहिले अशांचे गोडवे गाणारांनीं खरोखर अशा तऱ्हेचा आक्षेप पुढें आणूं नये; परंतु तो आणिला असला तरी त्याचा फोलपणा उघड

करणें फारसें अवघड आहे असें नाहीं. चिपळूणकरांनीं अखेरीस ज्या-अर्थीं नोकरी सोडली त्याअर्थीं पैशाच्या लोभामुळें ते नोकरीस चिकटून राहिले होते असें तर म्हणतां येत नाहीं. पैशाचा लोभ असता तर त्यांनीं नोकरीस कधींच रामराम ठोकला नसता. प्रारंभीं पैशाचा लोभ असून तो वर्ष दीड वर्षाच्या प्रयत्नांनीं तोडून टाकण्यास त्यांनीं आपल्या मनास प्रवृत्त केलें, असें मानावें तर तेंही संभवनीय दिसत नाहीं. कारण, त्यांची नोकरी मुळांतच अत्यंत लोभनीय होती असें नाहीं. त्यांतून ती संभाळण्यासाठीं रत्नागिरीसारख्या गैरसोयीच्या ठिकाणीं जावें लागल्यामुळें पूर्वीं कदाचित् तिचा थोडासा लोभ वाटत असल्यास तोही या वेळीं नष्ट होऊन गेलेला असला पाहिजे. अर्थात् वर्षभर त्यांनीं जी वाट पाहिली तिचें कारण निराळेंच कांहीं तरी असलें पाहिजे. नोकरी सोडल्यानंतर पुढें काय करावयाचें, स्वतःचें आयुष्य कसें घालवावयाचें, याचा विचार करून सर्व योजना मनाशीं ठरविण्यांत या मधल्या एका वर्षाचा त्यांनीं विनियोग केला असला पाहिजे हें त्यांच्या एकंदर चरित्राकडे पाहतां उघड होतें. नोकरी सोडणें हा एकंदर सर्व आयुष्याचा, जीवनाचा व चरितार्थाचा प्रश्न होता. नोकरी सोडतांच त्यांस कोठलें वर्षासन मिळणार नव्हतें, किंवा कोठल्या फंडां-तून अगर देशकार्यासाठीं सभांतून लांब लांब भाषणें करणाऱ्या बड्या लोकांच्या भरलेल्या खिशांतून त्यांस मदत मिळणार नव्हती. आणि त्यांच्या निःस्पृहतेची खरी खूण हीच कीं अशा प्रकारच्या कोणत्याही मदतीची त्यांनीं तिळमात्रही इच्छा धरली नाहीं. आपला स्वार्थत्याग कारणीं लागावयाचा असल्यास क्षणिक स्फूर्तीसरशीं अंधारांत उडी टाकल्याचें स्वरूप त्यास येतां कामा नये, याची त्यांस पूर्ण जाणीव होती. यासाठींच सर्व योजनेचा विचार करण्यांत त्यांनीं पुरेसा काळ दवडिला.

चिपळूणकरांच्या स्वार्थत्यागाची कुचेष्टा आजपर्यंत अनेकांनीं केली

आहे. परंतु खरोखरी पूर्ण विचार करून केलेला त्यांचा स्वार्थत्यागच अखिल राष्ट्राला मार्गदर्शक कसा झाला हें मागें अनेकवार (पृ. १६७ व पृ. २५८-२५९) दाखवून दिलें असल्यामुळें त्याविषयीं येथें अधिक विस्तार करण्याची गरज नाहीं. त्यागाची गोष्टच अशी आहे कीं तो केवळ दुसऱ्यानें बरें म्हणावें म्हणून कोणी करीत नसतो. त्याला आंतरिक स्फूर्तीचीच जरूरी असते. अशा स्फूर्तीनें त्याग करणारे सर्वजण वंद्यच होत. परंतु ज्यानें आपल्या व्यवहारचातुर्यानें व योजकतेनें आपला त्याग व्यावहारिक दृष्ट्या यशस्वी करून दाखविला तो पुरुष विशेष गौरवार्ह होय. कारण त्याच्या यशस्वितेमुळें तो त्याग अनुकरणीय ठरला; व त्यामुळें त्यागी कार्यकर्त्यांची परंपरा निर्माण झाली. या बाबतींत टिळक–आगरकरांच्या त्यागाचीं उदाहरणेंही चिपळूणकरांच्या उदाहरणाप्रमाणें पुढच्यांना मार्गदर्शक झालीं ही गोष्ट नमूद करणें न्यायतः उचित होईल.

आपला त्याग सार्थकीं लावण्यांत चिपळूणकरांची योजकता ज्याप्रमाणें प्रकट झाली त्याचप्रमाणें इतर हरएक बाबतींतही ती प्रकट झालेली आढळते. १८७८ चा नववा आक्ट (देशी भाषेंतील वृत्तपत्रांवर बंधनें घालणारा कायदा) होतांच चिपळूणकरांनीं 'ज्ञानोदया' स उत्तर देण्याकरितां ख्रिस्ती धर्मपुस्तकास अनुलक्षून लिहिलेला सर्व मजकूर रद्द केला व आक्टाचा अंमल ज्यावर पोचूं शकत नाहीं असा विषय मालेच्या अंकासाठीं निवडिला. ही गोष्ट त्यांच्या योजकतेचीच दर्शक होय. श्री. फाटक यांस याच्यामध्यें चिपळूणकरांचा भ्याडपणा दिसला हें त्यांच्या वृत्तीस अनुरूपच आहे. परंतु मौज ही कीं बंगाल्यांतील शिशिरबाबूंची याच वेळेस त्यांना आठवण होऊन त्यांचें 'बाणेदार उदाहरण' चिपळूणकरांच्या कपाळावर सडकण्याकरितां त्यांनीं आणलें आहे. आणि शिशिरबाबूंचा बाणेदारपणा कोणता तर आक्टाचा अंमल अजीबात चुकविण्याकरतां त्यांनीं आपल्या बंगाली भाषेंतील पत्राला तडकाफडकी इंग्रजी वेष

दिला हा! शिशिरबाबूंचा हा 'बाणेदारपणा' बरा कीं आमच्या धोपटमार्गी चिपळूणकरांचा उपर्युक्त 'भ्याडपणा' अधिक प्रशंसनीय याविषयीं वाचक खरोखरच बुचकळ्यांत पडतील! आक्टाचा मारा अजीबात चुकविण्याकरितां जो मनुष्य आपल्या पत्राची भाषा देखील बदलून सर्वस्वीं सुरक्षित असा अवतार धारण करितो तो अधिक 'भ्याड', कीं जो आपल्या मासिकाचें स्वरूप सर्व कायम ठेवून विषय मात्र तात्पुरता बदलतो तो अधिक 'भ्याड', याचें तारतम्य फाटकांना नसलें तरी वाचकांना सहज राहील. शिवाय या तुलनेंत दुसरीही एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे, ती ही कीं चिपळूणकर हे वरील प्रसंग उद्भवला त्या वेळीं सरकारी नोकरींत होते व शिशिरबाबू हे सार्वजनिक कार्यकर्ते असून बोलून चालून सुळावरची पोळी असलेला वर्तमानपत्राचा धंदा चालवीत होते. या दोघांपैकीं वस्तुतः भ्याड कोणीच नसून दोघांचीही योजकता व शिताफी प्रशंसनीयच वाटते. तथापि तुलनाच करावयाची झाली तर तिच्यांतूनही चिपळूणकरांसच अनुकूल असा निष्कर्ष निघेल इतकेंच येथें सुचविण्याचा हेतु आहे.

श्री. फाटकांस वंद्य वाटणाऱ्या पूज्यपादांचीं चरित्रें अनेक महत्त्वाच्या प्रसंगीं दिसून आलेल्या उपदेशांतील व आचारांतील विसंगततेमुळें लांछित झालेलीं आहेत हें सुप्रसिद्धच आहे. या शल्यामुळें विद्ध झालेलें फाटकांचें मन चिपळूणकरांच्या जीवनांत असें छिद्र कोठें सापडतें कीं काय हें डोळ्यांत तेल घालून शोधीत असतां आपलें छिद्रान्वेषण सफल झाल्याचा आनंद त्यांस एकदाचा लाभला असावा असें दिसतें. वृत्तपत्राच्या फाइली चाळतां चाळतां चिपळूणकरांच्या 'नवसफेडी'चा वृत्तांत त्यांस एके ठिकाणीं आढळला! तो चवाठ्यावर आणून, शेवटचा टोला चिपळूणकरांस लगावल्याचें समाधान मानूनच जणूं काय फाटक एकदम अंतर्धान पावले आहेत.

विधवाविवाहाची जोरानें तरफदारी करून स्वतःवर प्रसंग येतांच अल्पवयी कुमारिकेशीं लग्न लावणें, मूर्तिपूजा व जुने धार्मिक विधि सब झूट म्हणून एकीकडे समाजमंदिरांत कंठरवानें प्रतिपादून घरीं धर्मकृत्यें यथासांग चालू ठेवणें, स्पशास्पर्श निर्बंध पाळणें चुकीचें आहे म्हणून एकीकडे सांगून लगेच दुसरीकडे चहापानाबद्दल निमूटपणें प्रायश्चित्त घेणें इत्यादि धरसोडीच्या अनेक प्रचंड उदाहरणांशेजारीं चिपळूणकरांच्या विसंगतीचें हें उदाहरण ठेवण्याजोगें आहे खरेंच ! एवढ्यानें फाटकांचें समाधान होत असेल तर त्याच्या आड न येण्याइतकें औदार्य चिपळूणकरांच्या अभिमान्यांमध्यें खचित आढळून येईल.

तथापि, येथेंही हें लक्षांत, ठेवण्याजोगें आहे कीं ' लोकभ्रम ' या निबंधांत प्रारंभींच खुळेपणाच्या प्रकारांत नवसाचा निर्देश चिपळूण-करांनीं केला असला, तरी त्याचा विवेचनपूर्वक निषेध कोठेंच केलेला नाहीं नवस करणें व फेडणें हा प्रकार एकंदरींत गौणच खरा, तथापि त्याला केवळ भाकड खूळ म्हणून म्हणतां येणार नाहीं. कामानिक व हीन कां होईना, परंतु देवताराधनेचा तो एक प्रकार होय, हें लक्षांत ठेवलें पाहिजे तो आचरिला, यांत स्वतः प्रतिपादिलेल्या मताविरुद्ध आचरण केल्याचा दोष चिपळूणकरांवर येत नाहीं. हें सर्व समर्थन त्या ' नेटीव ओपीनियन ' पत्राचा बातमीदार यथार्थवक्ता असेल असें गृहीत धरून केलें आहे ! कोणास ठाऊक, त्या बातमीदाराचीही यांत कांहीं हातचलाखी असेल !

असो. तेव्हां चिपळूणकरांच्या चारित्र्याच्या तटास खिंडार पाडण्याचा श्री. फाटकांचा प्रयत्न इतपत सिद्धीस गेला आहे ! ' क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ' या वचनाची त्यांस आठवण देऊन वृत्तपत्रांच्या फायलींच्या सागरांत आणखी बुड्या मारून चिपळूणकरांच्या अवगु-णांचीं उदाहरणें शोधून काढण्याविषयीं त्यांस विनंती करणें येथें

अस्थानीं होणार नाहीं. ते संशोधनांत निमग्न आहेत तोंपर्यंत आपणही आपली मीमांसा बंद ठेवून त्यांच्या संशोधनांतून कोणतीं रत्नें बाहेर पडतात याची उत्कंठित चित्तानें वाट पाहत बसूं.

लोकोत्तर रसिकता, प्रबळ भावनाशालिता, अनुपम कार्यकुशलता व निरपवाद नीतिमत्ता या सर्व गुणांचा मधुर संगम जसा चिपळूणकरांचे ठायीं झालेला आढळतो, तसा आधुनिक महाराष्ट्रांतील दुसऱ्या कोणत्याही पुरुषाचे ठायीं झालेला दिसत नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होण्याचें मुळींच भय नाहीं. टिळकांमध्यें पहिला गुण नव्हता, रानड्यांमध्यें दुसरा नव्हता, तर आगरकरांमध्यें तिसऱ्याचा अंश फारसा नव्हता. याच्या उलट या तिघांमध्यें असलेले कांहीं गुण चिपळूणकरांमध्यें नव्हते, हेंही खरेंच आहे. टिळकांची सर्वगामी बुद्धिमत्ता व तीक्ष्ण चिकित्सक बुद्धि, रानड्यांची गाढ विद्वत्ता व व्यापक तत्त्वान्वेषणबुद्धि, आगरकरांचा आवेश इत्यादि गुण चिपळूणकरांमध्यें नव्हते. तथापि, एकंदरीनें पाहतां लोकनायक होण्यास लागणारे गुण सर्वांत अधिक प्रमाणांत चिपळूणकरांमध्यें वसत होते, असें विधान केल्यास तें अयथार्थ ठरण्याची भीति नाहीं. ते इतक्या अल्पवयांत वारले कीं, त्यांच्या अंगच्या अनेक गुणांचें विकसित स्वरूप आपणांस मुळींच पाहावयास मिळालें नाहीं. त्यांच्या गुणांचा विकास अद्याप व्हावयाचा होता, तरी अल्प आयुष्यांतच त्यांनीं इतकें कार्य केलें कीं, ते जणूं काय भरपूर आयुष्य भोगूनच वारले असावेत असा सकृद्दर्शनीं कोणाचाही ग्रह होतो. केवढ्याशा आयुष्यांत त्यांनीं केवढें कार्य केलें याची कल्पना, इतरांनीं तेवढ्याच वयापर्यंत केलेल्या कार्याकडे तुलनात्मक दृष्टीनें लक्ष दिलें, म्हणजे सहज येते. टिळक, आगरकर, रानडे हीं आपल्यांतलीं अगदीं अपवादभूत अशीं जबरदस्त कार्यकर्तीं माणसें. त्यांनीं आपल्या आयुष्याच्या ३२ व्या वर्षापर्यंत सार्वजनिक कार्यांत कितपत मजल मारिलेली होती, याचा त्यांचीं चरित्रें वाचून आढावा घेतल्यास चिपळूण-

करांच्या कामगिरीची महती लक्षांत येईल. केसरींत लिहावयाला लाग-ण्याच्या पूर्वींच टिळकांचा अवतार आटोपला असता, सुधारकाचा एकही अंक काढण्यापूर्वींच आगरकरांचें चरित्र आटोपलें असतें, पुण्यास नेम-णूक झाल्यानंतर दोनचार वर्षांच्या आंतच रानड्यांच्या चरित्राला विराम मिळाला असता, तर या सर्वांच्या चरित्रांची कितीशी महती आज आपल्याला भासली असती? परंतु बरोबर तितक्याच वयांत चिपळूणकर इतका कार्याचा बोजा उठवून निजधामास गेले! यावरून त्यांचें लोकोत्तर प्रतिभाशालित्व आपल्या मनाला पटल्याखेरीज राहत नाहीं.

त्यांच्या चरित्राचें अवलोकन करितां दुसरा एक लक्षणीय विशेष आपल्या नजरेस पडतो. ते स्वतः लोकोत्तर पुरुष होऊन गेले हें तर खरेंच; परंतु त्यांनीं केलेल्या कार्यांपैकीं कोणतेंही कार्य असें नाहीं कीं, ज्याचें अगदीं सामान्य लोकांस आपआपल्या परीनें अनुकरण करितां येणार नाहीं. स्वभा-षेची सेवा करणें, देशसेवेस उपकारक होतील असे स्वावलंबनाचे उद्योग उभारणें, शिक्षणप्रसाराचा यत्न करणें, इत्यादि गोष्टी सामान्य मनु-ष्यांच्या आटोक्यांतल्या आहेत. व त्यांचें अनुसरण आजवर महाराष्ट्रांत शेंकडोजणांनीं यशस्वितेनें करून नांवलौकिक मिळविला आहे. यामु-ळेंच चिपळूणकर हे सामान्य शिक्षित जनतेस आपलेसे वाटतात. एक टिळक खेरीज करून शिक्षित जनतेच्या हृदयामध्यें इतक्या प्रेमानें व आत्मीयतेनें जाऊन बसलेला लोकनेता महाराष्ट्रांत दुसरा कोणताही झालेला नाहीं. त्यांनीं प्रकट केलेल्या विचारांचें महत्त्व कालांतरानें कमी होईल, किंवा कदाचित् यापूर्वींच कमी झालेलें असेल. परंतु ज्या अनेक महनीय गुणांच्या योगानें त्यांनीं लोककार्य संपादिलें, त्या गुणांचें महत्त्व व त्यांची अनुकरणीयता कधींही नाहींशी होणारी नाहीं. आक्षेपकांनीं उठविलेल्या धूलिपटलाच्या योगानें ह्या अलौकिक पुरुषाचा अनुकरणीय गुणसंभार तरुणांच्या दृष्टीआड होऊं नये, ह्याच हेतूनें

प्रस्तुत प्रबंध लिहिण्याचें कार्य लेखकाच्या हातून घडून आलें. त्या महात्म्याची भावनाशालिता, त्याची त्यागबुद्धि, त्याची उद्योगशीलता, त्याची योजकता व त्याची देशसेवारतता सभोंवार सहस्रशः अंकुरित झालेली दिसूं लागली, तर आपल्या राष्ट्राचें भाग्य उदयास आलें असाच त्याचा अर्थ होईल. तें घडून आलें आणि प्रस्तुत लेखकाचेंच काय, परंतु चिपळूणकरांचेंही नांव लोक विसरून गेले, तरी त्यांत प्रस्तुत लेख-काला, इतकेंच नव्हे तर खुद्द चिपळूणकरांच्या आत्म्यालाही, धन्यताच वाटेल हें उघड आहे.



# पुरवणी

प्रस्तुत प्रबंधांत पृ० २०१, २०२ वर दृष्टांतादाखल आगरकरांच्या पुण्यतिथीचा जो उल्लेख केला आहे त्यांत ती पुण्यतिथि 'नेमकी १९१५ सालीं साजरी करण्यांत आली' असें म्हटलें आहे. तें बरोबर नसून ती १९१६ सालीं जूनच्या १६ तारखेस साजरी करण्यांत आली, असा खरा प्रकार आहे. सालांत जरी याप्रमाणें फरक पडला तरी तेथील युक्तिवादाकरितां दृष्टान्तादाखल म्हणून या गोष्टीचा जो उपयोग केला आहे त्यास त्यामुळें कांहीं बाध येऊं शकत नाहीं. कारण टिळकांनीं १९१४ सालीं सुटून आल्यानंतर सुमारें एक वर्षभर राजकीय बाबतींत मुग्धता स्वीकारली होती व १९१६ सालीं त्यांनीं आपल्या धडाडीच्या कार्यक्रमास नुकतीच सुरवात केली होती. ही गोष्ट लक्षांत घेतां व पुण्यतिथ्युत्सवाची उठावणी कोणाकडून करण्यांत आली होती हें पाहतां मूळ लेखांत ज्या संभवदुक्तिक अशा आरोपाचा उल्लेख केलेला आहे त्याची यथार्थता कायमच राहते. आगरकर पुण्यतिथीस अनुलक्षून ता० ८ जुलै १९१६ च्या केसरींत खुद्द टिळकांनीं अग्रलेख लिहिला असून त्यांत 'मनोरंजना'च्या आगरकर खास अंकांतील लेखांचा उल्लेख करून त्यांतील लेखकांच्या प्रतिपक्षास येन केन प्रकारेण दूषणें देण्याच्या प्रवृत्तीचा निषेध केला आहे तो पाहण्यासारखा आहे. त्यावरून पुण्यतिथ्युत्सवाच्या चालकांची मनोवृत्ति कशी होती याचें खासें प्रत्यंतर येण्याजोगें आहे! त्या मानानें चिपळूणकर पुण्यतिथीच्या चालकांची परपक्षाविषयींची असूया खास हिणकस ठरेल!

# संदर्भ-ग्रंथ


१ विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र —ल. कृ. चिपळूणकर

२ विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या किरकोळ लेखांचा संग्रह भाग १—२ —खं. भि. बेलसरे

३ विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या चरित्राचें व लेखांचें साधारण स्वरूप —खं. भि. बेलसरे

४ विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या वेळची स्थिति —बा. गं. टिळक

५ निबंधमालेचें स्वरूप व कार्य —ल. रा. पांगारकर

६ न्या. महादेव गोविंद रानडे यांचें चरित्र —न. र. फाटक

७ लो. टिळक यांचें चरित्र ( पूर्वार्ध ) —न. चिं. केळकर

८ गोपाळ गणेश आगरकर, चरित्रात्मक निबंध —मा. दा. आळतेकर

९ शतपत्रें व इतर लेख यांचा संग्रह —लोकहितवादी

१० लोकहितवादी यांचें चरित्र —कृ. ना आठल्ये

११ लोकहितवादी —ग. ह. केळकर

१२ रा. सा. मंडलिक यांचें चरित्र —ग. रा. हवालदार

१३ प्रार्थनासमाजाचा इतिहास —द्वा. गो. वैद्य

१४ सार्वजनिक काकांचें चरित्र —रा. ग. बोरवणकर

१५ वा. ब. फडके यांचें चरित्र —रा. ग बोरवणकर

१६ अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक —गं. दे. खानोलकर

१७ बाळशास्त्री जांभेकर यांचें चरित्र —बा. ना. देव

१८ राजारामशास्त्री भागवत —बा. ना. देव

१९ विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचें चरित्र —रा. पां. आजरेकर

२० वेदोक्तधर्मप्रकाश —विष्णुबुवा ब्रह्मचारी

२१ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार —द. वा. पोतदार

२२ मराठे व इंग्रज —न. चिं. केळकर

२३ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ८ —वि. का. राजवाडे

२४ मराठी रियासत उत्तर विभाग, १, २, व ३ —गो. स. सरदेसाई

२५ महात्मा जोतिराव फुले —पंढरीनाथ पाटील

२६ श्रीमत् दयानन्द —स. कृ फडके

27 Miscellaneous Writings of the late Hon'ble Mr. Justice M. G. Ranade (1915)

28 Mount Stuart Elphinstone —*Colebrooke*

29 Speeches and Writings of Dadabhoy Naoroji

30 India in the Victorian Age —*R. C. Dutt*


---

याशिवाय विविधज्ञानविस्तार, दंभहारक, केसरी, निबंधचंद्रिका, ग्रंथमाला, सरस्वतीमंदिर इत्यादि नियतकालिकांमध्यें पूर्वी येऊन गेलेल्या अनेक लेखांचा व इतरही अनेक ग्रंथांचा उपयोग झाला. त्याबद्दल प्रस्तुत ग्रंथाचे लेखक त्या त्या लेखकांचे, संपादकांचे आणि ग्रंथकारांचे आभारी आहेत.



# सूचि.

---

६००६८

# शुद्धिपत्र



| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १७ | २३ | संस्कृत विद्येचा | संस्कृत विद्येला |
| ५१ | १७ | किंचित् मावळून | किंचित् मवाळून |
| ८८ | १४ | समाजयावर | सभाजयावर |
| २०५ | ३ | चिपळूणरांविषयींचे | चिपळूणकरांविषयींचे |
| ,, | ११ | लोकश्रयावर | लोकाश्रयावर |

